# भवमंथन.

सीताराम शिवराम दातार.

१९०६

किमत आठ आणे.

Received 18th April 1906.
Register No $\frac{2}{A}$ of 1906/7.

# भवमंथन.

हें पुस्तक

सीताराम शिवराम दातार,

वकील कोर्ट तळेगांव व सासवड,

यांनीं तयार केलें,

व

त्र्यंबक हरि आवटे,

यांनीं आपल्या 'इंदिरा' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.

सन १९०६.

किंमत ८ आणे.

# भवमंथन.

## नमन.

आर्या.

कलिमल जलधि निमग्ना । दुस्तर संसार सागरीं तारा ॥
व्हा गुरुराया स्वामी । नमितों चरणीं अपार भव तारा ॥१॥

श्लोक.

विधि हरिहर माया । सृष्टि लीला प्रसिद्ध ॥
जतन हनन कार्यें । होति ज्याचेनि सिद्ध ॥
सकल जगति माजी । जो दिसे ज्यांत वस्तु ॥
परि अविकृत जो त्या । देव देवा नमोस्तु ॥

आर्या

यश कृताच्या वंशा । दिक्षित ह्मणती तसेच दातार ॥
झालों सकल जयाच्या । दातृत्वें त्या नरा नमस्कार ॥ १ ॥
वंदुनि आजे आजी । तात्या मायी अपार पुण्य निधी ॥
वंदी मातामह मी । सुतसह कविवर सुभक्त थोर सुधी ॥२॥
माता गंगा गंगा । शिवसम शिवराम तात राम रत ॥
वंदुनि सुशब्द त्यांचे । कथितों करतील मोह ताप गत ॥३॥

# प्रस्तावना.

## विद्या, कला ह्यांचा उपयोग कोठवर ?

॥ या लोकीं धनवंत मी प्रबल मी सर्वज्ञ मी श्रेष्ठ मी ॥
॥ ज्ञाता मी नरनाथ मी विबुध मी अध्यात्म मी धीर मी ॥
॥ भोक्ता मी सुखधाम मी सुजन मी स्वानंद मी सिद्ध मी ॥
॥ मी मी हेंचि कळे परंतु न कळे कोठील मी कोण मी ॥ १ ॥
(वामन.)

प्राप्त झालेल्या वस्तूंचा अनादर व अप्राप्त वस्तूंविषयीं तळमळ करून जिवापाड प्रयत्न करण्याविषयीं मनुष्याचें मन सदा तयार असतें. ह्याचा प्रत्यय जगाच्या उत्पत्तीपासून कसा दिसून येतो पहा. मानवी स्वभावांत जिज्ञासा म्हणून विलक्षण चीज आहे. तिच्या योगानें मनुष्यें सदोदित शोध करण्यांत निमग्न आहेत. सकल जगसें काय पण ब्रह्मांडसुद्धां हस्तामलकाप्रमाणें दिसावें म्हणून सतत खटपट चालली आहे. कल्पनेच्याही पोंचापलीकडे फार लांब असलेल्या तत्त्वांचा पिच्छा दुर्बिणीच्या साह्यानें मनुष्यें पुरवित आहेत. आकाशगंगा आणि खगोल यांतील नानाविध चमत्कार आणि उत्तर ध्रुवापासून दक्षिण ध्रुवापर्यंतचा भूगोल यांचें अध्ययन करीत आहेत. चौदा विद्या चौसष्ट कला आपल्याशा करण्याचे प्रयत्न सतत चालले आहेत. अर्वाचिन पंडितांनीं तर हरएक गोष्टीचें शास्त्र बनवून शास्त्रांची रेलचेल करून सोडिली आहे. गत गोष्टींच्या अनुभवापासून शहाणपण शिकावें म्हणून इतिहासाचें अध्ययन चाललें आहे. ग्रीस, इंग्लंड, अमेरिका इत्यादि परदेशांच्या इतिहासांचीं व आपल्या देशावर स्वाऱ्या करणाऱ्यांच्या पराक्रमाच्या इतिहासांचीं पारायणें चाललीं आहेत. परदेशांतील राजांच्या वंशावळी, हिंदुस्थानांतील व्हाइसरॉय यांच्या नामावळी मुखोद्गत आहेत. पण ह्या सर्व विद्या, कला, शास्त्रें आणि इतिहास ह्यांच्या ज्ञानाची व उपयोगाची सीमा आयुष्यापर्यंतच कीं नाहीं !

## अति परिचितांची उपेक्षा.

वर सांगितलेल्या अत्यंत दुर्घट विषयांचें अध्ययन करून त्यास आपलेंसें करण्यास झटणारेच विद्वान, अतिपरिचयांतील वस्तुविषयीं किती तरी बेपर्वा असतात पहा, आपल्या देशांतील तीर्थें, क्षेत्रें, यांचीं महात्म्यें, त्यांजपासून होणारे ऐहिक व पारत्रिक लाभ, त्या विषयींच्या आख्यायिका, समजुती, व्यापाराचीं शहरें, मालं उत्पन्न होण्याच्या व विकण्याच्या पेठा, तेथील शिरस्ते लट-पटी, खटपटी, त्याप्रमाणें आपल्या राहण्याच्या शहरांतील देवालयें, सार्वजनिक संस्था, त्यांचें उत्पादक, त्यांचे उपयोग, वगैरे गोष्टींविषयीं, बाजारांतील उद्मी लोकांच्या भाषा, त्यांचे शिरस्ते, त्यांची वजनें, मापें, हातचलाख्या, नामांकित विद्वानांस मुळींच माहित नसतात.

## आपल्या इतिहासाची उपेक्षा.

वैभवाच्या अत्युच्च शिखरावर हजारों वर्षें विहार करणारें आर्यराष्ट्र आज निर्माल्य होऊन परक्यांच्या पायदळीं पडलें आहे. त्याचा ऱ्हास होण्यास किती काळ लागला, त्यांतील लोकांच्या काय चुकया झाल्या, त्या होण्याचीं कारणें काय, त्यांबद्दल त्यास दोष देणें योग्य आहे किंवा नाहीं, झालें तें झालें पण हल्लीं आपला तरी ओघ कोणीकडे चालला आहे, उत्कर्ष जवळ येत चालला आहे किंवा पूर्ण विनाश होण्याची तयारी होत आहे, स्वराज्य घाताच्या वेळीं हिंदी राष्ट्रांत नेकी, पाणीदारपणा, स्वाभिमान, धर्माभिमान, प्रामाणिकपणा, उद्योग प्रीति, शरीर बळ, जूट वगैरे सद्गुण अवशिष्ट होते, त्यांत व या परवशतेच्या कालांत पाश्चात्य विद्याप्रकाशानें किती भर पडली आहे, किंवा लयास जाऊन त्यांच्या मोबदला कमकुवत, फूटाफूट, दुर्व्यसनें, दांभिक ढिलेपणा, लोक धार्जिणेपणा यांचा मात्र धुमाकूळ माजला आहे. ह्याचा विचार फारसे कोणी करीत नाहीं. परक्यांच्या इतिहासापेक्षा आपल्या पूर्वजांच्या इतिहासानें अभिमानपूर्वक सद्गुणाचें वळण जास्त लागतें. बऱ्याच लोकांस आपल्या पूर्वजांचीं नांवें सुद्धां श्रावणीच्या वेळेस किंवा महालयाच्या वेळेस उपाध्यास किंवा घरांतील वृद्ध बायांस विचारावीं लागतात. तेव्हां पूर्वजांचे सद्गुण, पराक्रम, कार्यें त्यांनें कोठून माहित असणार ?

## संसार व देह ह्यांच्या विचाराची उपेक्षा.

जसजसा संबंध निकट तसतशी अनास्था जास्त हेंच खरें. स्वदेश, ग्रामव्यवहार या सर्वांपेक्षां संसार आपल्याला निकट आहे. सगळें जग ह्या संसारांत घटांगळ्या खात आहे. पण संसार सम्यक सार आहे म्हणतात तें खरें, किंवा दुःखांगाराचें आच्छादन आहे म्हणतात तें खरें, संसारापासून स्वर्ग सुख प्राप्त होईल किंवा नरकयातना प्राप्त होतील ह्याचा विचार थोडेच लोक करितात. या संसारापेक्षांही देह निकट आहे म्हणून पूर्वोक्त सर्व विचारापेक्षांही त्याच्या विचारविषयीं फारच अनास्था आहे. देह ही चीज काय, कशानें प्राप्त झाला आहे, पवित्र किंवा अमंगळ आहे, मोक्षाचा द्वारवंटा आहे, स्वर्गाचा सोपान आहे कीं अन्यपक्षीं यमयातना, तिर्यक् योनि, नरकवास यांत पोहोंचविणारा हाडामांसाचा कुश्चळ सांपळा आहे, याचा विचार फार क्वचित मनाला शिवत असेल.

## आत्मज्ञानोपेक्षा.

वरील सर्व पक्षान्यापेक्षां निकट आपलें आपण आहों म्हणून आपण आलों कोठून ? जावयाचें आहे कोठें ? याचा विचार अत्यंत दूरच्या ताऱ्यापेक्षांही लांब पडला आहे. असा विचार हजारांतून एखाद्याच्या मनांत येऊन लागलाच निघून जातो. अशा हजारांत एखादा शोधास लागतो. तशा हजारांतून एखादा भाग्यशाली सिद्धि पावतो.

## तृष्णा व विषय ह्यांच्या विचाराचा अभाव.

ह्या देहामध्यें मुक्काम राहून आपल्या दश इंद्रियांवर राज्य करणारें मन हें तरी काय आहे ? ह्याच्या अंगीं बंध किंवा मोक्ष यांतून पाहिजे तें साधण्याचें सामर्थ्य आहे. ह्या मनास गुंग करून टाकून मनुष्यास पाहिजे तीं कर्में करण्यास लावणारी धन-वैभव तृष्णा किती तरी अनिवार आहे पहा. कलिरायाच्या जाज्वल्य अमलांत ह्या धनवैभव तृष्णेनें मनुष्यें धुंद झाल्यामुळें भूमंडळावर रक्ताच्या नद्या आणि मांसाचें कर्दम पूर्वकाळीं झाले आहेत, हल्लीं होत आहेत

व पुढें करण्याकरितां कोट्यानुकोटी मानव-राक्षस-नरकसाई, न्याय, नीति, पुण्य आणि धर्म यांस गुंडाळून ठेवून शस्त्रपाणि होऊन राहिले आहेत. धनवैभव-तृष्णा शांत करण्याकरितां राष्ट्रचीं राष्ट्रें नष्ट करणारे, देशचेदेश उध्वस्त करणारे स्वदेश-स्वजातच काय पण प्रत्यक्ष सहोदर किंवा प्रत्यक्ष जन्मदाते किंवा पुत्र यांचा घात करणारे अशा मानवांपेक्षां सर्व भक्षक कावळा तो स्वजातीचें मांस खात नाहीं म्हणून श्रेष्ट झाला आहे. त्यापेक्षां धनवैभव तरी काय आहे, त्याच्या लाभानें खरें हित आहे किंवा अनर्थ आहे, हीं शाश्वत आहेत, किंवा आळवा-वरील पाण्याप्रमाणें क्षणिक आहेत, त्याप्रमाणेंच मनाला अहोरात्र तळमळ लावणारे पंच विषय, मायापाश, सुखास कारण आहेत, किंवा अनर्थास व विनाशास कारण आहेत, त्याचा विचार बहुतेकांच्या स्वप्नींही येत नाहीं.

## बोधामृत निक्षेप.

आपलें महाभाग्य म्हणून आपल्यास आर्यभूमींत जन्म प्राप्त झाले आहे. आपल्या राष्ट्राच्या अवनतीची सध्या कमाल झाली आहे. तथापि अनंत पिढ्या या निवृत्तिमार्गाच्या सहवासांत गेल्या कारणानें आपल्या समाजाच्या अंगवळणी निवृत्तिमार्गाची चर्चा पडली आहे. हरदास पुराणिक तर काय, दारावर भीक मागण्यास येणारे आणि जात्यावर ओंव्या म्हणणाऱ्या बायका सुद्धां ऐहिक सुख, दुःख आणि संसार यांच्या रूपाचें आविष्करण करून आप-ल्यास जागे करीत असतात. तिकडे मुळींच लक्ष द्यावयाचें नाहीं असा आपला स्वभावच बनला आहे, तथापि एखादे वेळीं तरी निमिषमात्र ते विचार मनांत आल्यावांचून रहात नाहींत. परम पवित्र माझे जनक आणि महासाध्वी जननी तसेंच साधुसंत, हरदास पुराणिक, इत्यादिक महाभागांच्या रूपानें बोधामृत, माझ्या श्रवणीं पडलें ते ह्या जीर्ण झालेल्या तनुघटावर नष्ट न व्हावें म्हणून त्या पैकीं जेवढा अंश माझ्या कोत्या बुद्धीच्या धारणाशक्तीस अनुसरून मजला आकलन करितां आला आहे तेवढा पुढील पिढीच्या हवालीं करावा हें माझें कर्तव्य आहे असें समजुन हें पहिलें टिपण भवमंथन ह्या नांवानें मी सज्ज-

तांच्या सेवेस हजर केलें आहे. ह्याचा स्वीकार होईल त्या मानानें पुढील टिपणें हजर करण्यास मला उत्तेजन येईल.

## प्रवृत्ति मार्गासही हा लेख उपयोगी आहे.

पंचविषय, सुख-मोहजाल आणि तत्प्राप्त्यर्थ संसार ह्यांनीं मनुष्यास ग्रसून टाकिलें आहे. ह्यांच्या खरेंखोटेंपणाविषयीं, जादू विषयीं व परिणामाविषयीं विवेचन करून त्यांचें इंगित समजवून देऊन मनुष्याच्या मनाची प्रवृत्ति निवृत्तीकडे करावी हा मुख्य हेतु हा लेख लिहिण्याचा आहे खरा, परंतु राजाकरितां मार्ग शृंगारून लखलखाट केला असतां त्या रस्त्यानें जाणाऱ्या सामान्य जनांसही त्याचा लाभ सहजच होतो, त्याप्रमाणेंच ह्या लेखाचा उपयोग प्रवृत्ति मार्गांतही होईल. शिकल्यावांचून विसरतां येत नाहीं, प्रवृत्त झाल्यावांचून निवृत्त होतां येत नाहीं म्हणून प्रवृत्तिमार्गाच्या मनोहर पण घातकी मार्गाचें आक्रमण थोडें तरी केल्यावांचून निवृत्तिमार्गाचा पवित्र लाभ होत नाहीं. सन्मार्ग, सुविचार आणि सदाचार ह्यांची अपेक्षा प्रवृत्ति मार्गालाही अत्यंत आहेच म्हणून विषय सुखापासून व विषय प्राप्त्यर्थ होणारे अनर्थ प्रवृत्ति मार्गाकडे टाळावे लागतात. ह्या लेखांतील मजकूर प्रापंचिकांसही विश्वसु मंत्राप्रमाणें मदत करील. ह्या मजकुराचें मनन केलें तर पदोपदीं संरक्षण आणि हित होईल अशी माझी समजूत आहे ती खरी ठरो असें सर्व शक्तिमान प्रभूपाशीं मागून त्याचें वंदन करून प्रस्तावना संपवितों.

# विज्ञाप्ति.

## श्लोक.

गृहधनसुतदारा । देहही व्याप सारा ॥
नुमजुनि मनुजात्वा । मानिला हा पसारा ॥
त्यज भज गुरु झाडी । मोहअज्ञ-नसारा ॥
हरिहर सह जोडी । ज्ञानविज्ञानसारा ॥ १ ॥

हें पुस्तक लिहिणार दूर असल्या कारणानें आणि कार्य बाहुल्यामुळें प्रकाशकास सवड न झाल्यामुळें छापतांना तपासणी करतां आली नाहीं यामुळें जागजागीं अशुद्धें राहिलीं आहेत. गदळ टाकून सुप[1] चांगलें मात्र घेतें त्याप्रमाणें वाचकांनीं दोष टाकून मननपूर्वक अर्थ घ्यावा. हें पुस्तक वाचण्यास प्रारंभ करण्यापूर्वी आपली मनोवृत्ति लक्षांत आणून ठेवावी आणि वाचल्यानंतर त्या मनोवृत्तींत काय फरक झाला हें पहावें. तो फरक पुस्तककारास कळविण्याची तसदी घेतल्यास लक्षलाभ झाल्याप्रमाणें पुस्तककारास समाधान होईल. ह्या पुस्तकाचा चांगला प्रसार व्हावा येवढ्याच हेतूनें हें लिहिलें आहे. ह्यापासून पैसा मिळविण्याचा हेतु नाहीं. ह्या पुस्तकाचें अन्य भाषेंत भाषांतर करण्याची किंवा पुनरावृत्ति काढण्याची कोणी इच्छा दर्शविली असतां पुस्तककार मजकूर वाढवून मोठ्या आनंदानें परवानगी देईल.

---

१ सु + प = चांगलें राखणारें.

१४ अ

# भवमंथन.

## खंड पहिलें—भवप्रशंसा.

### भाग पहिला.

#### परिभ्रमण.

ईश्वरः सर्व भूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।
भ्रामयन्सर्व भूतानि यंत्रा रूढानि मायया ॥
(श्रीमद्भगवद्गीता.)

#### ब्रह्मांडभ्रमण.

सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें असतां असें दिसून येतें कीं, ब्रह्मांडांत कोणचीही वस्तु स्थिर नाहीं. सर्व वस्तु सारख्या भ्रमण करीत आहेत. स्थिरचर म्हणण्याचा प्रघात आहे खरा, पण तो स्थूल दृष्टीचा आहे. पर्वतास अचल म्हणतात, पण सर्व पर्वत धारण करणारी पृथ्वी तरी स्थिर कोठें आहे! ती तीन प्रकारांनीं फिरत आहे. ती ज्याच्या आकर्षणशक्तीमुळें नियमित गतीनें फिरत आहे, तो जगच्चक्षु तरी कोठें स्थिर आहे! तो सारखें भ्रमण करीत आहे. मनुष्याचे दृष्टीस दुर्बिणीच्या साधनानें जितकें दूरवर दिसतें आहे, त्यांतील अनंत गोल सतत परिभ्रमण करीत आहेत. अनंतकोटि ब्रह्मांडें तरी तेंच करीत आहेत. ही गोष्ट त्यांच्या बाह्य गतीची झाली. त्या गोलांवर वास करणारे अनंत पदार्थ, प्राणी, वनस्पति ह्यांचेंही भ्रमण चाललें आहे. त्या पदार्थांवर वास करणारे आणखीही पदार्थ असून त्यांचेंही पण भ्रमण चाललें आहे. सर्व ब्रह्मांडाच्या व त्यांवरील पदार्थांच्या आणि त्या

पदार्थांच्या वरील पदार्थांच्या अंतरीं ज्याच्या त्याच्या धर्माप्रमाणें सारखें भ्रमण चाललें आहे. परमाणूपासून ब्रह्मा, विष्णु, महेश्वर यांसुद्धां सर्व भ्रमण करीत आहेत. ध्रुव अढळपदीं आहे म्हणतात; पण मिसर देशांतील एका पिरमिदांत ध्रुवाचा वेध घेण्याकरितां जागा ठेविली आहे, तिजमधून ज्या ठिकाणीं ध्रुव दिसत होता त्या ठिकाणीं हल्लीं दिसत नाहीं.

## भूमंडलभ्रमण.

खगोलांतील दूरतम देखावा सोडून आतां आपण आपल्या भूमंडळाकडे पाहूं. सरितापति व सरिता भ्रमण करीत आहेत. भूमीच्या उदरांतही कांहीं तरी घालमेल चालली आहे. भूकंप झाला म्हणजे ती दिसून येते. पर्वताचा स्फोट होतो वृक्ष स्थिर दिसतात पण स्थिर नव्हेत. दररोज ते वाढत असतात, पालवी येत असते, पानें गळतात. पारिजातकाच्या झाडास संध्याकाळीं हरबऱ्यासारख्या कळ्या दिसतात. सकाळीं पहावें तों फुलें होतात. असें त्यांचें भ्रमण चाललें आहे. पशु, पक्षी तर चरच आहेत. परिभ्रमण हींच मायेचीं सृष्टिस्थितिलय रूपें होत. परिभ्रमणाचा प्रारंभ हाच (सृष्टि) जन्म; परिभ्रमणाचा पुढील व्यापार हींच ( स्थिति ) आयुष्यमर्यादा; आणि परिभ्रमणाचा विसांवा हाच (लय)मृत्यु.

## मानवी भ्रमण.

**आहार निद्रा भय मैथुनं च । चत्वारि वस्तूनि वसंति देहे ॥**
**ज्ञानंहि एकोमधिकं मनुष्ये । तेनैवहीनः पशुभिः समानः ॥**

( सुभाषित. )

इतर प्राण्यांच्या आणि मनुष्यांच्या परिभ्रमणांत मनुष्याला ज्ञान ही देणगी जास्ती असल्यामुळें मोठा फरक झाला आहे. स्थावर प्राण्यांचें परिभ्रमण ठरलेल्या मार्गानें होतें. त्या बाहेर त्यास जातांच येत नाहीं. पशुपक्षी यांचें तरी बुद्धिसामर्थ्य मर्यादितच; म्हणून त्यांचेंही परिभ्रमण मर्यादितच आहे. मनुष्यांची बुद्धि मात्र अकुंठित आहे. तिनें राजसत्ता निर्माण केली आहे, म्हणून त्यांचे परिभ्रमणास अंतपार नाहीं. प्रचंड व बलाढ्य ऐरावत जखडण्याजोगा साखळदंड कडीकडी जोडून बनवावा, त्याप्रमाणें ही महाउलाढाली राजसत्ता सदा खेक

खेळत आहे. मनुष्याच्या पूर्वावस्थेंत ज्याचा त्याच राजा असे. पुढें दंपत्यसंबंध उत्पन्न झाल्यावर कुटुंबनायक स्वामित्व पावला. अनेक कुटुंबें मिळून जात किंवा समाज बनल्यावर चौधरी किंवा गुरु सत्ताधीश झाले. जातिसमुच्चयानें ग्राम-संस्था स्थापन झाल्यावर ग्रामाधिकारी पाटील कुळकरणी अष्टाधिकार पावले. परगणे बनल्यावर देशमुख-देशपांडे मालक बनले. परगण्यांच्या समूहावर राजा-नें आपला अंमल बसविला. भाग्यशाली महापराक्रमी राजांनीं आपली सत्ता राज्यांच्या श्रेणीवर स्थापन करून राजनीतीनें प्रजेचें पुत्रवत् पालन करण्याचा क्रम चालविला; व तेणेंकरून देश निर्भय होऊन जिकडे तिकडे सुखसमृद्धि झाली.

## हव्यास राक्षस.

कलिरायाच्या घोरतम अमलास जोर आल्याबरोबर वैभव, तृष्णा, धनाशा, आपलपोटेपणा, परापहार, परपीडेविषयीं बेपर्वाई इत्यादि दुर्गुणांस पूर आला. त्या पुरानें मनुष्यांच्या मागें हव्यास म्हणून जो एक राक्षस लाविला आहे, त्यानें तर परिभ्रमणाची कमालच करून सोडिली आहे; परमेश्वरानें दयाळूपणें दिलेल्या ज्ञानरूप देणगीचा सत्यनाश केला आहे; व बुद्धीचा विनियोग स्वपरघाताकडे झाला आहे.

**विद्या विवादाय धनं मदाय। शक्तिः परेषाम् परपीडनाय ॥**

असा प्रकार होऊन जें राष्ट्र किंवा जो देश प्रबल होईल, त्यानें इतरास लुटावें, जिंकावें, गांजावें, म्हणजे त्याच्या सामर्थ्याचें सार्थक झालें असें ठरल्या-सारखेंच आहे.

## पूर्वेशीं पश्चिमेची झुंज.

प्रथम हिंदुस्थानांत आर्य लोकांच्या सामर्थ्याची सीमा झाली, तेव्हां त्यांचा देश महाकाली, महालक्ष्मी व महासरस्वती यांचें विलासमंदिर असून त्यांची वृत्ति सात्विक होती, व कलिरायाचा प्रादुर्भाव झाला नव्हता. म्हणून त्यांचा प्रकार

**खलस्य साधोर्विपरीतमेतत् । ज्ञानाय दानाय न च रक्षणाय ॥**

असा झाला.

जगतांतील सर्व लोकांस ज्ञान आर्यांपासून मिळालें. जगतांत कांहींच शाश्वत नाहीं. आर्यांचा विनाशकाल येतांच लक्ष्मीचें क्षणभंगुरत्व जाणून आर्यांनीं तिन्ही महाशक्तींची हेळसांड केली. शेवटीं वादावर गोष्ट येऊन आचार्यांनीं सरस्वतीला नीचगृहवासाचा शाप दिला. तेणेंकरून सरस्वतीच्या बरोबर तिच्या सहचारिणी गेल्या. सद्गुणादि मित्रही गेले. सरस्वतीबाईची पृथ्वीप्रदक्षिणा सुरू झाली. अर्थात् हिंदुस्थानाची दुर्दशा होऊन तें पायदळीं पडलें. स्वारीचा छावना पश्चिमेस जातांच मुसलमान लोक प्रबळ होऊन युरोपांत मुसलमानांच्या प्रवेशाबरोबरच सरस्वतीची स्वारी गेली. अर्थात् युरोपस्थ राष्ट्र प्रबळ होऊन, खेळाचें राज्य त्यांस येऊन, मुसलमानांस पिटवून आशिया खंडावर त्यांनीं मारा सुरू करून सपाटयासरसें आर्यावर्त चीत करून टाकिलें. इराण, अफगाणिस्तान, तिबेट, सियाम, चीन यांस चीत करण्याकरितां त्यांच्यामोंवतीं गोरे घिरट्या घालीत आहेत. हळूहळू एशियाखंडांतील एक एक गडी चीत करून टाकीत आहेत.

---

# भाग दुसरा.

## आवडगोड.

**दधि मधुरं मधु मधुरं द्राक्षा मधुरा सुधापि मधुरैव**
**तस्य तदेवहि मधुरं यस्य मनो यत्र संलग्नं ॥ १ ॥**

( सुभाषित )

मनुष्यमात्राच्या व्यावृत्तीकडे लक्ष दिलें असतां असें दिसून येतें कीं, यच्चावत् मनुष्यें एकसारखीं कांहींना कांहीं खटपट करीत आहेत. कोणीही स्वस्थ नाहीं. तेव्हां हा खटाटोप कशाकरितां आहे ? असा प्रश्न सहजच उत्पन्न होतो. "कलियुगांत मनुष्यमात्र आहारविहारपरायण असणार" असा सिद्धांतच आहे. "**सर्वारंभास्तंडुलाः प्रस्तलमूलाः**' या न्यायानें सर्व कांहीं पोटपुजेकरितां आहे. आधीं पोटांत मंद झाल्यावाचून बाकीचे छंद

सुचावयाचे नाहींत हें कांहीं खोटें नाहीं; पण सर्व माणसें केवळ पोटार्थीच व्हावीं आणि अन्नाच्याच मागें लागावीं, अशी विपन्नस्थिति जगाच्या मागें ईश्वरानें लाविलेली नाहीं. पुष्कळ हरीचे लाल अशा स्थितींत आहेत कीं, एकाच पिढींत नव्हे, सात पिढ्यांत सुद्धां त्यांस निर्वाहाची काळजी करावयास नको. त्यांनीं तरी स्वस्थ असावें ना! पण अनुभव अगदीं उलट आहे. जितका धनसंचय जास्त तितका हव्यास जास्ती; तसेंच जितका हव्यास तितका व्याप, आणि व्याप तितका संताप. तस्मात् केवळ पोटाच्याच लफड्याकरितां सर्व खटाटोप आहे असें नाहीं. पोटाचा लफडा अपरिहार्य आहे, त्याच्याकरितां खटाटोप केल्यावांचून गत्यंतर नाहीं हें खरें; पण त्याशिवाय आवडता हेतु कांहीं निराळाच असतो.

## द्रव्यासाठीं कीं काय?

पोटाची काळजी नसतांही व्याप सुटत नाहीं, त्यापेक्षां, सगळ्या जगाला द्रव आणून गुंग करून टाकणारें जें द्रव्य, त्याचे साठींच खटाटोप असावा. द्रव्याच्या इच्छेस कधींच तृप्ति नाहीं. पृथ्वीवरील सर्व ऐश्वर्य, सर्व स्त्रिया आणि आकल्प आयुष्य एका पुरुषास प्राप्त झालें, तरी त्याला तें पुरेसें वाटून आतां नको असें कधींच वाटणार नाहीं, असें ययातीनें पुरूस म्हटलें आहे. अशाही द्रव्याची पर्वा न करितां तीर्थयात्रा, ब्राह्मणसंतर्पणें, अनाथदुःखनिवारण, धर्मशाळा, रुजोपायशाला, अन्नसत्रें, विहिरी, तलाव वगैरे शेकडों सत्कृत्यें करून त्या द्रव्याचा सद्व्यय करणारीं अहल्यामातेच्या पंथांतील पुण्यवान माणसें कीर्तिरूपानें चिरंजीव झालेलीं आढळतात. अन्यपक्षीं दुर्व्यसनें, नाच, तमाशे, आणि ख्यालीखुशाली ह्यांत द्रव्याचा फडशा उडवून दुर्लौकिक आणि दुर्गतीची सामग्री जोडणारेही पुष्कळ दृष्टीस पडतात; तेव्हां द्रव्यासाठीं हा खटाटोप आहे असेंही म्हणवत नाहीं.

## स्त्रीसाठीं आहे काय?

नराला मोहून, त्याच्या चिंधड्या करून, त्याला दुर्गतीस पोहोंचविणाऱ्या भांगार सोनें आणि कांता ह्या दोन कातऱ्या आहेत. भांगाराचा वर विचार झाला. आतां हा खटाटोप कांतेकरितां असावा असें वाटतें; पण शरीरबळाचे

शोकी पैलवान, महंत, जोगी, गांजेकस, आफूमियां वगैरे लोक रात्रंदिवस आपल्याच नादांत मग्न असून कांतेची बिलकूल पर्वा करीत नाहींत असेंही दिसून येतें.

## सन्मार्गरत.

कनक, कामिनी, शरीर, व्यसनें ह्या सर्वांस तुच्छ मानून कांहीं नरपुंगव विद्यार्जनांत काळ घालवीत आहेत. आर्यभूमींतील अपार विद्याभांडार पाहतांच त्यास भुलून जाऊन परम कठीण परकी अशा संस्कृत भाषेचा अभ्यास करून कोणी ऋग्वेद पहात आहेत. कोणी योगमार्गाच्या पाठीस लागले आहेत. कोणी पृथ्वीवरील अनंत चमत्कार पाहण्यांत चूर आहेत. कोणी ध्रुव प्रदेशाच्या शोधार्थ आपल्या जिवावर पाणी सोडून त्या उद्योगास लागले आहेत. कोणी आपल्या देशाच्या आणि राष्ट्राच्या क्लेशांचें परिमार्जन करण्याकरितां घरदार, स्वजन, धन, मुलेंबाळें ह्यांस अंतरून विलायतेस जाऊन तेथील न्यायप्रिय लोकांच्या दाढ्या हनुवट्या धरून "आमच्या देशाची दाद द्या ! फार हो फार आम्ही गांजलों ! नका आतां आमचा अंत पाहूं ! आमचा छळ नका करूं ! सत्तेच्या बळावर दुर्बळांचा छळ करून कोण बरें कल्याण पावला आहे ! " अशा विनवण्या करून आपल्या आयुष्याचा काळ घालवून जन्माचें सार्थक करीत आहेत. सार काय तो परोपकार आहे, असें मानून देशोदेशीं सत्यधर्माचा प्रसार करण्याकरितां कोणी व्याख्यानें देत आहेत, विद्यापीठें स्थापन करीत आहेत. कोणी ह्या संसारांतील सर्व व्यवहार नश्वर मानून व घातक समजून, वेदांतशास्त्राचा अभ्यास करून वेदांत अंगीं बाणून विरक्त धादांती बनून ईश्वराशीं ऐक्य करण्याच्या खटपटींत गुंग झाले आहेत. कोणी तीर्थाटणें, जप, तप, प्राणायाम करण्यांत गुंग आहेत.

## देशतिलक.

निरुपद्रवी लोक कल्याणास साधनीभूत असा धंदा करून आपल्या कष्टानें निर्वाहाची सोय लावून आपलें तन, मन, धन आणि आयुष्य स्वदेशाच्या व राष्ट्राच्या कल्याणाकरितां उद्योग करण्याच्या पवित्र प्रयत्नांत घालवावें, मग सरकारची विनाकारण इतराजी झाली तरी चिंता नाहीं, प्राणसंकट आलें तरी चिंता नाहीं, अशा निश्चयानें वागणारे, देशास भूषणभूत तिलकही कांहीं आहेत.

## शूरस्य मरणं तृणं.

"सबसे जी प्यारा" ही म्हण आपण नेहमीं ऐकतों, पण संभावितास अकीर्तीपेक्षां मरण पतकरतें. रणशूरास तर मरण तृणसमान वाटतें. यवनांचा घोरतम जुलूम होऊन हिंदुधर्म नष्ट होण्याचा सुमार दिसूं लागतांच, शिव-छत्रपति, तानाजी, एसाजी, बाजी फसलकर वगैरे नरसिंह सुखावर लाथा मारून, शिरें हातावर घेऊन, आपलें स्वातंत्र्य, गोब्राह्मणपरिपालन, स्वधर्मस्थापना ह्या पवित्र कर्तव्यांवरून आपले प्राण ओंवाळून टाकण्याचा निश्चय करून रणांगणांत शिरले. यवनांनीं किल्ल्याच्या मार्गावर निखारे पसरून ठेविल्यामुळें किल्ल्याकडे जातां येईना; तेव्हां एक वृद्ध वीर पुढें होऊन म्हणाला "निखाऱ्यावर मला लोटा; आणि माझ्या पाठीवरून जा; पण किल्ला घ्या. छत्रपति सुखरूप पोहोंचल्याच्या तोफेची गर्जना ऐकण्याकरितां इमानी बाजी परभूनें प्राण ओढून धरिला होता. तोच मासला पराक्रमाच्या कसोटीस पुऱ्या शंभर नंबरास लागणाऱ्या बोअर लोकांनीं जगास दाखवून बलाढ्य आणि महाभाग्यशाली ब्रिटिश लोकांचा पूर्वापर दरारा जगाच्या प्रत्ययास आणून दिला. आपल्या देशाचा कांहीं फायदा नसतां, त्या सत्यसंकल्प बोअर लोकांच्या मोडत्या दळाचें सारथ्य करून कित्येक परदेशांतील लोक त्यांच्याकरितां ब्रिटिशांसारख्या वणव्यांत निर्भय विहार करीत होते.

## छंद अंध!

मनुष्य प्राणी अक्कलवान आहे, तेव्हां तो चांगलें सोडून वाईट पतकरील असें संभवत नाहीं. पण छंदाचा असा कांहीं चमत्कार आहे कीं, तो कोठें गुंतेल ह्याचा नेमच नाहीं. राजापुढें किंवा धनिकापुढें लांगूल-चालन करून सत्यापलाप करून समयीं स्वराष्ट्राची मोठी हानि झाली, सहोदराचा घात झाला, तरी पतकरून आपला तळीराम गार करण्याकरितां व आपल्यास शाब्दिक बहुमान किंवा किताब मिळण्याकरितां भलते सलते उपद्व्याप करणारे कांहीं थोडे नाहींत. कुत्र्याप्रमाणें आपलें पोट भरून पाहिजे तें नीच कर्म करून पैसे गोळा करणारांनीं जग भरलेंच आहे.

## मद्यपान !

खाण्यास उत्तम, मधुर, पंचज्ञानेंद्रियांस तुष्ट करून शरिरास पुष्ट करणारे हजारों पदार्थ ईशसृष्टि ( निसर्गतः उत्पन्न झालेली ) आणि जीवसृष्टि ( कृत्रिम ) ह्याच्या संमेलनानें सिद्ध असतां त्यांचा परित्याग करून शरीर, अब्रू, ज्ञान, धन आणि सुकृत ह्या सर्वांची धुळधाण करून टाकणाऱ्या दुर्गतीच्या माउलीची ( दारूची ) सेवा करणारे हजारों लोक आहेत. नाच, तमाशे, छकडी ह्यांच्यापायीं घरादारांचा फडशा उडवून विपत्तींत पडून जन्मभर दुःखसागरांत मग्न होणारे कांहीं कांहीं सांपडतात. तात्पर्य छंद हा केवळ अंध आहे, त्याला बरेंवाईट कांहींच कळत नाहीं.

## देवही छंदानुगामी !

यःकश्चित् माणूस आपल्या छंदानें भलत्या गोष्टीस मोहून जातें, ह्यांत कांहीं नवल नाहीं. वैकुंठ, कैलास यांसारखीं स्थानें, रमा, उमा यासारखीं कलत्रें, इंद्रासहि अष्टदिक्पाळ पायांस लागतात असलें ऐश्वर्य आणि षड्गुणैश्वर्यसंपन्नता असतांही हरिहर संतुष्ट न होतां, केवळ छंदानुगामितेनें भक्तांच्या अधीन झाले आहेत. अठरा पुराणें हीं भगवंताच्या ह्या भक्ताधीनतेचें वर्णन करून समाधान पावलीं नाहींत. भक्तिसंपन्नता होण्याचा उशीर कीं भगवान झालेच वेडे. मग त्यांस त्या भक्ताचा दुसरा कोणचाही कमीपणा दिसत नाहीं. शबरी, गज, गणिका, कुब्जा, अजामिल, व्रजवधु असले अनंत भक्त पूर्वयुगीं झाले. विठूरायाच्या या युगांतलि भक्तांनीं तर कमाल केली. मेलेलीं गुरें सुद्धां खासा स्वारींनीं ओढिलीं. शंकर बोलून चालून भोळे, पार्वतीसुद्धां देण्यास चुकले नाहींत. किरात काय, महानंदा काय, गलितकुष्टि काय, सर्व सारखें आवडलें. हरिहरांनीं त्या भक्तांचें काय बरें पाहिलें ?

## आनंद हाच सर्वांचा हेतु !

तात्पर्य, सामान्य नरापासून तों हरिहरापर्यंत ज्याची त्यास आवडच गोड आहे. कोठें तरी गुंतून रहावें हा मनाचा धर्म आहे. वरील विवेचनावरून, व्यक्ति-

मात्र निरनिराळ्या व्यवसायांत गुंतलेल्या दिसतात खरे, पण विचार करून पाहिलें असतां सर्वांचा हेतु सुख व आनंद प्राप्त व्हावा हाच आहे.

## विश्वनृत्य !

पूर्वी गोकुलामध्यें विश्वात्मा नृत्य करूं लागला, तेव्हां चराचर नाचूं लागलें; तो चमत्कार आज कोणासही दिसणार नाहीं. पण हें विश्वाचें नृत्य सदा सर्वकाल चालू आहे, तें ज्ञानदृष्टीनें पाहील तो धन्य. आपण विश्वांतच आहों. म्हणजे भवसमुद्रांतच गटांगळ्या खात आहों. त्या खातां खातां ह्या समुद्रांतलि पृथ्वी, विषय, नरतनु, संसार, मन, सुखदुःखें इत्यादि विषयांचें मंथन करून दैववशात गुरुकृपेची नौका सांपडली तर पैलतीरीं जाऊन ब्रह्मीं लीन होऊं या.

---

# भाग तिसरा.

## पृथ्वीप्रशंसा.

**समुद्रवसने देवि पर्वतस्तनमंडले ।**
**विष्णुपत्नि नमस्तुभ्यं पादस्पर्श क्षमस्व मे ॥१॥**

आभासास खऱ्याचा आधार पाहिजे. पंचविषय मिथ्या; मायाजाल मिथ्या; त्यांचाच कोशप्रपंच, अर्थात् तोही मिथ्याच ! ज्याच्याकरितां प्रपंच तो देहही मिथ्या, तो धारण करणारी धरित्री मिथ्या, सकल विश्वही मिथ्या. म्हणजे शून्यांची बेरीज असो, वजाबाकी असो, गुणाकार असो, सर्व शून्यच. आकाशीं दिसणारें गंधर्वनगर किंवा मृगजल ह्याप्रमाणें हा सर्व पसारा आहे असें म्हणतात. पण सगळें मिथ्या आहे म्हटलें तरी भासमान स्थितींत तरी अस्तित्व त्यास आहेच. गंधर्वनगर, मृगजल, शुक्तिरजत या गोष्टी वायां भ्रामक जरी आहेत, तरी त्या भासण्यास कांहीं खरी वस्तु असावीच लागते. आकाशावांचून गंधर्वनगर दिसावयाचेंच नाहीं. भूमि आणि प्रखर ऊन ह्यांजवाचून मृगजलाचा भास होतच नाहीं. शुक्ती-( शिंप-) वांचून रजताचा भास आणि रज्जू-

वांचून सर्पाचा भास व्हावयाचाच नाहीं. मिथ्या विश्वाचा भास कांहीं तरी सत्य वस्तु असल्यावांचून व्हावयाचाच नाहीं हें सिद्धच आहे.

## आधाराचा थांग.

विश्वाला कांहीं खऱ्या वस्तूचा आधार असलाच पाहिजे हें सिद्ध झालें. त्यापेक्षां आतां त्या आधाराचा थांग लावण्याचा यत्न करूं. सगळ्या विश्वाशीं आपल्यास काय करावयाचें आहे? आपल्यास आधार देणाऱ्या भूमंडळाचाच आपण विचार करूं म्हणजे झालें. सगळ्या पृथ्वीवरील पदार्थांच्या प्राणी, उद्भिज्ज आणि खनिज ह्या तीन कोटी मानिल्या आहेत. सूक्ष्म विचार केला म्हणजे ह्या तिन्ही कोटींतील वस्तुमात्र एकाच द्रव्यानें बनलेलें आहे. जेवढें म्हणून मूर्त आहे तें सर्व पृथ्वीच्या अंशानें बनलें आहे. त्यांत मोठा भाग पृथ्वीचा आहे. शिवाय अप्, तेज, वायु, आणि आकाश हीं तत्त्वें वस्तुमात्रांत न्यूनाधिक प्रमाणानें आहेत. सर्व सृष्टि पंचमहाभूतात्मक आहे. पंचमहाभूतें आपल्याला निरनिराळीं स्वतंत्र जरी वाटतात, तरी तीं भिन्न नसून एकाच तत्त्वापासून वंशसरणीनें झालेलीं आहेत. चारी भूतांस आपल्यांत वागविणारें आकाश सर्वांचें मूळ आहे. ह्याच्यापासून वायु उत्पन्न झाला. त्या वायूपासून अग्नि आणि अग्नीपासून अप् व अपापासून पृथ्वी निर्माण झाली. पृथ्वीपासून वर सांगितलेल्या तीन कोटि उत्पन्न झाल्या.

## गुणधर्म.

वर लिहिल्याप्रमाणें पंचमहाभूतें झालीं, तरी त्यांच्या लीला सुरू होण्यास सत्त्व, रज व तम ह्या तीन गुणांचें मिश्रण व्हावें लागलें. हे आठ प्रकार निरनिराळे सांगितले तरी हे सर्व प्रकृतीचे गुण आहेत, म्हणजे सर्व पसारा हा प्रकृतीचा आहे. प्र=विशेष+कृति=करामत=विशेष करामत. तस्मात् ती स्वतंत्र नव्हे कोणाची तरी असली पाहिजे म्हणजे ह्या प्रकृतीचें सुद्धां नियमन करण्यास नियंता पाहिजेच आहे. तो नसेल तर कांहींच व्हावयाचें नाहीं. ही नुसतीं ब्रह्मांडें निर्माण करिते; पण पुढील खेळ करणारा नसता, तर ती अस्ताव्यस्त आणि अचेतनच राहती. ह्या ब्रह्मांडामध्यें आणि प्रकृतीमध्यें ब्रह्म किंवा परमात्मा ह्याचा अंश प्रकट होतांच विश्व उदयास

येऊन त्याची लीला चालू झाली. मूर्तामूर्त अखिल वस्तूंमध्यें हें चैतन्य वास करून सर्व कांहीं नियंत्रितपणानें चालवीत आहे. ह्या चैतन्यासच गुण-धर्म म्हणतात. जड बाधांचा नेचर ( निसर्ग )तेंच चैतन्य होय. आतां, चैतन्य-रूपी गुणधर्मांचा संबंध निर्विकार ब्रह्माशीं कसा आहे आणि सृष्टीशीं व विश्वाशीं कसा आहे, प्रत्येक वस्तूशींच काय पण परमाणूपाशीं कसा आहे, ह्याचें विवेचन करण्याचें स्थल हें नव्हे, म्हणून आपल्या विषयापुरतें इतकेंच विवेचन पुरे आहे.

## आनंदमय पृथ्वी !

हवा, पाणी, भूमि आणि बीज ह्या कारणांपासून उद्भव पावणाऱ्या वनस्पती-मध्यें त्या सर्व कारणांचे अंश वास करितात. जननीजनक ह्यांच्या शरीराचे वर्ण, सुदृढपणा किंवा रोग आणि स्वभाव हीं संततीमध्यें अंशमात्र उत्पन्न होतात. कव-डशामध्यें रवितेज आणि उष्णता असते, हें अनुभवसिद्ध आहे; त्यापेक्षां सच्चिदानंद परब्रह्मापासून त्याचा अंश चैतन्य ह्यानें युक्त जी सृष्टि निर्माण झाली, तिजमध्यें सत् म्हणजे अनाद्यंतता, चित् म्हणजे ज्ञान व आनंद ह्याचा वास असलाच पाहिजे. पुढें सृष्टि क्षणभंगुर असल्याचें प्रतिपादन केलें आहे, तें तिच्या लयाच्या संबंधानें आहे. प्रळयकाळीं तिचा लय होतो. लय म्हणजे संपूर्ण नाश नव्हे. गोगलगाय ज्याप्रमाणें आपलें अंग आकुंचित करिते किंवा कांसव आपली मान आंत घेतें, त्याप्रमाणें प्रळयकाळीं पृथ्वी आपल्या बीजरूपीं प्रविष्ट होऊन परमात्म्याच्या उदरीं लीन होते, आणि पुनः पूर्ववत् प्रकट होते, असा तिचा क्रम चाललेला आहे. भूमीं छाया ज्याप्रमाणें जन्मापासूनच आहे, त्याप्रमाणें ब्रह्मीं माया आहे. म्हणजे ब्रह्माप्रमाणेंच सत् आहे; चित् म्हणजे चैतन्य तिजमध्यें वास करीत आहे; आणि ती केवळ आनंदरूप आहे. मुळीं आनंदासाठींच सृष्टि ब्रह्मापासून उत्पन्न झाली आहे. ब्रह्म एक आणि अद्वितीय असतां क्रीडा करण्याच्या इच्छेनें त्यास बहुभवेच्छा झाली. तेव्हां प्रकृति उत्पन्न होऊन तिच्या द्वारें पूर्वीं वर्णन केल्याप्रमाणें सृष्टि निर्माण झाली. तस्मात् ती आनंदमयच असली पाहिजे हें स्पष्टाहून स्पष्ट आहे. **सृष्टि व तिचें पतिचैतन्य—विष्णु** ह्या मातापितरांस प्राणिमात्राची

केवढी कळकळ आहे, प्राणिमात्रावर त्यांचे किती उपकार आहेत, ह्याचा आणि सृष्टि आनंदरूप कशी आहे ह्याचा विचार करूं.

## अतर्क्य योजना !

प्रभूची शक्ति, युक्ति आणि लीला केवळ अगाध आहे. सृष्टीमध्यें अनंत योनींत जन्म पावलेले अणुरेणु—परमाणु यांपासून ब्रह्मदेवापर्यंत सचेतन, आणि रजःकणापासून मेरुमंदरांपर्यंत स्थावर प्राणी आणि आठरा भार उद्भिज्ज प्राणी ह्या सर्वांस, त्यांच्यामध्यें कित्येकांचें एकमेकांशीं हाडवैर असतांही आयुर्मर्यादेपर्यंत कांहीं धक्का न लागतां सृष्टीमध्यें स्वानंदानें विहार करून आयुष्यक्रमण करण्यास लागणाऱ्या एका तरी गोष्टीची वाण प्रभूंनीं राहूं दिली आहे काय ? केवढी अतर्क्य योजना दूरदृष्टीनें करून ठेविली आहे पहा ! पुढें प्राणी जन्मास येणार, त्याच्या जीवनार्थ आगाऊच मातेच्या ठिकाणीं दुधाची उत्पत्ति करून ठेविली आहे. भर उन्हाळ्यांत पाण्यावांचून तरुवरावर पालवी फुटण्याची करामत करून ठेविली आहे. पाषाणोदरांत जन्म पावून वास करणाऱ्या मंडुकास तेथेंही जल निर्माण करून ठेविलें आहे. पक्षिगण आणि वनपशु ह्यांचें भक्ष्य त्यांस आयतें मिळण्याकरितां भरपूर भरून ठेविलें आहे. मृगराजाचा आहार बहुमोल गजराज असतांही मृगराजास उपासामुळें मरण्याचा प्रसंग कधीं येत नाहीं. संततीचें पालन पोषण व संगोपन होण्याकरितां अज्ञान पशु-पक्ष्यांसुद्धां सर्व प्राण्यांच्या जननीच्या ठिकाणीं विलक्षण मोह व वात्सल्य उत्पन्न करून ठेवून अजब करणी करून ठेविली आहे. ज्याच्या त्याच्या प्राप्त-स्थितींत सुखासमाधानानें राहतां यावें म्हणून अंगचेंच लोंकरीचें किंवा दुसऱ्या प्रकारचें त्याच्या बचावास बरोबर उपयोगीं पडण्याजोगें आच्छादन निर्मिलें आहे. सर्वांच्या जीवनास जीवन पाण ( पाणी ) अवश्य आहे, म्हणून त्याचा संचय सर्वत्र विपूल करून ठेविला आहे. मनाला थक्क करून टाकणारा चमत्कार पहाः— भूमंडळावरील सर्व पाण्याचें सांठवण जो सागर, तोच पुनः भूमंडळावर जलवर्षाव होण्याचें साधन झाला आहे. मानवीचातुर्यानें पुष्कळ प्रकारचीं कारंजीं होतात; पण कारंजें तेंच जलसंचयाचें स्थान, तेंच जलोत्पत्तीचें आणि जलवर्षावाचें साधन, अशा विलक्षण कारंजाची

कल्पना सुद्धां कधीं कोणाच्या मनाला शिवली नाहीं! अक्कल गुंग करणारा दुसरा चमत्कार ह्या जलयंत्रांत असा आहे कीं, ह्यांत संचित होणारें जल गोडें असून ह्यांत प्रविष्ट होतांच इतकें खारट होतें कीं, त्याच्यापासून सर्वत्रांच्या जीवनास अवश्य असलेलें मीठ होतें. तेंच पाणी पुनः मेघाच्या मुखीं पडलें कीं क्षाररहित आहे तें आहेच!

## सृष्टीचें संपूर्ण ज्ञान होणें अशक्य.

सृष्टिरचनेस अगण्य काळ झाला, त्यांत प्रतिसृष्टि करणारे पुष्कळ आर्य-महर्षि होऊन गेले. सध्यांही आपल्या शोधकबुद्धीच्या बलावर आर्यत्व पावलेले पुष्कळ विद्वन्मणि प्रकाशत आहेत. पण आपल्यास सृष्टीच्या सर्व चमत्कारांचें म्हणावयाचें धाडस एकानेंही केलें नाहीं व पुढेंही कोणास करवणार नाहीं. सृष्टीच्या अंतापर्यंत सुद्धां सृष्टीचें संपूर्ण ज्ञान कोणासही होणार नाहीं. अखिल सृष्टीचें न होवो, पण एका पदार्थाचें सुद्धां संपूर्ण ज्ञान कोणास होणार नाहीं. त्याचे सगळे गुणधर्म कळणार नाहींत. आज जो पदार्थ यःकश्चित् मानला आहे, त्याच्यापासून पुढच्या घटकेस कोणा शोधकास काय उपयोग दिसून येईल ह्याचा मुळींच नेम नाहीं.

## नवीं नवीं साधनें.

विश्वभरणाची त्याच्या जनकास केवढी काळजी आहे, पहा—सदा वर्धमान आणि अकुंठित अक्कल मनुष्यास देऊन तिच्या द्वारें नित्य नवीं साधनें सदा वाढणाऱ्या प्राणिसंख्येच्या निर्वाहाकरितां प्रभु मनुष्यास उपलब्ध करून देत आहेत. ह्या साधनांचा साठा दूरदृष्टीनें प्रभूनीं पूर्वींच कसा करून ठेविला आहे पहाः शेंदोनशें वर्षांमागें बाष्पबलाची कल्पना सुद्धां कोणास नव्हती. गेल्या शतकांत त्याचा इतका प्रसार झाला कीं, त्या शतकास बाष्पबलाचें शतक म्हटलें तरी चालेल. ह्या वाफेच्या यंत्राच्या आहाराची तजवीज प्राचीन काळीं रानेंचीं रानें दग्ध करून भूम्योदरीं दगडी कोळसा भरून केली आहे. आतां तो सरण्याची भीति भासूं लागली न लागली, तों विद्युच्छक्तीची स्फूर्ति मनुष्यास झाली आहे. चालू शतकांत बाष्पबलावर अवलंबून न राहतां माणसें बहुतकरून विद्युच्छक्तीच्या आराधनानेंच आपली सुखसमृद्धि करून घेतील. पूर्वींच्या

लोकांच्या स्वप्नीं सुद्धां वाफ किंवा विद्युत् ह्या शक्ति आल्या नव्हत्या. त्याप्रमाणेंच, आपल्या कल्पनेला कल्पितां सुद्धां येणार नाहीं अशी एखादी निराळीच शक्ति भावी शतकांत नारायण मानवांस अर्पण करितील. पुराणांतरीं वर्णिलेल्या अद्भुत गोष्टी आज कित्येकांस मिथ्या वाटत आहेत; पण त्याच कदाचित् भावी शतकांत अनुभवास न येतील कशावरून! नुसत्या शब्दाच्या ह्मणजे मंत्राच्या अंगीं असलेलें विलक्षण सामर्थ्य कदाचित प्रकट होऊन मंत्रावरच मानवी सुखाच्या समृद्धीची सोय होईल; अन्य गोलांवर जाण्याचे मार्ग कळून येतील! काय होईल ह्याची कल्पना आज होणें शक्यच नाहीं. मनुष्याच्या अकलेंत जिज्ञासा म्हणून एक धर्म आहे, त्याच्या योगानें मनुष्याची एकसारखी उन्नति होत आहे.

## प्रभुलीला अनंत.

मानव यःकश्चित पामर होत. प्रत्यक्ष वेदांस सृष्टीचा म्हणजे भगवंताच्या लीलांचा अंत लागला नाहीं. नेति नेति म्हणून हात टेकावे लागले. शास्त्रें तर शेवटपर्यंत अपुरींच राहणार! दशशतवदन शेष दोन हजार जिव्हांनीं प्रभुलीलांचें वर्णन करून शिणला, तरी अंत लागला नाहीं. हिमालयासारख्या काजळाच्या राशी महासागरांत घालून शाई बनवून आठराभार वनस्पतींच्या लेखण्या करून साक्षात् वाग्देवी आकल्पपर्यंत भूमिपत्रावर प्रभुलीला लिहिण्यांत गर्क झाली, तरी तिलाही प्रभुलीलांचा अंत कळणार नाहीं.

## सृष्टिसौंदर्य!

आतां भूमिमातेचा विचार करूं. ही भूमिमाता किती रम्य आहे! पावसाळ्या दिवसांत जिकडे तिकडे हरिततृणसस्यांकुरवती झाली म्हणजे गुरांढोरांस केवढा सुकाळ व आनंद होतो. हिरव्या चार गवताचा जणु हिरवा गालिचा पसरल्याप्रमाणें हिची शोभा पाहून माणसांचीं मनें किती तरी आल्हादित होतात. सृष्टीची शोभा व सौंदर्य ह्यांचें कोठवर वर्णन करावें! सरोवरें, नद्या, पर्वत, अरण्यें, सागर, शहरें, व त्यांमध्यें मानवी कारागिराच्या झालेल्या शिगलोटी, लेणीं, राया, पशुपक्षी अशा शेंकडों ठळक गोष्टी व त्यांच्या अंगभूत आणखी गोष्टी व त्या सर्वांचे अवयव

अशा सहस्त्रशः चीजा आहेत. त्यांचीं वर्णनें करण्याचें हें स्थळ नव्हे म्हणून ह्या सर्व प्रकारांनीं सृष्टि आनंदपरिपूर्ण झाली आहे इतकें सांगितलें म्हणजे बस आहे.

## मातेपेक्षां भूमीचे उपकार अनंत!

ह्या भूमातेचे उपकार आपल्यावर अनंत आहेत. ह्या जन्मींच्या माता मुलांची हलाल चाकरी करितात ही गोष्ट त्यांच्या अनेक उपकारांपैकीं आहे. परंतु भूमातेची योग्यता जननीस मुळींच येत नाहीं. भूमाता आम्हांस सदा सर्वकाळ आपल्या अंगावर वागविते. नवमास नाइलाजास्तव भार वाहणारी जननी हिची सर कशी पावेल? सज्ञान होईपर्यंत पोषण—तेंही पुढें वृद्धपणीं मुलापासून मोबदला मिळेल म्हणून करणारीं मातापितरें कोणीकडे, आणि मोबदल्याची कल्पनाही नसतां केवळ पोषण व्हावें म्हणूनच पोषण करणारी भूदेवी कोणीकडे, बाळांनो, तुम्ही आपले देहधर्म मजवर करितां त्यांजपासून होणारें अत्यंत घाणेरडें खत वाया दवडूं नका. मला आर्पण करा. आणि मजमध्यें उदीम करा. म्हणजे मी त्यांचें चांगलें रूपांतर करून तुम्हास मोगरा, मोतीया वगैरे सुवासिक पुष्पें देईन. हरिदीनीच्या दिवशीं फराळ करण्यास पवित्र कंदमुळें, फळें देईन. तुमच्या निर्वाहाची सर्व सोय लावून देईन. तुम्ही मला फाडा, चिरा, माझें खोल विदारण करा, जों जों अशा प्रकारें माझा छळ कराल, तों तों मी तुमची सुखसमृद्धि करीन. "पुत्राचे सहस्त्र अपराध माता काय मानी तयाचा खेद" तुम्ही माझ्यावर रूळ घाला, गाड्या चालवा, खाणी खणा, जें जें वाटेल तें करा. चांगली योजना करून केलेंत म्हणजे मी प्रसन्न होऊन तुमचें कल्याणच करीन. असें म्हणणारी ही प्रत्यक्ष क्षमेची मूर्ती क्षमा होय. हिचे उपकार फेडण्याची गोष्ट तर दूरच, पण हिचे उपकार वर्णन करण्याचेंही मनुष्यास सामर्थ्य नाहीं.

## तीर्थें व क्षेत्रें.

सर्व सृष्टीचा भार ह्या भूदेवीस सहन होतो. परंतु एका गोष्टीच्या भारास मात्र ती त्रासते. तिला पापाचा भार सहन होत नाहीं. या युगांतील माणसें तर पापाचीं मंदिरें. म्हणून परमेश्वरानें ह्या भूदेवीवर पापक्षा-

लनाकरितां, गंगा, सिंधु, सरस्वति, यमुना इत्यादि पुण्य नद्या जागजागीं निर्माण केल्या आहेत. त्याप्रमाणेंच क्षेत्रेंही केलीं आहेत. मोक्षपुऱ्या, धामें, बाराज्योतिर्लिंगें, अष्टविनायक, भूवैकुंठ पंढरी अशीं शेंकडों तीर्थें व क्षेत्रें आहेत. भाविक श्रद्धाळु माणसें अनन्यभावानें ह्या क्षेत्रीं आणि तीर्थीं स्नानें, दानें इत्यादि पुण्यें करून भूमातेचा पापभार हलका करितात.

## साधु.

ह्या तीर्थांस सुद्धां या युगांतील माणसांच्या पापाचा भार दुर्धर होतो, ह्मणून त्यांच्या पापक्षालणार्थ नारायणांनीं साधूंची योजना केली आहे. पापीमाणसांनीं तीर्थांत स्नानें केलीं ह्मणजे त्यांचें कालिमल क्षालन होतात साधूंचें स्नान तीर्थांत झालें ह्मणजे तीर्थांचें पापक्षालन होऊन तीं पावन होतात. अन्य धर्मांच्या लोकांचीही पुण्यक्षेत्रें भूमंडळावर पुष्कळ असून, त्यांचा फायदा ते आपल्या शास्त्रांस अनुसरून घेत आहेत.

## मृत्युहि सुखप्रद.

या लोकास मृत्युलोक म्हणतात. मृत्यु तर भयसीमा आहे. ह्यासाठीं ह्या लोकास आनंदमय कसें ह्मणावें? अशी शंका सहजच येते. पण पुष्कळ गोष्टींविषयीं आपली विपरीत समजूत झालेली आहे. त्याप्रमाणेंच मृत्यु-विषयींही झाली आहे. नीट विचार करून पाहिलें असतां मृत्यु चांगलाच आहे. फार दिवसांच्या कारणानें देहास जीर्णता न येतां सदा सर्वकाळ नवाळी रहावी, नेहमीं उत्साह रहावा, थकल्यामुळें त्रास न व्हावा, सर्व गोष्टी ताजातवान्या असाव्या म्हणून जीर्ण देहाचें विसर्जन होण्याकरितां सर्व वस्तूंच्या मागें लय लाविला आहे. लय दुःखाकरितां लाविला नसून आनंदाकरितांच लाविला आहे. म्हातारपण किती क्लेशकारक आहे, ह्याचा अनुभव ज्यास तें प्राप्त होतें त्यांसच विचा-रावा. बालपणीं जितकीं मुलें पंगु असतात तितकीं वृद्ध माणसें पंगु होतात. पण मु-लाच्या अगांत तरतरी, नवाळी, अज्ञान, अननुभव, उत्साह, उमेद; इत्यादि गुण अस-ल्या कारणानें व मातापितरांस त्याच्याविषयीं विलक्षण मोह असल्याकारणानें त्याचें संगोपन उत्तम प्रकारें होतें. त्या लेंकराकडून पुढें क्रमुक्रम सुखप्राप्तीची आशा असते. वृद्धाचा सर्व प्रकार उलट असतो. त्यांस मरण लवकर यावें असें तेच

इच्छीत असतात, मग परिवार इच्छील ह्यांत काय नवल आहे. असळें हें कुत-रपण टाळणारा मृत्यु सुखप्रद कसा नव्हे ? जीर्ण वस्त्रांतर करण्याप्रमाणें मरण आहे, त्यांत वाईट तें काय ? त्याची कल्पना येण्याबरोबर थरकांप कां व्हावा ? या लोकाचें यथार्थ रम्य नांव कर्मभूमि हें आहे. शिवाय मृत्यूच्या कारणानें पृथ्वी आनंदमय मानण्यास शंका घेणेंही योग्य नाहींच. विश्वरचनेंत परमेश्वरानें कांहींच चिरंतर ठेविलें नाहीं. स्वर्गपातालादि लोकांत तरी अमरत्व कोठें आहे ? अमर म्हणविणारे तेथील लोक तरी निर्भय कोठें आहेत ? पुण्य-क्षय होतांच त्यांसही पुनः मृत्युलोकीं आलेंच पाहिजे; म्हणजे ते तेथें आपल्या पुण्याचा क्षय करीत आहेत, आणि पुनः कर्माची कमाई करण्यास या लोकीं येण्याची वाट चालत आहेत.

## कमाईची जागा.

कर्म करून नवीन पुण्यपापांची कमाई करण्याची जागा काय ती येथेंच आहे. ह्या लोकाचा अधिकार इतका आहे कीं, वैकुंठ, कैलास या ठिकाणीं जाण्याचे रस्ते येथें आहेत. ब्रह्मीं ऐक्य होण्याचा अधिकार येथेंच. मनुष्य प्राणी श्रेष्ठ स्वर्गादि लोकांस मानितात, पण ते लोक म्हणजे येथील कमाई संपविण्याचीं स्थल होत तेथें नवें संपादन होणें नाहीं. म्हणूनच

**स्वर्गींचे अमर करिताती हेवा ॥**
**मृत्युलोकीं व्हावा जन्म आम्हां ॥ १ ॥**
( तुकाराम. )

## मनुष्यांनीं वाढविलेली रमणीयता.

अशी ही पृथ्वी आनंदरूप असून तिला आणखी आणखी रमणीय करण्याची मनुष्याची खटपट अनादिकालापासून एकसारखी चालली आहे. यामुळें, 'आधीं सोन्याचें आणि त्यांत जडावाचें' म्हणतात त्याप्रमाणें ही रमणीयता शिगेस गेली आहे. हिला ज्याच्या पराक्रमाच्या कारणानें 'पृथ्वी हें नांव प्राप्त झालें' त्या पृथुराजानें प्रथम हिची साफसफाई करून हिचें दोहन केलें, आणि ही मनुष्याच्या कल्याणास उपयोगीं पडण्याजोगी केली. तेव्हांपासून आजपर्यंत मनुष्य आपलें ज्ञान, आपली करामत, आपलें शरीर आणि आपले आयुष्य हिची रमणीयता आणि उपयुक्तता वाढविण्याकडे खर्च करीत आहे. लोहमार्ग, तारायंत्रें, किल्ले, कोट,

कालवे, मनोरे, देवालयें, लेणीं, बागबगीचे, क्रीडाभुवनें, राजवाडे, मंदिरें वगैरे कोट्यानुकोटि अलंकार हिच्यावर नित्यशः चढत आहेत. वाड्यातोड्या, खेडीं-पाडीं ह्यांच्या रचना, आणि गांवें, शहरें ह्यांच्या रचना यांजमध्यें केवढें अंतर आहे! नंदनवनतुल्य लंदन, पारिस इत्यादि इंद्रभुवनें आल्या कोठून दृष्टीस पडणार? पण आपली मुंबापुरी पहा: आज सुवर्णाची (चांगल्या रंगाची) झाली आहे. थोड्या वर्षांपूर्वीचें पुणें आणि आजचें पुणें ह्यांत रमणीयपणाच्या संबंधानें केवढें थोरलें अंतर पडलें आहे. असो. अशी ही आनंदमय पृथ्वी पंचविषयांनीं परिपूर्ण आहे. ते पंचविषय किती बहारदार आहेत, ह्याचें वर्णन पुढील भागांत करूं. ह्या भूमातेस 'पादस्पर्शं क्षमस्व मे', असें वंदून हा भाग संपवितों.

---

# भाग तिसरा.

## विषयप्रशंसा.

### शब्दब्रह्म.

अब्धौ विधौ वधुमुखे फणिनां निवासे ॥
स्वर्गे सुधा वसति वै विबुधा वदंति ॥
क्षारं क्षयं पतिसृतं गरलं पतंतं ॥
कंठे सुधा वसति वै खलु सज्जनानां ॥ १ ॥

(सुभाषित.)

### शब्दानुपमेयता.

शब्द हा विषय—महाभूतांपैकीं श्रेष्ठ जें आकाश त्याचा होय. पांचही विषयांत हा अग्रस्थान पावला आहे. ह्याची महती वर्णन करण्यास कोण समर्थ आहे? ह्याचें वर्णन करील तर हाच म्हणजे शब्दच करील. परंतु ह्याचें वर्णन करण्याचें सामर्थ्य ह्याच्याही अंगीं नाहीं. जें शब्दब्रह्म म्हणजे प्रत्यक्ष प्रणव ॐकार त्या ब्रह्माचें महत्व कळण्यास त्यास व उपमा देण्यास दुसरा पदार्थ नाहीं. सर्व ज्ञानाचें आदिभांडार

श्रुति ह्या शब्दमय, स्मृति शब्दमय, पुराणें शब्दमय, शब्दावांचून काय तरी आहे. 'सच्चिदानंद' या ज्ञानसागरांतील शब्दामृत गुरूंच्या अंतःकरणरूप आकाशांत मेघरूपानें अपार पसरलेलें असतें. प्रवृत्ति व निवृत्ति ह्या मार्गांतील अपार माहिती आणि शेवटीं ब्रह्म प्राप्त करून देणारें गुह्य प्राप्त होण्यास शब्दाचाच पर्जन्य ज्ञानेच्छूंच्या अंतःकरण-भूमीवर पडला पाहिजे. शब्द ही देणगी ज्या स्वरूपाची आहे, त्या स्वरूपाची नसून पशुपक्ष्यांप्रमाणेंच मनुष्याचे शब्द असते, तर आज मनुष्यांच्या आणि इतर प्राण्यांच्या स्थितींत कांहींच अंतर नसतें; सर्व भूमंडल केवळ एक मोठें अरण्यच राहिलें असतें. मानव प्रथम उत्पन्न झाला त्या वेळीं ज्या अवस्थेंत होता, त्याच अवस्थेंत कल्पपर्यंतही राहिला असता; सृष्टीमध्यें असलेले अनंत पदार्थ आज आपल्याला दिसतात, त्यांतील पुष्कळ मनुष्यांच्या करामतीनें होतात, ते मुळींच उत्पन्न झाले नसते; मिश्रणक्रियेनेंच सृष्टींत पदार्थादिकांची अत्यंत भर पडली. नानाविध शोध झाले. चौदा विद्या व चौसष्ट कला निर्माण झाल्या, त्या सर्व ह्या शब्दाच्याच कृति होत. मनुष्य मूळ निर्माण झाल्यापासून आजपर्यंत जे जे ज्ञानी नरवर उत्पन्न होऊन लयास गेले, त्यांचें ज्ञान त्यांच्या जड देहाबरोबर अस्तास गेलें असतें; पण शब्दानें आपल्या विलक्षण सामर्थ्यानें तें ज्ञान मृत्यूपासून हिरावून घेऊन फक्त हाडामांसांचें सापळें मात्र त्याच्या हवालीं केले. एकीवर एक अशा पायऱ्या बांधून ज्याप्रमाणें पर्वतावर माणसें चढतात, त्याप्रमाणें अनादिकालापासून जे ज्ञानी पुरुष झाले, त्यांनीं आपल्या काळीं आपल्या ज्ञानाच्या पायऱ्या आपआपल्यापरी या शब्दांनींच बांधून ठेविल्या. त्या पायऱ्यांवर पुढील ज्ञानी आरूढ झाले. अर्थात तेथपर्यंत उंचीच्या मार्गाचें आक्रमण त्यांस अनायासें करतां आल्यामुळें त्यांच्या कालाचा व बुद्धीचा तितका व्यय होणें टळून तो काल व बुद्धि हीं त्यांस एक पायरीवर चढविण्यास उपयोगीं पडून मानवी ज्ञान एकसारखें वाढत आहे, ह्यास कारण शब्दच आहे.

## अमृताचें विलासमंदिर.

सगळ्या पदार्थांमध्यें आनंददायक अमृत होय. तें अमृत समुद्र, चंद्र, ललनामुख, नागलोक आणि स्वर्ग यांमध्यें आहे असें पुराणांतरीं म्हटलें आहे. तें खरें असतें, तर समुद्रामध्यें अमृत असतां समुद्राचें पाणी खारट कसें असतें? चंद्राचे ठिकाणीं प्रत्यक्ष अमृत असतें, तर तो क्षयी कसा असता? कामिनीवद्

नामृत निश्यशः प्राशन करणारा पति मरतो हें केवढें आश्चर्य आहे ! नागाच्या ठिकाणीं तर प्रत्यक्ष विष वास करीत आहे. तेथें अमृताचा वास अशक्य होय. स्वर्गात अमृत असतां स्वर्गस्थांस पतन कां? तस्मात् तेथें अमृत आहे म्हणण्याचा अर्थ इतकाच कीं, त्या जागा रमणीय आहेत, मृत्यूची वार्ताही नाहींशी करणारें तेंच खरें अमृत होय. तें फक्त सज्जनांच्या शब्दांत मात्र वास करितें. त्यांनीं ( शब्दांनीं ) जन्ममरणापासून मनुष्य मुक्त होतो. हा शब्दाचा प्रभाव लहान आहे काय ?

## ज्ञानामृतसागर.

जेवढे म्हणून तरून गेले आहेत त्यांस तारक सज्जनकंठांतील उपदेशामृत झालें. पांच वर्षांचें अल्लड लेंकरूं ह्याच अमृतानें अढळपद पावलें. वाल्या कोळी ह्या अमृतानें मुनिवर वाल्मीकि झाले. वाल्मीकि, व्यास, शुकशौनकादिक ऋषि, आणि सूत ह्यांनीं ह्या भूमंडळावर ह्या अमृताचे अपार महासागर अठरा पुराणें, उपपुराणें, व्रतें, कथा, महात्म्यें, इत्यादि नामें देऊन तयार करून ठेविले आहेत. भाग्यशाली पुरुष या सागरांत निमग्न होऊन अमोल मुक्तिमौक्तिक पावतात. श्रद्धाहीन अभागी त्यांच्यांतील रस न समजतां आपल्या शीलाप्रमाणें कुतर्क व पाखांड वगैरे भयंकर जलचरांच्या मुखीं पडून नाश पावतात. हे महासागर गीर्वाण भाषेंत असल्याकारणानें व मनुष्याची आयुर्मर्यादा अल्प असल्या कारणानें बहुतेक लोकांस दुर्लभ झाले. म्हणून दयाळू परमेश्वरास त्यांची करुणा येऊन त्यांच्या उद्धाराकरितां प्रभूंनीं मुकुंदराज, ज्ञानराज, नामदेव, तुकाराम, वामनपंडित, मोरोपंडित, नाथ, अमृतराय, कबीर, तुळशीदास, जयरामस्वामी, इत्यादि ज्ञानघन उत्पन्न करून त्यांजकडून भूमंडळावर ज्ञानामृताची वृष्टि करविली. त्या ज्ञानामृत सरितांच्या तोट्या मुद्रणकलेच्या प्रसादानें घरोघरही झाल्या आहेत. त्या तोट्यांतून ही भवमंथन संज्ञक लहानशी गिंडी भरून मी वाचकांस अर्पण केली आहे. हिच्या सेवनानें ज्ञानामृतपानाची चटक लागून वाचकांची तृष्णा वाढत जाऊन ज्ञानामृत सरितांकडे व शेवटीं ज्ञानसागरांकडे वाचकांच्या मनानें धांव घेऊन वाचक ज्ञानामृतसागरविहारी झाले तर मी धन्य होईन.

## शब्दांत दैविक सामर्थ्य.

शब्द म्हणजे अक्षर किंवा अक्षरसमुदाय. शब्दब्रह्माचा अवयव म्हणूनच

कीं काय अक्षर ( नाश न पावणारे ) अशी संज्ञा अक्षरास दिली आहे. अमंत्रो अक्षरं नास्ति हें वाक्य प्रसिद्धच आहे. शब्दांमध्यें दैविक सामर्थ्य आहे हें मंत्रशास्त्रावरून स्पष्ट होतच आहे. या शास्त्रावर सध्यां वरीच अश्रद्धा झाली आहे. आणि ती होण्यास लबाड भोंदू लोकच कारण झाले आहेत. पण शब्दांमध्यें मंत्रसामर्थ्य आहे ह्याविषयीं प्राचीन प्रमाणेंही पुष्कळ आहेत. दैत्यगुरूंचा अमृतसंजीवनी मंत्र पुराणप्रसिद्धच आहे. ब्राह्मणाचा गायत्री मंत्र जगजाहीर आहे. "मंत्राधीनच दैवतः" असें पुरातन वाक्यही सर्वश्रुत आहेच. सर्पांच्या मंत्राविषयीं पुष्कळ दंतकथा आहेत, तस्मात् शब्द ब्रह्म आहे हें निर्विवाद आहे.

शिशुर्वेत्ति पशुर्वेत्ति वेत्ति गानरसं फणीः
साहित्यरसमाधूर्यं शंकरो वेत्ति वानवा ॥
( सुभा. )

इतकी गायनाची महती आहे आणि कला सीमा काव्यं इतकी काव्याची महती आहे. अशा मनोहर व रम्य कला हरिकथा व हरिगुण गाण्याकडे योजिल्या तर केवढें कल्याण होईल. हरिभक्ताला याची विशेष गरज नाहीं खरी. पण ती गोष्ट पूर्णतेस पावणाराची आहे. प्रथम हरिभक्तीकडे मन वेधण्यास जे उपाय करावे लागतात, त्यांत गायन व कविता ह्यांचा उपयोग फार आहे. सुस्वर मंजुळ गायनानें भजन करण्याचा नाद लागतो. तसा नुसत्या उपदेशानें कधींच लागत नाहीं. कैलासवासी विठोबा आण्णा दप्तरदार कऱ्हाडकर आणि हरिभाऊ मोडक नाशिककर ह्यांचे नानार्थात्मक आणि कोट्यांनीं भरलेले श्लोक मार्मिक हरदास मनावर ठसवितात, तेव्हां मन गार होऊन जातें. हे दोन कवि म्हणजे अर्वाचीन चंपुकारच होते.

## वाङ्माधुर्य.

शब्द म्हणजे एक महाशक्ति आहे. हिची सत् किंवा असत् योजना होईल त्याप्रमाणें ही फलद्रुप होते. एकच शब्द नम्रतेनें व गौरवानें बोलला असतां मोठ्या पाषाण हृदयी मनुष्याला सुद्धां पान्हा फुटतो. तोच शब्द उद्धटपणानें तिरस्कारानें उच्चारला असतां सख्खा माऊ किंवा प्रत्यक्ष बाप सुद्धां वैरी होतो. म्हटलें आहे कीं

वाङ्माधुर्यान्नान्यदस्ति प्रियत्वं, वाक्पारुष्याच्चोपकारोपि नष्टः
किं तद्द्रव्यं कोकिले नोनीतं, कोवा लोके गर्दभः स्यापराधः
( सुभा. )

कोकिल कोणास कांहीं देतो काय ? पण केवळ मधुर वाणीला भुलून लोक त्यास चाहतात. बिचारें गाढव जन्मभर माणसांचे कष्ट करतें. तरी तें तिरस्करणीय होतें. म्हणून मनुष्यानें नेहमीं नम्रपणानें गोड बोलावें. म्हणजे शत्रु मित्र होतात. ग्रीस देशांत पेरिक्लीस म्हणून एक राजा होता. तो म्हणे मला लढाया करून जितकीं शहरें मिळालीं त्यापेक्षां माझ्या मधुर वाणीच्या केनीस प्रधानाच्या रसाळ वाणीनें जास्ती मिळालीं.

## वचन.

शब्दावर कोट्यानुकोटि रुपयांचे व्यवहार चालतात. राज्यांच्या घडामोडी होतात. वचन राखण्याकरितां पाहिजे तें संकट सोसावें. धन, दौलत, राज्य गेलें तर पतकरलें, प्रत्यक्ष स्त्री पुत्र गेले तरी पतकरले, प्राण गेला तरी चिंता नाहीं. पण वचनभंग होऊं द्यावयाचा नाहीं. असा पूर्वींच्या श्रेष्ठ राजांचा बाणा असे. गुरूंनीं वामनाचें कपट कळविलें असतांही त्रिपादभूमि भगवच्चरणीं बलीनें अर्पण करून प्रभूंनीं दोन पदांनीं ब्रह्मांड व्यापिलें आणि तिसरे पदास जागा नाहीं. तव्हां आपले मस्तकीं प्रभूंचा तिसरा पाय बलीनें धारण केला. अहाहा, केवढें भाग्य हें ! अशा वचन पाळणाऱ्या सत्वधीराच्या घरीं भगवान द्वारपाळ होऊन राहिले. यांत आश्चर्य तें कोणतें. अहाहा, बलि नामास तोच योग्य!

## हरिश्चंद्र.

राजा हरिश्चंद्र यानें सर्व राज्यलक्ष्मी स्वप्नांत दिलेल्या दानाबद्दल विश्वामित्रास देऊन दक्षिणेकरितां भार्या आणि पुत्र विकून स्वतांसही विकून घेतलें. त्याची कथा श्रवण करितांना श्रोत्यांच्या नेत्रांचें पाणी खळत नाहीं. मग त्या गर्भश्रीमंत राजास ते कष्ट भोगतांना किती यातना झाल्या असतील. ह्याचें अनुमान तरी होणें शक्य आहे काय ?

## दशरथ.

जन्मभर केलेली आशा व्यर्थ होण्याची वेळ आली, शेवटीं म्हातारपणीं पुत्रकामेष्टी यज्ञ करून षड्गुणैश्वर्यसंपन्न श्रीराम पुत्र प्राप्त झाला असतां, तो वैकुं-

ठीचा पाहुणा घरास आला असतां त्याला वनवासास दशरथानें लावावें काय ? पण सूर्यवंशी राजांचे ब्रीदच वचन. तें पाळण्याकरितां

**काय करूं जाय वना, बा यश जोडी करूनी सत्कृत्या ॥**

हे शेवटले शब्द उच्चारून ज्या देहाच्या संरक्षणाच्या लाभाचा मोबदला म्हणून कैकयीला वर दिले होते, तो देह सोडून दिला. असे कैक राजे पुराणांतरीं होऊन गेले आहेत.

## नाना फडनवीस.

स्वराज्यांतील शेवटले प्रधान ब्रह्मवादशाहीचे केवळ भाग्यधातु बाळाजीपंत नानू त्यांचाही वचनाविषयीं बाणा होता. एकदां त्यांच्या मुखावाटें वचन सुटलें कीं ब्रह्म-लिखित. " जो डाव जिंकील त्याला मोत्यांचा तुरा देईन " असें, खेळांत श्रीमंत सहज म्हणाले. पण तें वचन नानांनीं तात्काळच खरें केलें.

## सत्यनिष्ठा.

स्वराज्यहानि झाल्यावरही आपल्यावर जोंपर्यंत पुराणादिक नीतिग्रंथांचा अंमल होता, धर्म व धर्मगुरु यांच्याविषयींची पूज्यबुद्धि कायम होती, वडील माणसें व शिष्ट संभावित माणसें यांची मर्यादा सुटली नव्हती, तोंपर्यंत साधारणतः समाजांतील पुष्कळ लोक सत्यभाषणी होते. खोटें बोलण्यास अडाणी कुणबीधुणवी सुद्धां भीत असत. मग शपथेस थरथरां कांपत यांत नवल नाहीं. साधारण तंटे इमान-प्रमाण करण्यावर तुटत असत. गीता, गंगाजळी, गाईचें शेंपूट यांच्या शपथांवर न्यायाचें कार्य भागत होतें. त्या वेळेच्या सत्यनिष्ठेविषयीं सामान्य लोकांतील एक दोन घडलेलीं उदाहरणें सांगतों.

आमचे वडलांचे वेळीं आमचे घरीं अवल इंग्रजींत नाना जोशी म्हणून एक कारकून होते. त्यांजवर एका कुळास सारा वसूल करण्याकरितां मारल्याबद्दल फिर्याद झाली. मारल्याचें नाकबूल केलें तर शिक्षा होत नाहीं असें कळलें असून त्या सत्यव्रतानें सत्यच्युत होण्यापेक्षां एक महिन्याची कैद पतकरली. श्री. भास्कर मोरेश्वर देव उरळीकर यांच्या मुलाच्या आणि पुतण्याच्या वादांत मुलाचें म्हणणें खोटें म्हटलें तर मुलगा खोट्या प्रतिज्ञेंत जाणार व वाद बुडणार. असा प्रसंग असतां मुलाचें म्हणणें खोटें होतें तें खोटेंच म्हणून सांगण्यास हे सत्यनिष्ठ कचरले नाहींत.

## नाम, कथा आणि नीति.

शब्द विषयाच्या सगळ्या महतीपेक्षां हरिनामें व हरिकथा शब्दमय आहेत हें त्यास श्रेष्ठतम महत्व आहे. नीतिशिक्षण आणि नीतिप्रसार ह्या शब्दांनींच होतो. पूर्वी पहांटे उठून भूपाळ्या स्वतः म्हणून मुलांकडून म्हणवीत असत. प्रातःस्मरण करीत असत. वृद्ध व फुरसतीचीं माणसें देवालयांतून पुराण श्रवण करीत असत. मुलेंबाळेंही त्यांजबरोबर जात. कथा कीर्तनें श्रद्धापूर्वक ऐकत असत. रात्रीं घरोघर त्या पुराणांची व कीर्तनाची चर्चा करीत. संस्कृत अगर प्राकृत पुराणें घरींही वाचीत असत. तेणेंकरून नीतिशिक्षण, नीतिप्रसार अनायासें होत असे. सांप्रत आपल्यावर मुद्रणकलेची कृपा झाली आहे. यामुळें नीतिशिक्षण व नीतिप्रसार झपाट्यानें वाढण्याची सोय झाली आहे. देव देतो पण कर्म नेतें, असा प्रकार झाला आहे. ज्ञान व नीति यांनीं भरलेल्या पुराणादिक ग्रंथांची हेळसांडच नव्हे पण निंदाही ताज्या मनाच्या लेंकरांच्या व चंचल मनाच्या अबलांच्या देखत होते, त्या कारणानें थोरांच्या अनुकरणाचाही दुष्परिणाम घडतो. त्यामुळें सध्यां नीतिभ्रष्ट झाल्याचा बोभाट होत आहे. व शाळांतून नीतिशिक्षण पाहिजे अशी ओरड होत आहे. खरें पाहिलें तर पूर्वी नीतिशिक्षण शाळेंत मिळत नव्हतें, आतां मिळालें तरी घरच्या नीतिशिक्षणासारखा फायदा होणें शक्यच नाहीं. पूर्वीचा वर लिहिलेला सांप्रदाय पुनः सुरू होईल तर मुलांच्या नीतिभ्रष्टतेची काळजीच उत्पन्न होणार नाहीं. मुलांच्या अंतःकरणरूप आरशांत वडलांच्या वर्तनाचें प्रतिबिंब पडतें त्याप्रमाणें त्यांच्या वर्तनाची मूर्ति बनते हें, मात्र विसरतां कामा नये.

## परत ओघ.

सवाई शास्त्रीबुवा ( विष्णुशास्त्री चिपळुणकर ) ह्यांनीं समाजाचा बहकत चाललेला ओघ आपल्या कलम बहादुरीनें आपल्या पवित्र आर्यत्वाकडे वळविल्यापासून त्यांनीं लाविलेला कल्याण कल्पतरू वाढीस लागल्यामुळें समाजाचा ओघ हल्लीं स्वधर्मांकडे बराच वळला आहे.प्राचीन ज्ञानभांडाराविषयीं ओळख वाढूं लागली आहे. पूज्यबुद्धि वाढत आहे.'भगवद्गीता, ज्ञानेश्वरी, भागवत, भारत, रामायण, वेद, उपनिषदें,इत्यादि अमोल ग्रंथांचीं मराठींत भाषांतरें झालीं आहेत. वेदांतासंबंधाचीं अनेक पुस्तकें प्रसिद्ध होत आहेत.पुराणें व कीर्तनें श्रवण करण्याची अभिरुचि वाढली आहे. ह्या गोष्टी मोठ्या आनंदाच्या आहेत. उत्पन्न

झालेले हे सद्धेतु सिद्धीस नेण्याकरितां आपला पूर्वीचा परिपाठ लवकर सुरू होईल तर कुटुंबांतील सर्व माणसांनीं हरिगुण गाइल्यानें व ज्ञान आणि नीतिपरिप्लुत ग्रंथांचें श्रवण केल्यानें कसा महानंद होतो व किती फायदा होतो, याचा अनुभव येईल. कोंवळ्या मनाचीं लेंकरें व चंचल मनाच्या अबला यांच्या हातीं श्रृंगाररसानें व कुटिल नीतीनें भरलेलीं पुस्तकें न देतां ज्ञानभांडारांत त्यांचा प्रवेश करावा हीच समाजास विनंति आहे.

# स्पर्श.

संतचरणरज लागतां सहज। वासनेचें बीज जळूनि जाय॥

तुकाराम.

## मिश्रण.

स्पर्श हा विषय वायु या महाभूताचा आहे. सृष्टीमध्यें कोण तीही वस्तु वायुवाचून नाहीं. त्याप्रमाणेंच स्पर्शावांचून बनलेली नाहीं. स्पर्श म्हणजे संयोग. मुळीं माया आणि चैतन्य यांच्या संयोगानेंच सृष्टी निर्माण झाली. मूळ चैतन्य होय. चैतन्यच गुणधर्म होय. हा धर्म परमेश्वराचा अंश असून एक आणि द्वितिय आहे. वस्तुमात्रांत वास करीत आहे. सर्वांतरयामीं भगवान म्हणतात तो हाच. याच्या प्रेरणेवाचून झाडाचें पान-ही हालावयाचें नाहीं. एकच पाणी सर्व वनस्पतीमध्यें वास करीत असून दर एका वनस्पतीची रुचि निराळी, धर्म निराळे, त्याप्रमाणें एकच धर्म असून अनंत रूपांनीं नटला आहे. त्याच्या निरनिराळ्या रूपांस निरनिराळीं नामें प्राप्त झालीं आहेत. म्हणूनच "अनंतनामी अनंतरूपी न कळे शेषाला महिमा" असें म्हणतात. हीं अनंत रूपें केवळ मिश्रणापासून होतात. मिश्रण म्हणजे संयोग. अर्थां-तच स्पर्श म्हणून सकल सृष्टीचें कारण स्पर्श विषय होय. प्रजा उत्पन्न होण्यास, पदार्थमात्राची स्थिति व लय होण्यास सुद्धां हा स्पर्श विषयच कारण आहे. प्राण्यांचा अन्नपाण्याशीं आणि उद्भिज्जांचा त्यांच्या पोषक पदार्थांशीं संयोग म्हणजे स्पर्श होतो तेव्हांच तीं वांचतात, फलद्रुप होतात. लय होण्यास कोणत्या तरी कारणांचा संयोग व्हावाच लागतो.

## मिश्रणाचें ज्ञान.

सरस्वती शापक्षालनार्थ पृथ्वी प्रदक्षिणेस गेल्यामळें ह्या देशाशीं तिचा वि-

योग झाल्यापासून आपण ज्ञानहीन व उद्योगहीन झालों म्हणून मिश्रणज्ञान पराङ्मुख झालों. सरस्वतीची स्वारी पश्चिमेकडे जसजशी गेली, तसतसे तिकडील लोक अज्ञाननिद्रेंतून खडबडून जागे झाले. त्यांनीं मिश्रणज्ञान सपाटून संपादन केलें. आप, तेज, वायु, आकाश आणि पृथ्वी. ह्यांस प्रसन्न करून घेऊन त्यांच्या संयोगानें म्हणजे स्पर्शानें ते गोरे लोक आज वैभवाच्या शिखरावर आरूढ झाले आहेत.

## स्पर्शाचे दोन प्रकार.

स्पर्शविषयाची योजना यथायोग्य केली असतां शरीरबल वाढतें. अयोग्य योजना झाली असतां सर्व प्रकारें हानि होते. स्पर्शसुखाचे दोन प्रकार आहेत. एक नाजूक व एक कठोर. संसारयात्रा ज्याला ज्या प्रकारची करावयाची असेल त्यानें त्या यात्रेस अनुरूप प्रकार स्विकारावा. स्वीकारावा तरी काय ह्मणावयाचें आहे, आपोआपच त्याला तो प्रकार स्विकारावा लागतो.

## नाजूक प्रकार.

घरांत सर्वकाल राहून प्रपंचाची टापटीप ठेवून यजमानांचीं मनें प्रसन्न ठेवणें, त्यांची बरदास्त ठेऊन त्यांस सर्व सुख व सोयी करून देणें, हेंच ज्यांचें काम त्या बायकांस स्पर्शविषयाचा नाजूक प्रकारच अनुरूप आहे. त्यांचा कोमलपणा, सौंदर्य, व तेज, कायम राखण्याकरितां त्यास ऊन, तहान वर्ज करणें हातांपायांस माती लागूं न देणें, फार श्रम न करणें, कठोरपणा कोणाशीं न करितां सर्वांवर ममता करणें, इत्यादि सात्त्विक प्रकारच अवश्य असतात. आणि तेच आवडतात. म्हणून गाद्या, गिरद्या, छपरपलंग, अलंकार, भूषणें, उंची आणि मऊ मऊ वस्त्रें, इत्यादि सर्व वैभवास त्याच योग्य असतात. त्यांच्यावरील स्वामित्व आणि त्यांचा उपयोग व उपभोग ह्यांच्या हक्कावरच पुरुषांस संतुष्ट असावें लागलें.

## कठोर प्रकार.

ऊन्ह, पाऊस, वारा, ह्यांना पुरुष भिऊं लागला तर तो नादान ठरणार. देशांत, परदेशांत, दिवस रात्र न म्हणतां त्यानें आपले व आपल्या देशाचें वैभव राखण्याकरितां व वाढविण्याकरितां झटलें पाहिजे. शत्रूचा निःपात करण्याकरितां विक्राळ कठोरपणाही आंगिकारिला पाहिजे. म्हणून त्यास स्पर्श-

सुखाचा दुसरा म्हणजे कठोर प्रकारच स्विकारला पाहिजे. जितका जितका बिकट प्रसंग यइल तितके तितके पुरुषाचे बाहू स्फुरण पावूं लागले पाहिजेत. पस्तीस पस्तीस चाळीस चाळीस कोसांच्या सुळकुंडया एका दिवसांत मारून शत्रूला गुंगारा देऊन अवचित शत्रूला अडचणीच्या जाग्यांत गांठून त्यांची त्रेधा धनाजी जाधव उडवीत असे. तुकडा खाण्यास फुरसत नाहीं, म्हणून हिरवा तर हिरवाच हुरडा बाजीराव फाकीत असे. शत्रूच्या शोधांत राहून प्रसंग आला तर चटकन निसटून जाण्यास सांपडावें म्हणून होळकर घोड्याच्या पाठीवर ताठ बसून एकपाय रिकिबींत आणि एक पाय सुईवर ठेवून उभ्याउभ्याच जेवीत असे. ह्याचें नांव मर्दांचें स्पर्शसुख. वीराची पराची गादी रणभूमि होय. वीराची चंदनउटी शत्रुरुधिर होय. वीराचे परिरंभसुख मल्लखांबाच्या पकडी होत. वीराचें तांडवनृत्य विजेप्रमाणें चमकून रणामध्यें पट्ट्याचे हात करून शेंकडों किंवा हजारों लोकांतून चाट लागूं न देतां निघून जाणें होय.

## मर्दनं गुणवर्धनं.

मर्दनं गुणवर्धनं हा नियम ज्या वस्तूस लागू आहे, त्यापैकींच शरीर ही वस्तु आहे. शरिरास जों जों जपावें, तों तों तें अशक्त, थलथलीत आणि आळशी. अर्थातच सर्व कामासच निरुपयोगी होतें. जों जों त्यास श्रम द्यावे, मेहनत द्यावी, तों तों तें पुष्ट आणि तुष्ट होऊन बळकट आणि कंटक होऊन पाहिजे तें साहस व श्रम करण्यास समर्थ होतें. बिकट प्रसंगांत प्रसंगावधान दाखवून तसे प्रसंग पार पाडण्याची हौस त्यास वाटूं लागते.

## आतां पुरे मिजास.

स्पर्शसुखाचा अर्थ मिजास अशी सध्यां समजूत आहे. हीच सर्व प्रकारीं घातक आहे. परवशतेमुळें मर्दुमकीचीं कामेंच आपल्याला पारखीं झालीं. यामुळें असा घातक समज होणें साहजिकच आहे. पण हा समज असा ठेवून उपयोग नाहीं. डोळे उघडून मागें आपण कोण होतों व पुढें कोण होणार, ह्याचा विचार जरूर केला पाहिजे. "दारिद्र्यं परमांजनं" हें अंजन आतां आपल्यास प्राप्त झालेंच व उत्तरोत्तर तें वाढणारच आहे. तेव्हां आतां जागे व्हा असें म्हणावयाचें कारण नाहीं. आपोआपच धुंदी जाईल.

## उत्साह.

स्पर्शसुखाची मुख्य अवश्यकता वंशवृद्धीकरितां आहे. वंशवृद्धीस तेंच

कारण आहे. ऐहिक सुखामध्यें रतिसुख अग्रमान पावलें आहे. जन्मामध्यें विवाह, फलशोभन आणि पुत्रोत्साह हे तीनच महोत्सव आहेत. ते सर्व स्पर्शविषयाचींच फळें आहेत.

## स्पर्शविषयाचें सार्थक.

आतां स्पर्श विषयाचें खरें सार्थक ज्यांत आहे तो एक प्रकार सांगतोंः माता, पितरें, गुरु, साधु, इत्यादि पूजार्ह माणसें यांची शुश्रुषा, चरणसेवा आणि पूजन, हें उत्तमोत्तम स्पर्शसुख होय. अनाथ आर्तजन यांस दुखण्यामाज्यास जपणें, त्यांची सेवा करणें, यासारखें कल्याणकारक स्पर्शसुख दुसरें नाहीं. मनुष्यास परमेश्वरानें सकलकार्यपटु हात दिले आहेत. ते या सत्कार्यांकरितांच.

**सद्गुरुचरण चुरावे देवार्चन हा स्वधर्म हस्तांचा ॥**
**समरीं दानप्रसंगीं, जेविं वणाणे प्रजन्य हस्ताचा ॥**

अनंत जन्माच्या पुण्यप्रभावानें ज्यास संतसंगति प्राप्त होते, त्यास संत चरणरजापासून केवढा लाभ होतो. हें मथळ्यावरील अभंगांत लिहिलें आहे.

## रूप.

**या कुंदेंदुतुषारहार धवला या शुभ्रवस्त्रावृता ॥**
**या वीणावरदंडमंडितकरा या श्वेतपद्मासना ॥**
**या ब्रह्माच्युतशंकरप्रभृतिभिर्देवैस्सदा वंदिता ॥**
**सा मां पातु सरस्वती भगवती निःशेष जाड्यापहा ॥**

## लिपीचा प्रभाव.

रूप विषय तेजाचा आहे. मूर्त पदार्थ तेवढे रूपात्मक आहेत. ही सर्व सृष्टि आणि विश्व नारायणांनीं निर्माण करून सौंदर्यानें भरून टाकिली आहे. त्याचें सार्थक नेत्रद्वय दिलें आहे म्हणून झालें आहे. आजला मनुष्याच्या ज्ञानाची जी प्रगति झाली आहे, व पुढेंही सारखी भर वेगानें होत आहे, ती सर्व या दोन भिंगामुळेंच होत आहे. पृथ्वीसंबंधी ज्ञान होण्यास आकाशांतील ग्रहांचें अवलोकन कारण आहे. पूर्वीं शब्दविषयाच्या वर्णनांत पूर्वपरंपरेनें ज्ञानाचा साठा होण्यास शब्द कारण आहे. असें सिद्ध झालें आहे; पण लिपी नसती तर हे शब्द मनुष्याच्या स्मृतीच्या बाहेर कसे बांधून ठेवितां आले असते. घरेंचीं

घरें भरण्याइतक्या ग्रंथांतील ज्ञान मनुष्यांनीं आपल्या स्मृतींत कोठवर सांठवून ठेविलें असतें. बुद्धिसागर, ज्ञानसागर एखादा मनुष्य सृष्टिक्रमामुळें परलोकवासी झाल्याबरोबर त्याचें ज्ञानही गेलें असतें. पण लिपीनें तें सर्व बांधून मनुष्याच्या पुस्तकालयांत कोंडून ठेविलें आहे. अनादिकालीं झालेले वेद आज आपल्यापाशीं ह्या सरस्वतीच्या म्हणजे रूपविषयाच्या प्रसादानें बोलत आहेत.

## अतर्क्य चमत्कार.

शेंकडों वर्षांपूर्वीं परलोकवासी झालेले वाग्भट्ट आज आपल्या रोगांचें निदान करून आपल्यास औषध देत आहेत, हा प्रसाद रूपविषयाचा आहे. शेंकडों कोसांवरील आपले सुहृद ह्या सरस्वतीच्या म्हणजे रूप विषयाच्या कृपेनें आपला सर्व समाचार आपल्यास सांगत आहेत. पुष्कळ दिवसापूर्वीं गत झालेले आपले पूर्वज कसे होते तें पहावें, असें एखाद्या कृतज्ञ वंशजाच्या मनांत आलें असतां त्यांच्या तसबिरी पहातां येतात. २०० वर्षांपूर्वींचे शिवाजी महाराज आज आपल्यापुढें उभे असल्याप्रमाणें दिसतात. सगळ्या भूमंडळावरील देश, नद्या, पर्वत, वीतभर कागदांत आपल्यास पाहतां येतात.

## लाखों चमत्कार.

फोटोग्राफाच्या अर्वाचीन शोधांनीं, व सुधारणांनीं अतर्क्य अंतरावरील गोलांचीं स्वरूपें, रचना व धर्म रंगाच्या फोटोग्राफांनीं समजून येत आहेत. एक्सरेज म्हणून जो हल्लीं शोध लागला आहे, त्यानें झाकलेल्या पेटींतील किंवा भिंतीपलीकडील वस्तूचें दर्शन ह्या रूपविषयानें होत आहे. समुद्राच्या तळींही काय आहे हें पाहतां येतें. एक ना दोन नाना चमत्कार रूपविषयाच्या योगानें आपणांस कळून येऊन आपल्या सुखाची अभिवृद्धि होऊन कोटकल्याण होत आहे.

## ज्ञानाचें मूळ निरीक्षण.

झालेलें ज्ञान परस्परास प्राप्त करून देणें आणि तें पाठांतरानें राखून ठेवणें, ह्यास मात्र शब्द उपयोगी पडतो, पण नवीन ज्ञान करून घेण्यास शब्दापेक्षां रूपविषयच जास्ती उपयोगी पडतो. कोणताही नवा शोध नीरिक्षणावाचून व्हावयाचाच नाहीं. वस्तूचें लक्षपूर्वक नीरिक्षण करून तिचे गुणधर्म, त्यांची परिस्थिति मनांत बिंबवून घेतल्यावाचून त्यांचें मिश्रण कोणत्या पदार्थांशीं कसें करावें, आणि त्या मिश्रणाचे धर्म काय निष्पन्न होतील, ह्याची कल्पनाच येत

नाहीं मग शोध होणार कसा ? तशी कल्पना ठरल्यावर सुद्धां प्रयोगाअंतीं पूर्वानुमानाप्रमाणें मिश्रणांत धर्म उतरले नाहींत किंवा इच्छिलेले फळ प्राप्त झालें नाहीं, तर कोठें चुकतें आहे, आणि ती चूक काढून टाकण्यास काय तजवीज करावी, हें पुन्हां नीरिक्षणावांचून कळण्यास मार्गच नाहीं. तात्पर्य, सर्व ज्ञानाचा उगम नीरिक्षणापासून म्हणजे रूपविषयापासूनच झाला आहे.

## ईश्वराविषयीं कल्पना.

ईश्वराच्या अस्तित्वाची कल्पना मनांत येण्यास तरी हे नेत्रयुगुलच कारण आहे. विश्वाचा अवाढव्य पसारा, त्याचा नियंत्रित वर्तनक्रम, सर्व वस्तुमात्रासुद्धां विश्वाच्या मागें लागलेला, सृष्टिस्थितिलयक्रम, पंचमहाभूतांचे अतर्क्य सामर्थ्य, पुन्हां त्या सामर्थ्याचें विलक्षण नियमन, त्यांचे परस्परांशीं असलेले विरोध,प्रत्यक्ष दिसत असून पुन्हां त्यांचें एकमेकांमध्यें असलेलें सख्य आणि मिश्रण, क्वचित् होणारे त्यांचें भयंकर आणि सर्वविध्वंसक क्षोभ, प्राणिमात्राचें परिभ्रमण, त्यांचा सर्वकाल चाललेला जीवनार्थ कलह, जीवो जीवस्य जीवनं असा धडधडीत प्रकार असून, आयुर्मर्यादा असेपर्यंत त्यांचे निर्भय विहार, मनुष्याच्या अकुंठित बुद्धीचे नानाविध विलास सर्व दुनियेवर व प्राण्यांवर गाजत असलेला त्याचा अंमल, पण त्या अमलानें घमेंडी मानण्यास त्यास कारण नाहीं तें नाहींच. कारण, एका क्षणांत धनदौलतीची काय वाट होईल, ह्याचा मुळींच भरंवसा नाहीं. धनदौलत असो, पण तो मी मी म्हणणारा देहही कोणच्या क्षणीं पतन पावून पुन्हा मातीस माती मिळून जाईल याचा नेम नाहीं. इत्यादि अनंत गोष्टी पाहूनच मनुष्याची क्षुद्रता त्यास दिसून आली. आपल्याप्रमाणेंच सर्व विश्वाचा प्रकार असल्याचें त्यास दिसून आलें, म्हणजे एवढा हा अतर्क्य पसारा नियमानें चालण्यास कोणा तरी नियामकाची सत्ताच कारण असली पाहिजे. अशी कल्पना शोधकबुद्धीच्या मनुष्याच्या मनांत येते. अर्थातच तो त्या नियामकाच्या शोधास लागतो. उंबरांतील कीटक किंवा घडयाळावरील मुंगी यांची पृथ्वी, उंबर किंवा घड्याळ हिचा शोध ते करूं लागल्यास, त्यांचा जसा परिणाम होईल, म्हणजे प्रथम त्यांस त्यांच्या पृथ्वीपलीकडे कांहीं असल्याची कल्पना येणार नाहीं, पण तें उंबर फुटलें किंवा ती मुंगी भिंतीवर गेली म्हणजे जशी तिची अवस्था होईल त्याप्रमाणें शोधकाची अवस्था झाली म्हणजे त्याची

खातरी होते कीं, नियामकाचा शोध लावणें अशक्य आहे. पण कोणी तरी नियामक आहे ह्यांत शंका नाहीं. नरजन्मामध्यें येण्याचें सार्थक या नियमकाचा शोध लावणें, निदान त्या शोधाचा निदिध्यास लागणें, येवढेंच आहे. तें प्राप्त करण्याची कल्पना ज्या ह्या रूपविषयाच्या योगानें येते, त्या विषयाचें महत्त्व किती म्हणून वर्णन करावें.

## नेत्रांचें सार्थक.

त्या नियामकाचा शोध करणारे अनादिकालापासून जे ज्ञाते झाले, त्यांनीं आपल्यासारख्या अज्ञान जनांचा उद्धार होण्याकरितां अनेक तीर्थें, क्षेत्रें, योजून ठेवून तेथें मनोरम देवालयें बांधलीं आहेत. घाट व दीपमाळा बांधल्या आहेत. हजारों, लाखों रुपये सालाचे खर्च ठेवून देवाच्या उत्साहाचे, विलासाचे नानाप्रकार चालू ठेविले आहेत. त्या क्षेत्रीं जाऊन तेथील अनुपम शोभा पहाणें, भगवंताच्या मूर्तीचें दर्शन घेऊन जन्माचें सार्थक करणें, ज्याच्या मार्गांत असतें, त्यास तो लाभ रूप या विषयानेंच होतो. तशा ठिकाणीं जगदोद्धार करणाऱ्या संतांच्या दर्शनानें नरतनूचें सार्थक होऊन केवढा लाभ होतो पहा.

**संतदर्शनीं हा लाभ । पद्मनाभ जोडिला ॥**

## रस.

**पापा तापा वारी वारि। मल वारि वारि भूमाता ॥**
**रोग निवारी वारिच वारिच पिकवी समुद्र भूमाता ॥**

( स्वकृत. )

## सर्व उत्पत्ति रसापासून.

आपल्या महाभूताचा विषय रस होय. पाण्यामधील सांका, शेवाळ, जलचरांचे मृतदेह, ह्यानींच पृथ्वी झाली. ही रसापासून झाली म्हणून हिला रसा म्हणतात. मेदापासून झाली म्हणून मेदिनी म्हणतात. पृथ्वीच जर रसापासून झाली, तर तिजवरील सर्व पदार्थांचा उगम रसापासून झाला आहे, हें निराळें सांगणेंच नलगे. शब्द, स्पर्श, रूप, आणि गंध हे विषय ज्या पदार्थांचा आश्रय करणारे, ते सर्व पदार्थ पृथ्वीपासून व रसापासून प्रकट झाले. तेव्हां रसाची महती काय वर्णन करावी. खारट, तुरट, आंबट, कडू आणि गोड, असे रसाचे सहा प्रकार आहेत. प्राणिमात्राच्या जीवनास जीवन पाणीच आहे. आणि त्याच्या

बरोबरीनें मीठ हें अवश्य आहे. प्राणिमात्राचें भक्ष्य मग ते कोणतेंही असोत पाण्यासूनच उत्पन्न होतात.

## रसच तापाचें निवारण

प्राण्याचीं दुखणींबाणीं निवारण करण्यास लागणारीं सर्व औषधें व वनस्पति रसापासूनच होतात. बागबगीचे, उद्यानें, सर्व रसाच्या कृतीवाचून नाहींत. भूमातेचे आठ नऊ महिने प्रखर रविकिरणांनीं शोषण झाल्यामुळें, तिला होणारा ताप पर्जन्यावांचून दुसऱ्या कशानेंही हरण होणार नाहीं. तिला ताजेतवानेपणा आणि उत्पादक शक्ति दुसऱ्या कशानें उत्पन्न व्हावयाची नाहीं. जळीं, स्थळीं, आणि हवेंत वास करणारे, चौऱ्यायशी लक्ष योनींमधील अनंत प्राण्यांचे त्रिविध ताप पाण्यावांचून कशानेंही शमन व्हावयाचे नाहींत.

बाकीचे चारी विषय प्राप्त होऊन हा सर्व विषयांत श्रेष्ठ विषय रस नसेल तर सर्व व्यर्थ होतील.

## स्वच्छतेचें साधन उदक.

मानवी सुखाच्या वर्धनास जी बाष्पशक्ति हजारों रूपांनीं कारण झाली आहे, ती ह्या रसविषयाचें कार्य होय. मनुष्याच्या जीविताचा नाश करणाऱ्या दुर्गंधीचा, नाश करण्यास पाणी म्हणजे रसच उपयोगी पडतो. म्हणून आमच्या शास्त्रकारांनीं स्नानाचें महात्म्य विशेष सांगितलें आहे. नित्य नियमानें प्रातःस्नान केलें असतां, शरीर सुदृढ होतें. संध्यावंदनादिक सर्व ब्रह्मकर्मांत उदकाचे प्रयोग वारंवार होतात. सर्व स्वच्छतेचें साधन उदकच आहे.

## जलमार्ग.

मनुष्यांच्या दळणवळणास जलमार्ग फार उपयोगी पडतो. जलमार्गानें गमन करण्यास जनावराची जरूर लागत नाहीं. ह्यामुळें खर्च फार थोडा लागतो. रस्ते बांधावे लागत नाहींत, दुरुस्त ठेवावे लागत नाहींत. यामुळें भूमंडळावरील सर्व देश, परस्परांस अगदीं सुगम झाले आहेत. पाहिजे तेथील माल पाहिजे तेथें सहज मिळतो.

## तीर्थें.

जलाचा पवित्रपणा पाहून आपल्या पूर्वजांनीं जागोजाग पुण्यपावन तीर्थें मानिलीं आहेत. तीर्थ म्हटलें कीं, तेथें देवालयें, विद्यालयें, अन्नछत्रें, आलींच. भक्तिश्रद्धायुक्त अंतःकरणाचीं माणसें तेथें जाऊन आपला उद्धार करून घेतात.

तीर्थांची योजना फार विचारानें केलेली आहे. तीर्थांचें सामर्थ्य नुसतें कल्पित नव्हे. इतर नद्यांच्या पाण्यापेक्षां जान्हवीचें पाण्यांत कांहीं अवर्णनीय सामर्थ्य असल्याचें हल्लीं शोधक गोऱ्यांच्याही अनुभवास आलें आहे. नर्मदेच्या कांहीं भागांत पाणी येऊन गेलें म्हणजे चिखलाच्या बाणाकृति होतात. पण त्या जागेच्या शेजारच्याच जागेंत त्या होत नाहींत. हा चमत्कार गोऱ्या लोकांसही गुंग करून टाकतो.

## तीर्थयात्रा.

तीर्थयात्रा केल्यानें पारत्रिक लाभ मात्र होतात, ऐहिक फायदा कांहीं नाहीं असें नाहीं. आपल्या पूर्वजांच्या प्रत्येक योजनेंत प्रमुख भाग परमार्थाचा दाखवून स्वार्थ त्याच्या अनुषंगानें सहज व्हावा, अशी खुबी ठेविलेली आहे. परमार्थाचें काम मनुष्य श्रद्धापूर्वक करतें. तसें स्वार्थाचें होत नाहीं. देशाटन, पंडितमैत्री, सभेंत संचार, आणि शास्त्रग्रंथविलोकन, हे चार चातुर्यप्राप्तीचे मार्ग आहेत. यात्रेच्या निमित्तानें वरील सर्व प्रकार सहज साधतात. देशाटन ज्यास घडत नाहीं, त्याची स्थिति कूपांतील बेडकाप्रमाणें होते. दुनियेंत काय तें आपलें गाव चांगलें, आपण सुखी, शहाणे, पराक्रमी असा त्याच्या मनाचा भलताच ग्रह होतो. तो देशाटन झालें म्हणजे आपोआप नष्ट होऊन शांत भीष्म दृष्टीस पडले, म्हणजे आपली क्षुद्रता कळून येते. लोकांचें सामर्थ्य, वैभव व चातुर्य पाहून, आपण तसें कसें होऊं, ही महत्त्वाकांक्षा वाढते, आणि तीच कल्याणास कारण होते. सांपतच्या बलाढ्य राष्ट्रांतही यात्रेचा प्रकार ऐहिक फायद्याकरितां चालू आहे. देशाटन, थाटामाटांत व ऐषआरामांत झाल्यानें फायदा होत नाहीं. तसा प्रवास घरीं बसल्याप्रमाणेंच असतो, म्हणून यात्रा कष्टानें कराव्या. वाहनावर आरूढ होऊन करूं नयेत, असें शास्त्र आहे. सदा गोड गोड खाण्यास असेल तर त्याचें खरें माहात्म्य कळत नाहीं, तें नकोसें वाटतें, त्याप्रमाणेंच सुखाची गोष्ट आहे. मधून मधून कष्ट व हाल असले तरच सुखाचें महत्त्व कळतें व वाटतें. पादचारी यात्रा करणारा कितीही धनवान असला तरी त्याला कष्ट होतात. तेणेंकरून क्षुद्बोध होऊन भोजन गोड लागतें, आणि त्याचें पचन होऊन तें आंगीं लागतें. नाना स्थळींचे आचारविचार, रीतरिवाज समजतात. संकटें येतात त्यांचे प्रतिकार कसे करावे हें कळून येतें. देशोदेशींचे कारा-

गिरीचे पदार्थ दिसून येतात. हल्लीं मोठ्या थाटाटोपानें जीं प्रदर्शनें होत असतात, तीं क्षेत्राच्या ठिकाणीं सदा सर्वकाल आणि विशेषेंकरून यात्रांच्या दिवसांत उघडलेलीं असतात. क्षेत्रांत गेलें असतां तेथील कांहीं तरी चमत्कारिक जिनसा माणसें सहजच घेतात. कांहीं तरी वस्तु घेतलीच पाहिजे अशी समजूत करून दिलेली असते, यामुळें घेण्याची इच्छा न झाली तरी घ्यावी लागते. या प्रघातामुळें मोठ्या मोठ्या क्षेत्रांतून मोठा व्यापार चालतो. कारागिरांचा निर्वाह चालून देशांतील कलाकौशल्य वाढतें. प्रत्येक क्षेत्रांत निरनिराळे माल करण्याची व्यवस्था पूर्वीं होती, यामुळें फाजील चढाओढ होत नसे, आणि सगळ्याच कारागिरांचें चांगलें चाले.

## पंडितमैत्री.

क्षेत्राच्या ठिकाणीं दानधर्मांची योजना करून ठेविल्यानें, विद्वान लोकांचा निर्वाह होण्याची सहज सोय झाली. यामुळें क्षेत्राच्या ठिकाणीं पंडित, शास्त्री, वैदिक, इत्यादिकांचा समुदाय सहजच असतो. व भक्तिश्रद्धापूर्वक यात्रेकरू त्यांस भजून त्यांचा सत्कार करितात, आणि त्यांच्या सहवासापासून आपलें हित करून घेतात. विद्वानांचा समुदाय एके ठिकाणीं असल्यानें दूरस्थ लोकांस, त्यांच्या विद्वत्तेचा फायदा करून घेतां येतो. हिंदुस्तानांत कोठेंही कांहीं शास्त्रार्थाची भानगड पडली तर पैठण, नाशिक आणि अखेर काशी क्षेत्राहून शास्त्रार्थ आणून त्या भानगडीचा निकाल लावितां येतो.

## सभासंचार.

विद्वान आणि सभा ह्यांचा अन्योन्य आश्रयच आहे. विद्वज्जनसमूह असला म्हणजे वारंवार सभा व्हावयाच्या. अर्थात् क्षेत्रामध्यें ज्ञानेच्छुला कथा, कीर्तनें, वेदशास्त्रचर्चा ह्यांचा लाभ होतो. त्याच्या कृपेनें व मदतीनें शास्त्रग्रंथविलोकन होतें. तात्पर्य, यात्रांची योजना ऐहिकाकरितां आहे. आपल्या संस्था उत्पन्न होऊन अति काल झाल्यामुळें त्यांत अनेक दोष उत्पन्न झाले आहेत; ते शोधून काढून पहिल्या संस्था देशकालवर्तमान ह्यांस अनुसरून केल्या असतां आणि त्यांची योजना परमार्थाकडे कायम ठेवून त्यांचा फायदा ऐहिकाकडेही करून घेण्याची योजना केली तर मोठें कल्याण होईल.

# गंध.

वायूसवेंच वर्ते, गंध करी रोग भोग जीवास ॥
यास्तव शुची असावें, अर्पावें नित्य भोग देवास ॥
( स्वकृत )

## गंधाचा प्रवेश.

गंध विषय पृथ्वी ह्या महाभूताचा आहे. ह्या विषयाचा सूक्ष्मपणें भूमीवर व्यापार चाललेला आहे. स्पर्शादिविषयाचा लाभ किंवा हानि प्राप्त करून घेणें मनुष्याच्या हातीं आहे. पण गंधविषयाचें तसें नाहीं. तो पृथ्वीवरील नाना प्रकारच्या पदार्थांपासून उत्पन्न होऊन वायूवर आरोहण करून सर्वत्र संचार करितो. दारें लावून बसलें तरी गंध कोणीकडून तरी प्रवेश करून गळीं पडल्यावाचून रहावयाचाच नाहीं.

## गंधाचे इष्टानिष्ट परिणाम.

गंधाचा परिणाम इष्टही होतो व अनिष्टही होतो. मनुष्याच्या शरीरप्रकृतीवर सतत ह्याचा आघात होत आहे. सुवासानें मनुष्याचें मन सुप्रसन्न होतें. कैक वनस्पतींच्या अवघ्रहणानें अनेक रोग जातात. अपायकारक गंधांनीं हजारों, लाखों माणसें भराभर मृत्युमुखीं पडतात. प्रकृतीला अपायकारक गंध कोणते ते ओळखून त्यांचा प्रतिकार करणें, आणि आरोग्य, वृद्धि व आनंदवर्धक सुगंध ह्यांची वृद्धि करणें हें मनुष्याचें कर्तव्य आहे.

## विटाळ.

प्राणिमात्राच्या तोंडांतून होणाऱ्या श्वासोच्छ्वासांत गंध असतो. माणसाचे कपड्यास पदार्थ लागतात त्या पदार्थांतही गंध असतो. अशा पदार्थांवरून वाहणाऱ्या वायूमध्यें तो गंध पसरून त्याच्या सन्निध येणाऱ्या माणसाशीं तो संलग्न होतो. मृताहारी अंत्यज लोक ह्यांच्या अंगावर असलेल्या कपड्यांत नेहमीं अपायकारक गंध असणार हें उघडच आहे. त्यांच्या श्वासोच्छ्वासांत अपायकारक व अपवित्र गंध असतो. ते जवळून गेले किंवा जवळून बोलले तर घाण येते. म्हणून असल्या लोकांचा स्पर्श आमच्या शास्त्रानें वर्ज केला आहे. अन्नसेवन करतांना तर अपायकारक गंधाला फार जपलें पाहिजे.

म्हणन अंत्यज किंवा अस्पर्श स्त्रिया यांचा शब्द ऐकूं नये असा निर्बंध केला आहे. शूद्रादिक मांसाहारी त्यांच्यापेक्षां बरे. म्हणून त्यांचा प्रत्यक्ष स्पर्शास्पर्श मात्र वर्ज धरला आहे. अंत्यजाची सावली व विटाळशीची सावली ही अपायकारक म्हणून वर्ज धरिली आहे. आणि या सगळ्यांचें क्षालन स्नानानें होतें.

## गंधद्वारें स्पर्श.

प्रजोत्पादन होण्यास मादी आणि नर ह्यांचा योग व्हावा लागतो. तसा प्रकार उद्भिज्जांच्या उत्पत्तीस लागत असेल अशी कल्पना कोणाच्याही मनांत सहज येत नाहीं. उद्भिज्जांमध्यें नर व मादी हा भेद असेल असें वाटत नाहीं. उद्भिज्जें एकमेकांपासून दूर असतात, तेव्हां ही कल्पना येण्याचें कारणच नाहीं. पण खरा प्रकार तसा नाहीं. त्यांच्यामध्यें नर असतात त्यांस फुलें येत नाहींत एखादे वेळीं मादीला नराचा स्पर्श होण्याजोगा नसला म्हणजे त्या झाडासही फुलें येत नाहींत. पण जवळ कोठें तरी नराचें झाड तयार झालें, कीं तिला फुलें येऊं लागतात. सृष्टिलीला अगाध आहे. ह्यावरून दोन वस्तु संलग्न होतात तेव्हांच स्पर्श होतो असें नाहीं; अंतरावरूनही स्पर्श होऊन स्पर्शापासून होणारे परिणाम घडतात.

## अस्पर्शाची योजना.

सरस्वतीची जन्मभूमीच भरतखंड. त्यामध्यें झालेल्या महर्षींच्या ज्ञानाचा एकेक अनुभव आला म्हणजे मन थक्क होऊन जातें. अंतरावरून होणारा स्पर्श त्यांस कळला होता व त्या स्पर्शांचे परिणाम त्यांस कळले होते. हा स्पर्श गंधरूपानें होतो आणि त्याचेच इष्टानिष्ट परिणाम होतात. हें मर्म मनांत आणून सोंवळें, ओंवळें, विटाळ, अशौच इत्यादिक प्रकार सांगितले आहेत. स्वच्छता राखण्याविषयीं त्यांनीं फार खबरदारी ठेविली आहे.

## विटाळशीचा विटाळ.

आपण अज्ञानानें वेढून गेल्यामुळें त्यांचे गूढ हेतु व योजना आपल्यास न कळून आपण त्यांच्या आज्ञांचा अव्हेर करूं लागलों आहों. कांहीं अल्प विचारी लांडोरवृत्ति लोक तर त्यांचा उपहास सुद्धां करितात. पण अलीकडे विटाळाच्या संबंधाचा बराच खुलासा सांप्रत काळीं सर्वज्ञ मानलेल्या श्वेतद्वीपस्थांकडूनच होऊं लागला आहे. विटाळशीच्या विटाळासंबंधानें अलीकडे

युरोपमध्यें असा अनुभव आला आहे कीं, विटाळशी काचेच्या भट्टीजवळ असली तर रांधा बरोबर होत नाहीं. तिच्याजवळ दुसरीं माणसें बसलीं तर त्यांच्या प्रकृतीवर कांहीं दुष्परिणाम घडतात. म्हणून विटाळशीला कारखान्यांत येण्याची मनाई केली आहे. हजारों वर्षांपूर्वी आमच्या महर्षींना ज्ञान होतें त्याचा आतांसा थोडथोडा सुगावा गोरांस लागत चालला आहे. तेणेंकरून पर्यायानें का होईना पण विटाळ ते मानूं लागले आहेत. आम्ही उलट दिशेला चाललों आहों. स्पर्शजन्यरोग असें सरकारानें म्हटलें असतां आम्हांस चमत्कार वाटतो.

## अशौच.

मरणाशौचाचा प्रकारही असाच. मरणाशौच आणि जननाशौच दहा दिवस धरावें असें आपलें शास्त्र सांगतें. त्यांतील इंगीतही हल्लीं प्रकट झालें आहे. ग्रंथिक सांनिपात एकास झाला, कीं भराभर बळी घेत सुटतो. यावरून तसे रोग संसर्ग ( गंध ) द्वारें दुसऱ्यास होऊं नयेत म्हणून " यः पलायति सजीवति " असें होतें. त्याच्या घरांत असलेलीं माणसें ह्यांजवर त्या गंधाचा संस्कार झालेला असतो, म्हणून त्या माणसांस दहा दिवस अलग ठेवावें लागतें. म्हणजे तीं अशुची असतात. अर्थात् तेंच आमच्या शास्त्रानें सांगितलेलें अशौच होय. आमच्या शास्त्रकारांची आत्यंतिक सावधगिरी म्हणून त्यांनीं सर्वच प्रकारच्या मृत्यूमागें अशौच लाविलें आहे. मृत्यूच्या कारणांची निवड केली असती तर अज्ञान समाजास मोठ्याच घोंटाळ्यांत पडावें लागतें. कोणच्या रोगाचा परिणाम कितपत होतो हें शास्त्रज्ञास तरी कोठें निश्चयात्मक कळलें आहे. ग्रंथिक सनिपातासारखा दारुण रोग स्पर्शजन्य आहे किंवा नाहीं ह्याची भवति न भवति अद्यापि चालूच आहे. तथापि शहाण्या लोकांनीं त्यांच्या निर्णयाची वाट न पाहतां स्पर्शजन्य समजून सावध राहणेंच पसंत केलें आहे, तेंच आमच्या शास्त्रकारांनीं करून सरसकट अशौच ठरवून टाकिलें आहे.

## जननाशौच.

जननाच्या आनंदाच्या प्रसंगींही अशौच मानणें विलक्षण दिसतें. पण दोहींकडे तत्त्व एकच आहे. बाळंतपण म्हणजे मरणकाळच्या दुखण्यापेक्षां

जास्त मुदतीचें व जास्त घाणीचें दुखणें म्हणून त्याच्यापासूनही गंधद्वारें रोग-पीडा होण्याची भीति असते.

## रोगबीजाचा चरणप्रवेश.

रोगाचे कृमि भूमीवर असतात, म्हणून त्यांचा प्रवेश मनुष्याच्या पायांतून होतो; हें तत्त्व मैथिक तापाच्या संबंधांत प्रकट झालें. पण तें आमच्या शास्त्रकारांस पूर्वी माहीत होतें. बाहेरून आल्याबरोबर हस्तपादप्रक्षालन करावें, अन्न-पाणी ग्रहण करण्यापूर्वी तर तसें केलेंच पाहिजे असें त्यांनीं ठरविलें आहे. हें तत्त्व अगदीं अडाणी बायकांस सुद्धां माहीत आहे. मरल्या पायांचें मनुष्य रोग्याजवळ व सूतिकागृहांत आणि अन्नग्रहणाच्या वेळीं त्या येऊं देत नाहींत. सूतिकागृहांतील हवा आधींच दूषित असते. आणि तेथें नाजूक प्रकृतीचें बालक आणि हलक झालेली सूतिका असल्या कारणानें बाहेरून येणाऱ्या मनुष्याच्या पायाबरोबर रोगबीज आलें असतां तेथील अनुकूल द्रवांत तें तेव्हांच जोर करील म्हणून भरलेल्या पायांच्या मनुष्यास सूतिकागृहांत जाण्याची सक्त मनाई असते. कृमिनाशक गोमूत्र आणि कडूलिंबाचा पाला कुंभांत घालून सूतिकागृहाच्या दारांत मुद्दाम ठेविलेला असतो. त्या पाल्यानें गोमूत्र पायांवर शिंपडल्यावाचून माणसास आंत जाऊं देत नाहींत. खरें म्हटलें असतां गोमूत्राचा नुसता संस्कार न करितां त्यांनें पाय धुतले पाहिजेत. पण उपपत्तीचा विसर पडल्या कारणानें नुसत्या संस्कारावर आलें आहे.

## ग्रहणाशौच.

ग्रहणाच्या कालांत विद्यमान असलेलें अन्न ग्रहण करूं नये. ग्रहणाचें अशौच मानून स्नान करावें. धुण्याजोगे असलेले पदार्थ धुऊन स्वच्छ करावे. जे पदार्थ टाकवत नसतील त्यांच्यामध्यें तुलसीपत्र तरी घालून ठेवावें असें शास्त्र आहे. अल्प विचारानें ह्या शास्त्राचा मोठा चमत्कार वाटतो. पण आपल्या ऋषिश्रेष्ठांच्या ज्ञानाची योग्यता व त्यांच्या योजनांची दूरदृष्टि मनांत आणिली म्हणजे ही योजनाही हेतुपूर्वकच असली पाहिजे. पूर्वीं रजस्वलाशौच, मरणाशौच व जननाशौच मनुष्याचें आरोग्याकरितांच योजिलेलें असावें असा तर्क केला आहे. तशीच कांहीं तरी हिताची योजना ह्यांतही असेल. भूमंडल आणि ग्रहनक्षत्रादिक ह्यांजमध्यें निःसंशय संबंध आहे. रावशशि

हे तर पृथ्वीवरील जीववनस्पति ह्यांच्या जीवनास अवश्य असणाऱ्या हवापाण्याचे उत्पादक व चालकच आहेत हें अनुभव सिद्ध आहे. समुद्राच्या भरतीस व ओहटीस चंद्राचेंच आकर्षण कारण आहे. याचा प्रत्यय प्रत्यहीं आहे. खग्रास सूर्यग्रहणाच्या वेळेस हवेंत एकदम कसा पालट होतो ह्याचाही अनुभव आपल्यास आहे. समुद्राच्या भरतीचे परिणाम फार दूरच्या प्रदेशीं हवेवर व पदार्थांवर अतर्क्य चमत्कार वाटण्यासारखे होतात. भरतीच्या वेळीं काजळ धरिलें तर ओहटीच्या वेळीं तितक्याच वेळांत धरिलेल्या काजळापेक्षां जास्त पडतें. लाह्या भरतीच्या वेळीं जास्ती फुटतात. रंग्याचीं कामें भरतीच्या वेळीं फार सफाईदार होतात. पृथ्वीवर चालणारे स्थूल व्यापार मनुष्यांच्या लक्षांत येतात, पण सूक्ष्म व्यापार अनंत चालले आहेत, त्यांचा पार मनुष्यास लागत नाहीं. प्राचीन आर्य ऋषि ह्यांचें दिव्यज्ञान आणि अगाध अनुभव यांच्या योगानें त्यांनीं ज्या योजना केल्या आहेत, त्यांच्या उपपत्ति आपण शोधून काढिल्या पाहिजेत. पाश्चात्यांच्या दिव्य यंत्रसामग्रीचा आपण लाभ करून घेऊन आपल्यास लावून दिलेल्या सांप्रदायाचा सूक्ष्म शोध केला तर आपलें मोठेंच कल्याण होईल. ग्रहणाचा वेध लागण्यापूर्वीं हवा, पाणी, ओलीं खाद्यपेयें ह्यांचें सूक्ष्मदर्शक यंत्रानें निरीक्षण करून त्यांजमधील गुणधर्म निश्चित करून ठेवावे, आणि वेध लागल्यावर तशाच प्रकारचे सर्व प्रकारें त्याच स्थितींत असलेले तसेच पदार्थ ह्यांचेंही निरीक्षण करून त्यांच्यांतील गुणधर्म पहिल्या गुणधर्मांशीं तुलना करून पहावे; त्याप्रमाणें ग्रहणकालांतील पदार्थांचें निरीक्षण करून गुणधर्मांची तुलना करून पहावी; आणि वेधांतील व ग्रहणांतील पदार्थ आरोग्यास हानिकारक आहेत किंवा नाहींत हें ठरवावें म्हणजे ग्रहणाशौचाची उपपत्ति ठरवितां येईल. तुलसीपत्र घालून ठेवण्याविषयीं सांगितलें आहे, ह्यावरून त्या कालांत पदार्थांमध्यें कांहीं तरी अनिष्ट धर्म उत्पन्न होतो असा तर्क होतो. तुलसीपत्राच्या अंगीं हवा शुद्ध करण्याचा विलक्षण धर्म आहे म्हणूनच तुलसीमाहात्म्य आपल्या ऋषींनीं फार वर्णिलें आहे. प्रत्येकाचें घरीं तुळशीचें झाड असावें, तुळशीच्या दर्शनानें, स्पर्शानें व सेवनानें दोष जातात असें सांगितलें आहे. तुळशीचा गुण शोधकबुद्धीच्या अमेरिकन लोकांस कळून येऊन दारीं तुळशीचे बाग हवा शुद्ध करण्याकरितां ते लावीत असतात. आपल्या विनाशकालांत शोधक बुद्धि आपल्यांत राहणार कोठून ? वर लिहि-

# भाग चवथा.

## प्राणी.

गुण धर्म सृष्टि झाला, परि चलनावीण ती न रम्य रसा ॥
उद्भिज्जखनिजनिधिही, प्राण्याविण कोण सेवि रम्य रसा ॥१॥

### इतर प्राणी.

उपभोक्त्यावांचून उपभोग्य व्यर्थ, आणि उपभोग्यावाचून उपभोक्ता असंभवी, म्हणून परम रमणीय पृथ्वी आणि आनंदपरिपूर्ण विषय ह्यांचा उपभोग घेण्याला चवऱ्यायशी लक्ष प्रकारचे अनंत प्राणी निर्माण केले आहेत. मानवेतर प्राण्यांस विषयोपभोग होतो खरा, पण विषयाचें पूर्ण सार्थक त्यांजकडून घडत नाहीं. तृण, तरु इत्यादि स्थावर प्राणी ज्याप्रमाणें कारणसंयोगानुरूप आपोआप उत्पन्न होतात, वाढतात, उपद्रव झाला नाहीं तोंपर्यंत जगतात, आणि कोणीं तरी तोडिले म्हणजे तुटून जातात, त्यांस स्वतःची म्हणून कांहींच सत्ता नाहीं. तितके पराधीन मानवेतर जीव नसले तरी जवळ जवळच आहेत.

### विषयसेवनाची तऱ्हा.

त्यांस विषयोपभोग कसा होतो पहा—रानावनांत पक्षी गुंजारव करतील किंवा गातील, नद्यांचे खळखळाट किंवा मंजूळ शब्द होतील तोच त्यांचा शब्दविषय; त्यांचा आणि ह्यांचा योग येईल तेव्हां यांनीं गाणें ऐकावें आणि निघून जावें. परमेश्वरानें दिलेलें आच्छादन ह्याखेरीज त्या बिचाऱ्यांस शीतोष्णादिकांचें निवारण करण्यास वस्त्र नाहीं, निर्भय राहण्यास घर नाहीं. दैववशात् एखादी मादी सांपडली आणि ती ऋतुमती असली तर तितक्यापुरती ओढाताण करून उभयतांमध्यें प्रेमकलह होत होत साधेल तितकें रतिसुख, त्यांत आणखी अन्य नर संन्निध असल्यास मारामारी ती निराळीच. आकाश, भूमंडल, नद्या, पर्वत ह्यांजकडे नुसतें पाहणें; त्यांतील चमत्कार समजण्याची कल्पनाच नाहीं, एवढाच काय तो रूपविषय. पोटांत भुकेची आग पेटली म्हणजे

भक्ष्यशोधनास भटकत फिरत असतां जेथें जें सांपडेल तें खावें. पोट भरलें भरलें, नाहीं नाहीं, मिळेल तेथें पाणी प्यावें म्हणजे झालें रससुख. गंध आपल्या गतीनें नाकांत चरा किंवा वाईट शिरेल आणि त्यापासून अनुकूल किंवा प्रतिकूल ज्या वेदना होतील तें गंधसुख. भटकत फिरतां फिरतां दिवस मावळेल तेथें कशा तरी आश्रयानें रात्र काढून पुन्हां दुसऱ्या दिवशीं भटकत फिरावें.

## विधिनिषेध.

मादीस गर्भ राहिला असतां सृष्टिक्रमानें आणि त्याच्या प्रारब्धानें त्याचें संरक्षण होऊन तो जन्म पावला म्हणजे त्यास स्वसंरक्षण आणि चारा मिळविण्याचें सामर्थ्य प्राप्त होईपर्यंत तिनें त्याचें पालन करावें आणि सोडून द्यावें. कांहीं काळानें मायलेंक ही ओळख नाहींशी होते. खाणें, पिणें, राहणें, संभोग, सत्ता वगैरे ह्यांमधील विधिनिषेध, नियम वगैरेंची कल्पनाही नाहीं.

## सदा भय

ज्या प्राण्याच्या अंगीं जास्त बळ असेल त्यानें दुर्बलाची गांठ पडली कीं त्यास फाडून खावें, त्याच्याहून प्रबळ भेटला म्हणजे त्यानें त्याला खावें. "जीवो जीवस्य जीवनं " असा सदा सपाटा चाललेला तेथें निर्भयता कोठील? तृणतरूंस पाहिजे त्यानें न्यावें, पाहिजे त्या कामास लावावें. त्याप्रमाणें मानवेतर प्राण्यांस पाहिजे त्यानें धरून नेऊन जन्मभर कष्ट करण्यास लावावें, वाटेल तर फाडून खावें, वाटेल तें करावें. सुखदुःखें ह्यांचेंही मर्मज्ञान नाहीं, तीं प्राप्त करून घेण्याचीं साधनें माहीत नाहींत, तीं स्वाधीन करून घेण्याची कल्पनाच नाहीं. अनुकूल वेदना झाल्या म्हणजे नाचावें, बागडावें; प्रतिकूल वेदना झाल्या म्हणजे रडावें, ओरडावें म्हणजे झालें. सुखसाधनांचा लाभ आणि दुःखसाधनांचा प्रतिकार ह्याचीच मुळीं कल्पना नाहीं.

## अव्यवस्था.

एक एका जातींत लक्षावधि प्राणि असून त्यांनीं इतस्ततः सैरावैरा फिरावें, कोणी धनी ना गोसावी. येवढ्या मोठ्या समाजापैकीं एखाद्यास एखाद्या त्याजपेक्षां बलाढ्य प्राण्यानें खुशाल मारावें, दाद ना फिर्याद. नांवाला मात्र पशूंचे राजे मृगराज सिंह. पण कृति प्रजारक्षणाची नसून भक्षणाची पक्षिराज म्हणावयाचें, कृति रक्षणाची नाहीं. तात्पर्य, आहार, निद्रा, संरक्षण आणि संभोग हीं कर्में सृष्टिक्रमानुसार योग येईल त्याप्रमाणें करणारे हे प्राणी होत.

## सुख-साधन-निरर्थकता.

रमणीय भूमातेमध्यें धान्य, फळें, पुष्पें व अनंत वनस्पति उत्पन्न करण्याचा धर्म आहे. तिच्यामध्यें अपार खनिज संपत्ति भरलेली आहे. हवेमध्यें, पाण्यामध्यें अग्नीमध्यें, विजेमध्यें, प्राणीमात्राचें कल्याण करण्याजोगे पुष्कळ धर्म आहेत. परंतु अकलेनें त्यांची योजना व त्यांचें मिश्रण केल्यावाचून त्यांजपासून कांहीं घडत नाहींत. मानवेतर प्राणी पडले अप्रबुद्ध. ह्या कल्पना तरी यांस शिवणार कोठून? सारांश, भूमीमध्यें व इतरत्र असलेली अपार संपत्ति व सुखसाधनें ईश्वरानें निर्माण करून न करून सारखींच झालीं.

## मानवावतार.

स्वतांचीच करमणूक, सुख आणि सोयी ज्यास करितां येत नाहींत, इतकेंच नव्हे त्याची कल्पना पण नाहीं; पृथ्वी म्हणजे काय हेंही ज्यास कळण्याजोगें नाहीं; त्यास ती निर्माण करणार कोण अशी शंका तरी कोठून येणार? असल्या अचेतन प्राण्याप्रमाणेंच असलेल्या दगडापासून बहुमवेच्छा धारण करणाऱ्या परमेश्वराची करमणूक कशी होणार? परमेश्वराच्या कृतीवरून तिचा कर्ता कोणी तरी असला पाहिजे असा तर्क बांधून त्याचा शोध करण्याचा प्रयत्न करून तो सिद्धीस नेऊन परमेश्वराप्रत पोहोंचणारा कोणी तरी प्राणी निर्माण झाल्यावाचून परमेश्वराची हौस पूर्ण झाली नाहीं म्हणून गुणधर्मानें मानवरूप धारण केलें.

## नरतनु.

न जंतूनांरजन्म दुर्लभमतः पुंस्त्वं ततो विप्रता ॥
तस्माद्‍ वैदिकधर्ममार्गपरता विद्वत्त्वमस्मात्परं ॥ त्म
आत्मानात्मविवेचनं स्वनुभवो ब्रह्मात्मना संस्थिति॥
मुक्तिर्नो शतजन्मकोटिसुकृतैः पुण्यैर्विना लभ्यते ॥ १ ॥
( स्वानंदसाम्राज्य. )

## सर्वदमनत्व.

इतर प्राण्यांच्या ठिकाणीं जें जें म्हणून वैगुण्य दिसून आलें तें सर्व ह्या प्राण्यामध्यें त्या गोष्टी ठेवून निसर्गानें पूर्ण केलें आहे. मानवेतर प्राणी भटकत फिरणारे ह्यानें आकळून आपल्या कामास लाविले आहेत. न माणसाळणाऱ्या

प्राण्यांचा उपद्रव कमी करण्याकरितां हा त्यांची शिकार करून त्यांस नाहींसें करतो. त्यांचा बलगर्व हरण करून त्यांस बंदिवान करून ठेवितो. ज्याचा मनुष्यांसुद्धां सर्व प्राण्यांस दरारा, ज्याची गर्जना ऐकल्याबरोबर माणसें गर्भगलित होतात, ऐरावतासारखे प्रचंड प्राणी व्याकुल होतात, त्या मृगराजास व त्याचा सोबती व्याघ्र ह्यांस हा माणूस लोकांपुढें नाचवितो व नाक घासण्यास लावितो.

## सुखवृद्धि.

हिमालयासारखे गगनचुंबित पर्वत पाहिले असतां सकृद्दर्शनीं अलंघ्य वाटतात. पण हा वामनमूर्ति मनुष्यप्राणी त्यांच्या शिखरावर जाऊन उभा राहतो; त्यांजवर आपलीं विहारस्थलें बांधितो; तारायंत्रें, आगगाडीचे रस्ते व सडका बांधितो; त्यांचीं पोटें फोडून नानाविध खनिज संपत्ति हरण करून आणितो; त्यांच्यावर शेतें, उपवनें करून झाडें, झुडपें, वनस्पति वाढवून आपली संपत्ति, आपलें सुख आणि सोयी वाढवितो;

## महाभूतांवर अंमल.

पंचमहाभूतांचे गुणधर्म जाणून त्यांचे संयोग व मिश्रणें करून अद्भुत अशा नव्या नव्या कल्पना लढवून त्यांजपासून पाहिजे तीं कामें करून घेतो; ज्याच्या विस्ताराचा पारावार नाहीं व जलाचा अंतपार नाहीं, जो खवळला असतां कित्येक कोसपर्यंत भूमि गट्ट करून टाकितो, त्या सागरावरून हा माणूस आगबोटी, जहाजें भरून नेतो; त्याच्या तळीं काय आहे तें पाहतो; त्यांतील प्राणी घेऊन जातो; मोतीं घेऊन जातो; मीठ तयार करितो; भूमि आणि जल यांजवर याप्रमाणें ह्याची पाहिजे ती सत्ता चालते. आतां तर हवेवर सुद्धां अंमल बसवून अधांतरीं विमानें हे राजश्री चालवूं लागले आहेत.

## बाष्प व विद्युत्.

पंचमहाभूतांवर सत्ता हा प्राणी करीत आहे. बाष्पापासून नानाविध कामें करून घेत आहेच. आतां विद्युतच्याही मागें लागला आहे. बाष्पाऐवजीं वीजच जागजागीं राबविण्याचा ह्याचा विचार आहे. सूर्यास ह्यानें चितारी बनविलें आहे. कोणत्या वेळेस त्याला काय बुद्धि सुचेल आणि तिच्या बळावर हा कोणास काय करावयास लावील आणि आपला केवढा फायदा करून घेईल हें ह्याचें त्यालाही कळत नाहीं.

## परलोकगमन.

पुराणांतरीं दानवांचे पराक्रम आणि माया वर्णिल्या आहेत. त्यांनीं तेहतीस कोटि देव बंदींत घातल्याचें लिहिलें आहे. तें सुद्धां ह्यानें आज करून दाखविलें नसतें असें नाहीं; पण ते देव ज्या ठिकाणीं असतात, तेथें ह्याची गति नाहीं म्हणून ह्याचा इलाज नाहीं. तथापि अन्य गोलांवर गमन करण्याच्या कल्पना ह्याच्या मनांत घोळत नाहींत असें नाहीं. मंगळाविषयीं ह्याच्या कल्पना चालल्याच आहेत. मंगळावरील प्राणी आपल्याशीं दळणवळण करण्याचा कांहीं तरी प्रयत्न करीत आहेत अशा अटकळी हल्लीं निघत आहेत. खरें असेल तर त्या बिचाऱ्यांचें दुर्दैवच ओढवत आहे असें म्हणावें लागेल. एकदां का ह्याचा प्रवेश तेथें झाला तर दोन पायांचें हें भूत त्यास झपाटून आपले गुलाम करून ठेवील ह्यांत तिळमात्र शंका नको. फार काय सांगावें, भगवान निराकार आणि अदृश्य आहे म्हणून बरें आहे. तो जर ह्या भूतलावर दिसता, तर ह्यानें त्याच्यावर सुद्धां तोफखाना सुरू केला असता. दिसत नाहीं तरी भक्तिपाशानें हा त्याला बद्ध करीतच आहे.

## अकुंठित बुद्धि.

असो. ह्याच्या पराक्रमाचें वर्णन करावें तितकें थोडेंच आहे, म्हणून तें आतां पुरें. सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, परम रमणीय पृथ्वी आणि आनंदपरिपूर्ण विषय ह्यांचें सार्थक ह्या मनुष्यप्राण्याच्याच योगानें झालें आहे. ह्याचा एवढा उत्कर्ष आणि एवढा पराक्रम होण्यास निसर्गानें ह्याला अंतःकरण म्हणून एक सहावें ज्ञानेंद्रिय दिलें आहे तें होय. अंतःकरणाचीं चार रूपें आहेत. मन, बुद्धि, चित्त आणि अहंकार. ही मनुष्याची बुद्धि सदा वर्धमान आणि अकुंठित आहे. ही देणगी भूतलावरील दुसऱ्या कोणत्याही प्राण्यास नाहीं.

## करामतीची सीमा.

हा ज्ञानसंपन्न प्राणी, परमेश्वरानें आपली करामत व आपलें अतर्क्य सामर्थ्य ओळखून ह्यानें आपल्यास भजावें, आपला विहार ह्याच्या संगतीनें व भक्तिभावानें व्हावा म्हणून निर्मिला असावा. निसर्गाच्या करामतीची ह्या लोकची सीमाच हा प्राणी करितांना झाली आहे.

## मर्मज्ञान.

सकल सृष्ट पदार्थ, पंचविषय, पंच महाभूत ह्यांचें सार्थक ह्यानें केलें आहे. ही भूमि नंदनवनाप्रमाणें रमणीय ह्याच्या कौशल्यानें झाली आहे. भूमीचें दोहन करून तिजपासून अगणित खाद्यापेय पदार्थ व धनदौलत उत्पन्न करून आपल्या बरोबर सर्व प्राणिमात्रांचें पोषण हा करीत आहे. भूपृष्टावर वास करणाऱ्या सर्व मानवांनीं एकमेकांशीं कसें वागावें, परस्परांचें सुख आणि सोयी कशा वाढवाव्या हें ह्याच्या ज्ञानानें ह्याला कळण्याजोगें आहे. शास्त्रीय ज्ञान ह्याच्या बुद्धीपासून उत्पन्न झालें, समाजरचना, समाजबंधनें बनवून त्याच्या द्वारें मानवी जातीचें कल्याण करण्याचें सामर्थ्य ह्याच्या बुद्धीमध्यें सांठविलेलें आहे. प्रेम, दया, माया, अनुकंपा, परोपकार हे कल्याणकारक गुण ह्याला ठाऊक आहेत. संतोष ही केवढी चीज आहे.तिच्या योगानें अंतःकरण कसें सुप्रसन्न होतें ह्याचा अनुभव आहे. तेणेंकरून दुसऱ्याचा संतोष केला असतां त्याचा आत्मा कसा प्रसन्न होईल व आत्माराम सर्वांच्या ठिकाणीं एक आहे, हेंही प्रयत्नाअंतीं ह्याला कळण्याजोगें आहे. अन्य पक्षीं दुःख म्हणजे काय, शोक म्हणजे काय, नाश म्हणजे काय, आणि अशा हजारों अनिष्ट गोष्टी प्राप्त झाल्या असतां मनुष्याच्या अंतःकरणास कसा पलिता लागून राहतो हें ह्याला स्वतःच्या अनुभवांनीं किंवा दुसऱ्याचें पाहून कळलेलें आहे. "पापाय परपीडनं" ह्यांतील वर्म ह्याला कळण्याजोगें आहे.

## विद्यालयाची उपमा.

ही नरतनु एक विद्यालय होय. मानवांचा परम कृपाळू जनक ह्यानें जीवाचें पुढें कल्याण व्हावें म्हणून त्यास ह्या शाळेंत घातलें आहे. उत्कृष्ट विद्यार्थ्यांचा हेवा बऱ्याच योग्यतेचे कामगार सुद्धां करितात. "कालचें शेंबडें पोर शेवटच्या परीक्षेचा अभ्यास करीत आहे, उद्यां पास झालें म्हणजे रावसाहेब बनून आमच्या डोक्यावर मिरें वाटण्यास येईल." असें त्यास वाटूं लागतें. योग्यता मिळण्याचा मार्ग असेल तेथपर्यंत मजल मारण्याची वाट विद्यालय होय. विद्यालयांत कमाविलेल्या दिव्य ज्ञानानें योग्यता संपादन करितां करितां आपल्या देशाचा अधिपति सुद्धां प्रजासत्ताक राज्यांतील सामान्य मनुष्यही होणें अशक्य नाहीं. नाहींतर ज्ञानार्जनांत आळस करून कपाळकरंटे बनून त्याच

शाळेंत आपल्याच बरोबर लहानपणीं असलेलीं पोरें पुढें अधिकारी होऊन आलीं म्हणजे त्यांच्या चाबकाखालीं काबाडकष्ट करण्याचें केकांच्या कपाळीं येतें. अतएव ऐश्वर्य आणि दुर्दशा ह्या दोन्ही स्थलांच्या वाटा विद्यालयांत असतात, त्याप्रमाणें ह्या नरतनु नामक विद्यालयांतही जीवाला दोन वाटा आहेत. जसें जसें सुकृत जीव करील तसें तसें फल ह्या नरतनूच्या आश्रयानें त्यास प्राप्त होतें. ह्या लोकींचें वैभव, फार तर काय इंद्रपद सुद्धां प्राप्त करून देण्यास ही नरतनु समर्थ आहे. शत क्रतु करून इंद्र आपल्या पदीं आरूढ झाला आहे. ब्रह्मदेवासुद्धां देवऋषिगण आपापलीं स्थानें ह्या नरतनु कामधेनूच्याच आश्रयानें पावले आहेत. पुढील कल्पांत बलि राजा इंद्र होणार आहे. आणि वसिष्ट ब्रह्मदेव व्हावयाचे आहेत. ही वाट सोडून दुसऱ्या वाटेनें पापाचरण करीत जातील त्यांच्याकरितां ह्या लोकीं दुःख, शोक, हाल, अपेष्टा, दुस्सह रोग, क्लेश आणि परलोकीं नरकवास करून ठेवलाच आहे.

## सुखर नगरेषु किमाधिक्यं.

स्वर्गवास आणि इंद्रपद तरी अल्प मतीचेच लोक इच्छितात. प्रगल्भ बुद्धीच्या लोकांस त्यांत कांहींच अधिक वाटत नाहीं. ते म्हणतात इंद्र होऊन तरी काय करावयाचें आहे ! स्वर्गांत तरी जास्त काय आहे ? येथें पंचविषयें भोगावयाचे, ख्यालीखुशाली करावयाची, नाच–रंग–तमाशे पहावयाचे, कामवासना पुरवावयाची, सोमपान किंवा मद्यपान करावयाचें. तेथें तरी तेंच करावयाचें. ह्यांत आणि त्यांत फरक इतकाच कीं, तेथील विषय श्रेष्ठतम असतात. येथें षड्रस, सोम किंवा मद्य; तेथें कल्पवृक्षफळें आणि अमृत. येथें सामान्य युवती, तेथें देवांगना. येथील सामान्य भोग, भोगणारे आपण सामान्यच आहों, तेव्हां आपला संतोष होण्यास सामान्य विषय पुरे आहेत. येथें मृत्यूचा धाक, तो तेथें तरी कोठें चुकला आहे " क्षीणे पुण्ये मर्त्यलोके विशंति " पुण्यक्षय झाला म्हणजे स्वर्गस्थांस खालीं लोटून देतात. मग पुन्हां कर्माचें रहाटगाडगें त्यांच्यामागें लागून ८४ लक्ष योनि त्यांच्यामागें लागतातच.

स्वर्ग लोकांतील भोगांचीं वर्णनें आपल्यास थक्क करून टाकितात, पण विचाराच्या कसोटीस लावून पाहिलें तर ते भोग येथील भोगांपेक्षां श्रेष्ठतम असल्याबद्दल संशयच येतो. देवांगनांची महती वर्णनाप्रमाणें असती तर अप्सरांचा स्वामी इंद्र अहल्येला मोहित होऊन सहस्र भगवान कां झाला असता ?

दमयंतीकरितां दिक्पालांनीं धावा कशाला घेतल्या असत्या ? नलचीं कपट-रूपें धारण कशाला केलीं असतीं ? तस्मात्, स्वर्गांतून निघून फार त्यांत पड-ण्याकरितां येवढी सर्व मांडामांड कशाला करा. असभ्य लाभ नरतन प्राप्त झाली तर साधनचतुष्टयसंपन्न होऊन गुरुकृपा संपादन करावी आणि एकदम सा-युज्य-पद पावून ब्रह्मीं लीन व्हावें, तरच नरतनूचें सर्व सार्थक होय.

## नवी जोड

ईश्वरानें चौऱ्यायशीं लक्ष योनि निर्माण केल्या आहेत. अन्य लोकही पुष्कळ निर्माण केले आहेत खरे. पण सुरूनाची नवी जोड करण्याचा अधिकार ह्या नरतनुवराज कोणत्याही देहास दिलेला नाहीं. सर्व जंतूंमध्यें नरदेह दुर्लभ आहे. मौक्तिकभस्म करण्यास तोळ्यावर विकणारी हीं मोतींच असतात; आणि हजारों रुपये ज्या एका जोडीस पडतात तीं दोन तरी मोतीच असतात. त्या-प्रमाणें कोट्यवधि माणसेंच असतात; पण अपौलिक मोत्यासारखी जीं निवड-तात त्यांच्याच तनु दुर्लभ. भोई, कसाई, खाटिक इत्यादि जातीत नरतनु प्राप्त झाली तर पर्वतप्राय पातकच होणार. तमोगुणी पापपहारक आणि पर-पीडक जातींत जन्म झाला तर लोकांस यमयातना लावण्यांत, लुबाडण्यांत, मारण्यांत, जिकण्यांत आणि छळण्यांतच जन्म जाणार, आणि पातकांच्या राशीच वाढणार. अन्य तनु ह्या अन्य क्षेत्र आहेत आणि नरतनु पुण्यक्षेत्र आहे. म्हणून " अन्य क्षेत्रे कृतपापं पुण्यक्षेत्रे विनश्यति ", अन्य तनूमध्यें झालेलीं पापें ह्या तनूंत दग्ध करितां येतात. पण " पुण्य क्षेत्रे कृतं पापं वज्रलेपो भविष्यति. " ह्या तनूंत पाप झालें तर तें दूर होण्यास जागाच नाहीं; वज्रलेप होतें. ज्ञानहीन जातींत नरतनु प्राप्त झाली तर वरल्यापेक्षां बरी, पण गुराढोरांप्रमाणें तोही जन्म वायाच जावयाचा. म्हणून विद्याज्ञान-संपन्न अशा ब्राह्मणादि जातींत जन्म होणें दुर्लभ आहे. विद्याज्ञान असून आचार धरला नाहीं तर पढतमूर्खच होय. त्याचा कांहीं उपयोग नाहीं. आचार-वानापेक्षां सर्व ज्ञानाचें शिरोभूषण आत्मानात्मज्ञान तें ज्यास असेल त्याची तनु दुर्लभतर होय आणि त्या ज्ञानानें आत्मानुभव संस्थित होऊन जो भाग्याचा पुतळा ब्रह्मीं ऐक्य पावतो त्याची नरतनु दुर्लभतम होय. मग त्याचा अधिकार काय वर्णन करावा ?

**शंकर घाली लोटांगण । इतरांचा पाड कोण ॥**

### संगतीची हौस.

मनुष्य कितीही सुखी व संपन्न असला तरी एकलकोंडे राहून त्याला चैन पडत नाहीं व त्याचें चालावयाचेंही नाहीं. तो सर्वदा संगत-प्रिय असून संगतीची आशा करीत असतो. संगतीकरितां यत्न करीत असतो. अनादिकालापासून मनुष्य न परिवार व समाज प्रिय मानिला आहे. संगतीची संवय त्याच्या अगदीं हाडीं खिळून गेली आहे. त्याच्या सर्व सुखसाधनास परिवाराची मदत त्यास लागते. तो परिवार किती मनोरम व सुखकर आहे ह्याचा विचार पुढील भागांत करूं.

---

# भाग ५.

## परिवार.

**माता ब्रह्म शिशुपणीं, पौगडीं खेळ यौवनीं युवती ॥**
**जरठीं धनसुतचिंता, मनुजा हरिभक्ति केधवा घडती ॥**

### माता.

पृथ्वी आणि विषय ह्यांचा उपभोग घेण्यास निर्माण केलेल्या माणसास त्यांचें काम करण्यास सुगम पडावें म्हणून कुटुंबाची योजना आहे. माणस सर्व प्राण्यांमध्यें श्रेष्ठ आहे खरा, पण जन्मत: अत्यन्त दुर्बल असतो, फार सुकुमार असतो, केवळ पंगु असतो. गाईचें वासरूं जन्मतं तेच दिवशीं उठून उभें राहून आईस पिऊं लागतें. उघड्यावर थंडीवाऱ्यास न जुमानतां राहूं लागतें. थोड्या दिवसांत तृण भक्षण करूं लागून स्वतंत्र होतें. आईच्या लेंकरास उठून उभें राहण्याचें सामर्थ्य येण्यास उणें पुरें वर्ष लागतें. अंगावरून तुटण्यास फार दिवस लागतात. स्वत:चें भक्ष्य मिळविण्यास फारच अवधि लागतो. अशा असमर्थ बालकाचें रक्षण आणि पोषण करून त्याला सर्व सामर्थ्यवान जनाचा गज बनविण्यास मातोश्रीस किती कष्ट करावे लागतात, किती काळजी करावी लागते, काय खस्ता खावी लागते, आत्मसंयमन करून कसें पथ्य संभाळावें लागतें, किती हाल, अपेष्टा आणि

गैरसोयी सोसाव्या लागतात, किती खर्चाखालीं यावें लागतें, याचें वर्णन करण्यास एक ग्रंथच करावा लागेल. ह्या गोष्टी मनुष्यमात्राच्या अनुभवांतीलच आहेत. प्रत्येक मनुष्य मातेच्या किंवा दुर्दैवानें ज्याला तिचा वियोग बाल्यपणींच झाला असेल तर तिच्या ठिकाणीं ज्या धर्ममातेनें रक्षण केलें असेल तिच्या प्रेमप्रसादानेंच वाढीचें पर्वन झालेलें आहे. आपलें पोषण आणि रक्षण करण्याजोगें लेकरूं झालें म्हणजे पशुपक्ष्यांचा संबंध सुटतो. तसें माणसाचें नाहीं. मुलाला नातू झाले तरी तो आपल्या आईचें बालक असतो. त्याला जरा श्रम झाले किंवा उन्हाचा कवडसा जरी लागला तरी मातोश्रींचा जीव खालीं वर होऊं लागतो. त्याला दुखणें आलें तर आपण आजारी असली तो आजार एकीकडे ठेवून आणि आपलीं सर्व सुखदुःखें विसरून देहभान विसरून सगळा दिवस श्रम करिते व सगळी रात्र जागरण करण्यास ती थकत नाहीं. काहीं होवो, पतकरेन, पण माझें लेकरूं परमेश्वरा, भला दे; म्हणून ती नवस करीत असते. परमेश्वर तिला पावला म्हणजे ते अतोनात श्रम तिला मुळींच बाधत नाहींत. परकाष्ठेचा आनंद होतो. पोटांत जाईल तेवढें तिचें, बाकी सगळें मुलाचें. मुलाची हलकी चाकरी करण्यास तिला किळस तिळमात्र येत नाहीं. मुलाचें कल्याण करण्याकरितां त्यास लहानपणापासून सन्मार्गास लावण्याची काळजी तीच करिते. मुलीस आला तीच लाविते. द्रव्याभावामुळें आपल्यास धड वस्त्र नसलें तरी मुलाच्या हौस पुरविण्यास ती सदा तत्पर असते. अनेक कारणांनीं मुलावर बाप रागावला असतां मुलाची सगादणी, त्याचा कैवार किंवा त्याच्याकरितां यजमानाची पायधरणी तीच करिते.

## मातापितरें.

पापण्या ज्याप्रमाणें नेत्रांचें रक्षण सदा सर्वकाल करितात, त्याप्रमाणें मुलांचें संरक्षण मातापितरें करीत असतात. पाऊस, पाणी, ऊनव्हान इत्यादिकांचा मारा आपण सहन करून छत्र ज्याप्रमाणें आश्रितांचें संरक्षण करितें त्याप्रमाणें मातापितरें सर्व संकटें कर्जवाम, हालअपेष्टा, आपण सोसून मुलांचें संरक्षण करितात. त्यांस विद्यामृत पाजितात. त्यांचा भाग्योदय होण्याकरितां जें जें म्हणून करावें लागतें तें सर्व कांहीं करितात. म्हणूनच मायबापांची योग्यता शास्त्रानें देवाहीपेक्षां जास्त मानली आहे. कार्यारंभीं आधीं 'मातृ

देवो भव " म्हणून नमस्कार करावा लागतो. त्यांतल्या त्यांत बापाची ममता थोडी तरी लाभाच्या म्हणजे मोबदल्याच्या इच्छेनें असते पण मातोश्रीची केवळ कळवळ्यानेंच असते. संन्यास घेतल्यावर देवाच्या सुद्धां ऋणांतून प्राणी मुक्त होऊन नारायणरूप होतो त्याला देवासही नमस्कार करावा लागत नाहीं पण मातोश्रीला नमस्कार करावा लागतो. फक्त संन्यास घेणारा मात्र मातृऋणातून मुक्त होतो. बाकीच्यास एका घडीच्या स्तनपानाच्या ऋणांतूनही मुक्त होतां येत नाहीं. मायबापाची योग्यता तुकाराम महाराजांनीं केवढी मानिली आहे पहा--

**माय बाप केवळ काशी । तेणें न जावें तीर्थाशीं ॥**

## सद्गुरु

मायबापांच्या बरोबरीची मदत देणारे आणखी गुरु होत. मनुष्याचें आयुष्यक्रमण इतर प्राण्यांप्रमाणें मर्यादित नसून अत्यंत अमर्याद कर्तव्यें त्याच्यामागें असतात. मानवी ज्ञानांत हरघडी भर पडत आहे. अनादि कालापासून होऊन गेलेल्या नरपुंगवांनीं नानाविध कित्ते घालून ठेविलेले असून त्यांचीं वळणें रोज फिरत आहेत. त्यांच्या चुका म्हणून हल्लींच्या काहीं गोष्टी लोक सांगत असतां उलट पक्ष त्या म्हणण्याचा निषेध करून पहिल्याचें मंडन करीत आहे. कोणी तृतीयपंथच प्रतिपादित आहे. जगांतील अन्यदेशीं निराळेच प्रकार असल्याचें ऐकू येत आहे. असा ओघ चालला आहे तों सगळेंच चुकलें; आपलें पहिलें आहे तेंच खरें, असें दूर देशींच्या लोकांच्याही अनुभवास येत चाललें आहे. आपण आपलें पूर्व सोडिलें हा मोठा वेडेपणा झाला, त्यामुळें मोठी हानि झाली. आतां तें हातीं येणें दुर्लभ असा पश्चात्ताप होत आहे. मनुष्याचा वर्तनक्रम व योगक्षेम चालण्यास चौदा विद्या व चौसष्ट कला यांपैकीं कांहीं तरी येणें अगदीं जरूर झालें आहे. आईबाप पालनपोषण करितात. विद्यादान करण्याइतकी विद्वत्ता पुष्कळ आईबापांच्या आंगीं नसते. असली तरी नित्य नवी विद्या होऊं लागल्या कारणानें आईबापांची विद्या कालानुरूप असत नाहीं. शिवाय पोटाचा उद्योग त्यांच्या मागें असल्या कारणानें त्यांस मुलांस विद्यामृत दुसऱ्या धंदेगिरांकडूनच पाजावें लागतें. तो गृहस्थ गुरु होय. आईबापांच्या अंगच्या सद्गुणांचें व सद्वर्तनाचें प्रतिबिंब मुलाच्या बद्धींत पडून त्याच्याप्रमाणें मुलांची वागणूक होते. त्याप्रमाणेंच

गुरूच्याही सद्गुणांचें व सद्वर्तनाचें प्रतिबिंब विद्यार्थ्यांच्या बुद्धींत पडून विद्यार्थ्यांचें वर्तन तदनुसार होतें. विद्यादाता बापाप्रमाणेंच पूज्य मानिला आहे. विद्यादात्याचें साह्य फार महत्त्वाचें आहे. शिवाजी महाराज ह्यांचे अंगीं जें अप्रतिम सामर्थ्य व सद्गुण आले त्यांचा उगम मातोश्री जिजाबाई व गुरुसम दादोजी कोंडदेव ह्यांच्या सद्गुणांपासून, सद्वर्तनापासून व सदुपदेशापासून झाला. श्रीरामदासाचा उपदेश पुढें झाला.

## सासू.

मुलाचें कल्याण त्यास सन्मार्गास लावून करण्याचें काम आईबापांचें. त्याप्रमाणें मुलीचें कल्याण करण्याचेंही तिच्या मायबापांकडे असतें खरें, पण मुलीचा सहवास त्यांना थोडे दिवस असतो. सुनेस वळण लागण्याचे दिवस तिच्या सासूसासऱ्यांसच जातात. तिला वाढविण्याचें, वर्तविण्याचें, सन्मार्गी लावण्याचें कामही सासूसासऱ्यांस करावें लागतें त्यांत सासऱ्यापेक्षां सासूलाच फार करावें लागतें. सासू आईच समजली पाहिजे. केवळ सुनेच्या कल्याणाच्या हेतूनें ती सुनेची काळजी घेते असें नाहीं. आपल्या घराण्याचें भावी सुख व कल्याण आणि लौकिक कायम व्हावा व वाढावा म्हणून तिला काळजी लेकीप्रमाणेंच सुनेची असते. याप्रमाणें तरबेज आणि सद्गुणमंडित सून करून ती मोठी झाली म्हणजे सासूचें काम सरून पुत्र आणि ती आपण वाढविल्याप्रमाणें संसार कसा थाटानें करितात हें पहाण्याची मात्र इच्छा मायबापांस राहते. आणि सुनेचा पुढील सर्व कल तिच्या पतीकडे जातो.

## शास्त्राची खबरदार योजना.

मातापिता हीं जशीं पुत्राचीं दैवतें आहेत, त्याप्रमाणें पति हा कांतेचें दैवत होय, असें आपल्या शास्त्रकारांनीं ठरविलें आहे. आपल्या शास्त्राची ही एक खुबी ध्यानांत ठेविली पाहिजे कीं, त्यांनीं ज्या मर्यादा आणि जीं कर्तव्यें ठरविलीं आहेत तीं केवळ कर्तव्याच्या तत्त्वावर रचिलीं आहेत. मोबदल्याच्या तत्त्वावर ठरविलीं नाहींत. ह्यामुळें आपल्यामधील संबंध भक्ति आणि प्रेम ह्यांचा असतो. मोबदल्याच्या तत्त्वावर संबंध असला म्हणजे केवळ बाजारी बनतो. त्यांत प्रेम किंवा भक्ति ह्यांचा वास होण्यास जागा नसतो. पत्नीनें नवऱ्याची सेवा करण्याची ती आपल्या कल्याणाकरितां भक्तिभावानें करावयाची.

आपल्यास पतीकडून मोबदला भरपूर मिळेल तर आपण तितक्यापुरतें प्रेम दाखवूं, नाहीं तर सोडून देऊं, काही मदत घेऊं म्हणजे झालें. अशी भावना मोबदल्याच्या तत्त्वाच्या ठिकाणी असते.

## पतीच दैवत.

पतीला पत्नीनें दैवत कां न मानावें बरें? आपलीं प्रत्यक्ष दैवतें मातापितरें, आपल्या जीवास जीव देणारे सहृदय, आपल्यावर प्राणाप्रमाणें ममता करणाऱ्या सहोदरी, तशीच कुटुंबांतील आणखी प्रेम करणारीं माणसें त्यांच्यापेक्षां, कोठली तरी घराण्यांतील मुलगी पण तिला जो जवळ मानितो, आपल्या सर्व ऐश्वर्याची व सुखदुःखाची सत्ता साहेबीण करतो. जिच्या पालनपोषणाकरितां अनुदिन घाण्याच्या बैलाप्रमाणें संसारघाणा फिरवितो. लाड आणि सोहळे पुरवि-ण्याकरितां द्रव्य संपादन करण्यासाठीं मान अपमानाचा किंवा विहिताविहिताचा कांहींसा विचार करीत नाहीं. तिला आणि तिच्या परिवाराला केवळ आपले प्राण समजतो. सर्व संसारयात्रा तिच्याबरोबर करतो. संसारांतील मेहनतीचीं, अनसाहसाचीं, प्राण धोक्यांत घालण्याचीं, हाल अपेष्टांचीं कामें स्वतः करून, त्यांजपासून मिळणाऱ्या धनदौलतीचा खरा उपभोग तिला देतो. सदा सर्वदा घरांत राहून मिजास हिनें भोगावी, अलंकार भूषणें हिनें ल्यावीं, सुगंधिक द्रव्यें हिनें आपल्या अंगास लावावीं, फुलांचे गजरे हिनें घालावे, हिचा थाटमाट आणि सौंदर्य पाहून त्यानें स्वर्गसुख मानावें. त्यानें मिळविलेल्या द्रव्यावर हिनें दानधर्म करावा, लौकिक मिळवावा, त्यानें जरी कोणतें पुण्यकार्य केलें तरी त्याचा निम्मे वांटा तिला देणें हा मोठ्या संतोषानें पतकरितो. हिच्या दुष्कर्मा-बद्दल, चकीबद्दल दंड त्यानें सोसावा, असें लिहावें तितकें थोडेंच. तात्पर्य, नवरा हा आपला देवच अशा भावनेनेंच तिनें त्याची सेवा करणें पाहिजे. आणि केली असतां तिला ती फलद्रूप होते. तिन्ही देव तान्हीं बाळें करून अनसूयेनें दाविलीं, लक्ष्मी आणि सावित्री यांची छाप कोणत्या बळावर उतरली! आपला भर्ता यमाच्या हातून सावित्रीनें कोणत्या सामर्थ्यानें परत आणला!

## पत्नि.

कार्येषु मंत्री गृहकर्म दासी ॥ धर्मानुकूला क्षमया धरित्री ॥
भोज्येषु माता शयनेषु रंभा ॥ षड्गुणभार्या कुलमुद्धरंति ॥

बोलूं नये" अशींही पुष्कळ वाक्यें आहेत. आणि अवतरणांत लिहिलेलें वाक्य त्यांच्या विरुद्ध आहे. हा विरोध दिसतो. विचार करून पाहतां दोन्ही उपदेश सत्यच आहेत. स्त्रीला मंत्रित्व देणें तें तारतम्य पाहून द्यावें इतकाच तात्पर्यार्थ आहे. बादशहास शरण न जातां जाहगीरी प्रत्यय करून त्यास शुद्धीवर आणावें ही मसलत छत्रपतीस जिजाबाईनींच दिली कीं नाहीं. राघोबादादांचा धिंगाणा पण प्रतापी अहल्या मातेनें आपल्या चातुर्यप्रचुरपत्रानेंच बंद केला कीं नाहीं? स्त्रिया तितक्या मूर्ख आणि पुरुष तेवढे शहाणे असें नाहीं.

## गृहकर्मदासी.

जी स्त्री वर लिहिल्याप्रमाणें प्रधानाचें पद पावली, तीच गृहकर्म करण्यास किती खालीं उतरली पण तेथें दासीची भूमिका तिनें पत्करिली. पदरीं माणसें बाळगणारा कुटुंबें फारच थोडीच असतात आणि असलीं तरी नोकरांनीं केलेलीं कामें भाड्यांचींच, तीं नित्याचें व्हावयाचीं कळकळ किंवा प्रेम असल्यावाचून कांहीं कांहीं कामें व्हावीं तशीं होतच नाहींत. तीं कार्यें सुशील भार्या नोकरचाकरांच्या हातून कधींच करवीत नाहीं. पतीची शुश्रूषा आणि मुलाबाळांची सरबराई हीं कामें सुशील स्त्री कधीं दुसऱ्यावर टाकीत नाहीं. तीं स्वतः मनाजोगीं केल्यावाचून तिचें समाधानच होत नाहीं. चाकर म्हणून राबावें आणि धनी होऊन भोगावें.

## धर्मानुकूला.

गृहस्थाश्रम आपलें पोट भरण्यापुरताच नाहीं. हा आश्रम स्वार्थ आणि परमार्थ दोन्ही साधण्याकरितां आहे. समाजांतील जे लोक केवळ निवृत्तिमार्गास लागतात त्यांचा, दीन, अनाथ ह्यांचा, व समाजाच्या कल्याणाकरितां धार्मिक विद्या संपादन करून याचक वृत्तीवर योगक्षेम चालवितात त्यांचा निर्वाह गृहस्थाश्रमी ह्यांच्या व राज्याच्या आश्रयानें व्हावा अशी योजना शास्त्रकारांनीं करून ठेवली आहे. तीस अनुसरून अतिथी, अभ्यागत, शास्त्री, पंडित, भटभिक्षुक, [illegible], पाहुणे वगैरे परकीं माणसें गृहस्थाश्रमाच्या आश्रयास येतात. त्यांचा आदरसत्कार भक्तिपूर्वक झाला असतां त्यास होणाऱ्या संतोषापासून मिळणारा स्वाभाविक आशीर्वाद फार श्रेयस्कर होतो. त्यांची बरदास्त ठेवण्यास स्त्रीला पुष्कळ मेहनत पडते, पण ती मेहनत इहपरत्र फार श्रेयस्कर समजून सुशील गृहिणी मोठ्या आनंदानें करिते. नित्यनैमित्तिक

कर्मांत ती पतीची सहचारिणी होऊन तीं कर्में यथासांग पार पाडण्यास नवऱ्यास मदत करून त्याच्या व आपल्या जन्माचें सार्थक करण्याकरितां ती दासीची भूमिका टाकून गृहस्वामिनी आणि सहधर्मचारिणी बनते.

## क्षमया धरित्री.

पृथ्वीला प्राणी किती प्रकारचे उपद्रव करतात हें पूर्वी लिहिलेंच आहे पण तितकी इजा सोसून ती परोपकारी भूमाता तिजवरील प्राण्यांचें पालनपोषण आणि कल्याणच करिते. त्याप्रमाणें पत्नि क्षमाशील असते. आपला कांहीं अपराध नसतां जरी पती रागाच्या तवींत कांहीं दुरुत्तरें बोलला तरी चतुर पत्नी तेवढा वेळ समजून घेऊन राग गेल्यावर मोठ्या नम्रपणें त्याची चूक त्यास दाखवून त्याचें समाधान करिते.

## भोज्येषु माता.

आपल्या बालकानें पुष्कळ खावें, त्याला चांगलीं चांगलीं पक्वान्नें मिळावीं, अशी इच्छा अन्य कोणापेक्षा मातोश्रीसच जास्त असते. मुलाला जेवण मिळवाव-ण्याचें प्रेम मातोश्रीखेरीज व्यर्थ आहे. तर्क अनुपम प्रीतिसंदिग्ध करणारा, पण तें मातृप्रेम तिला प्राप्त नाहीं म्हणून कवींनीं भोजन काळीं तिला मातेची उपमा दिली आहे. तिनें सर्वांसच मातृप्रेमानें भोजन घालावें.

## शयनेषु रंभा.

विहारकालीं पतिव्रता स्त्री प्रसन्न चित्त राहून अंतःकरणपूर्वक पतीचे मनोरथ पूर्ण करते आणि त्याची सेवा करिते. तशा आनंदाच्या प्रसंगांत प्रपंचाच्या दगदगीच्या गोष्टी काढीत नाहीं. अशा प्रकारचें स्त्रीरत्न प्राप्त होण्यास पूर्व पुण्याईच पाहिजे. सुशील सद्गुणमंडित स्त्रीरत्नास पतिआज्ञा प्रमाण. त्यास पतिसेवेपेक्षां कांहींच जास्त वाटत नाहीं. पोटचा पुत्र सुद्धां स्वहस्तें मोक्षास लावण्याचा प्रसंग आला तर त्यास सुद्धां पतिव्रता डगत नाहीं. कयाधु-चांगवली-चांगुणा-इत्यादि स्त्रियांनीं आपली एकनिष्ठ भक्ति जगास दाखविली, आणि ती पाहून परमेश्वरानें त्यांजवर कृपा केली. हिंदु स्त्रियांची अमोल श्रद्धा सती जाण्याच्या प्रकारावरून जगजाहीर आहे.

## संतति.

संततीला मूल ही संज्ञा मोठी मार्मिक आहे. वृक्ष किंवा वनस्पती लागली

हें समजण्याचें लक्षण मूल फटणें हेंच होय. त्याप्रमाणें मनुष्याचा संसार रुजू लागला असें मनुष्याला मूल फटेल म्हणजे संतति होईल तेव्हांच समजावें जोंधळा मूल फटलें तर मुलगा फटला अथवा मुलगा झाला म्हणावें. कमलोर लहानशी मुळी फुटली तर मुलगी फटली अथवा मुलगी झाली म्हणावें. प्रपंचांत आनंद आणि विसांवा काय तो संततीच्या ठिकाणीं आहे फार दिवस काम करून थकलेल्या भार वाहकाच्या डोक्यावरील मोट नव्या दमाच्या दुसऱ्या मजुरानें घ्यावी. थकलेले मजूर विश्रांतीस चाखून नव्या दमाचे मजूर कामास लावावे अशी मालक योजना करतो, त्याप्रमाणेंच निसर्गाची आणि समाजव्यवस्थापकांची पुत्र संबंधानें योजना आहे. पुत्रानें मातापिता ह्यांच्या आज्ञेंत पूर्णपणें राहून त्यांची सेवा करावी हाच पुत्रधर्म सांगितला आहे. आईबापांचा हेतु त्यांनीं सांगण्यापुर्वीच ओळखून जो पूर्ण करितो तो सुपुत्र, त्यांनीं सांगितल्यावर करितो तो पुत्र, आणि त्यांनीं सांगून जो करीत नाहीं, तो कुपुत्र होय.

## मातृपितृभक्त.

पुंडरिकाची मातृपितृभक्ति व सेवा पाहून पंढरिनाथ प्रसन्न होऊन आले, पण त्याच्याशीं बोलून त्याचा आदरसत्कार करण्यास त्यास वेळ कोठला म्हणून त्यानें वीट दिली, तिजवर भक्ताजवळ हरि उभे आहेत. श्रीरामांनीं पितृवचन सत्य करण्याकरितां वनवास पतकरिला. श्रावण मातापिता ह्यांस स्कंधावर वाहवत काशीयात्रेस नेत होता. "भिक्षा आणिली असेल तर पांचजण वाटून घ्या" असें मातोश्रीनें म्हटलें म्हणून अर्जुनानें मिळविलेली द्रौपदी भ्यसनीं पांडवास वाटून दिली बापाचें नांव ज्याच्या पराक्रमानें लुप्त होतें तो सुपुत्र, बापाचे नांवावर विकणारा पुत्र व बायकोच्या नावावर विकणारा कुपुत्र होय. पुत्रानें लौकिक मिळवून प्रपंचाचा भार बापाच्या डोक्यावरील उतरून घेतला असतां पित्याला विश्रांति मिळून अनुपमेय आनंद होतो. पुत्राला आत्मा म्हटलें आहे हें यथार्थ आहे. कृपण मनुष्य कवडीसाठीं प्राण देतो, पण जन्मभर जोडून मुलास देताना वाईट कोठें वाटतें? उलटें समाधानच वाटतें. ठीकच आहे, कां न वाटावें? आत्म्याला द्यावयाचें नाहीं तर कोणास द्यावयाचें?

## परलोकसाधन.

पुत्रापासून परलोक साधनही होतें. पुत्र म्हणजे नरक यापासून उद्धार करणारा असा पुत्र शब्दाचा अर्थ आहे. आईबापाच्या हातून पाप झालें असेल त्यांतून त्यांची सुटका होण्याकरितां त्यांचें अंत्यदैहिक कर्म करण्यास व गयावर्जन करण्यास पुत्र पाहिजे. आपल्या मागें आपलें घराणें कायम राखून आपली परंपरा चालविण्यास पुत्र पाहिजे सगराचा उद्धार करण्याकरितां भगीरथानें गगनगामी गंगा भूतलीं आणून सगळ्या जगाचा उद्धार करण्याची सोय करून ठेविली ही कथा जगजाहीरच आहे.

## इतर संबंधी.

वर मुख्य मुख्य परिवाराचें वर्णन केलें आहे. त्याखेरीज सहोदर, भगिनी ही जवळची माणसें आणि काका, मामा, आत, मावशी, सोयरे पुष्कळ असतात. त्यांजपासूनही पुष्कळ फायदे व सुखें आपल्या त्यांच्यापाशीं असलेल्या वर्तनानुसार होतात. त्यांचें वर्णन करून पाल्हाळ वाढवीत नाहीं.

## सामग्रीसिद्धता.

सुरम्य पृथ्वी, आनंदपरिपूर्ण विषय, सर्व अन्य प्राण्यांवर सत्ता विद्या, कला व कौशल्य ह्यांची समृद्ध, अनादि कालापासून साठलेला अनुभव, संरक्षण, शिक्षण देण्यास माता, पिता, गुरू, मंत्री चतुर ललना साह्य करण्यास व आनंद वाढविण्यास संतति, आणि बंधुबांधवादिक सुहृद्. इत्यादि चारनों साधनसामग्री सिद्ध होऊन तिच्या सह्यानें जिवाजी पंचविषयांचा कोश म्हणून ज्यास प्रपंच म्हणतात तो थाटामाटानें यथास्थित व यथासांग करण्यास निघाले आहेत. त्याचें विवरण पुढील भागांत लक्षपूर्वक अवलोकन करा.

---

# भाग ६.

## संसारसम्यक्सार.

सानंदं सदनं सुताश्च सुधियः कांतामृदुभाषिणी ॥
सन्मित्रं सधनं स्वयोषितिरतिश्चाज्ञापराः सेवकाः ॥

आतिथ्यं शिवपूजनं प्रतिदिनं मिष्टान्नपानं गृहे ॥
साधोःसंग मुपासतेहि सततं धन्यो गृहस्थाश्रमः ॥

( सु. )

## सर्वांचा ओढा आनंदाकडे कां?

मनुष्यमात्राच्या मनाची धाव छंदानुरूप आनंदाकडे आहे असें मागें सिद्ध झालें. सर्वांचाच ओढा आनंदाकडे कां असावा, असा प्रश्न सहज उत्पन्न होतो. मन सच्चिदानंदापासून उत्पन्न झाल्या कारणानें आनंद हा त्याचा जातिस्वभावच आहे. एखादा उंदीर बिळांतून बाहेर पडतांच बीळ झांकलें गेलें म्हणजे तो त्याच्या शोधार्थ सैरावैरा धावूं लागून, या कोपऱ्यांतून त्या कोपऱ्यांत, आणि त्या कोंपऱ्यांतून ह्या कोंपऱ्यांत, ज्याप्रमाणें धुंडाळूं लागतो, त्याप्रमाणें मनाची तांबळ उडाली आहे. मन परमेश्वरापासून निघाल्याबरोबर अविद्यामायारूप आवरण आत्म्याआड पडून त्याची आणि मनाची ताटातोड झाली, तेव्हांपासून मनाला विश्रांति नाहीं. सदासर्वकाळ आनंदाच्या शोधार्थ परिभ्रमण करून त्रिभुवन धुंडाळीत आहे.

## सुखाचीं मंदिरें

बाळपणीं मन अगदीं पूर्वावस्थेंत असल्या कारणानें सुखाचें काय जें वसतिस्थान तें माता वाटतें. तिजपासून क्षणमात्रही दूर होणें त्यास दुःसह होतें. जसजसें मनुष्य मोठें होत जातें, तसतसा मनाचा विकास होऊं लागून ईशसृष्टि आणि जीवसृष्टि या अपार पारावाराकडे त्याची नजर गेली म्हणजे, त्याला हरएक वस्तु रमणीय वाटून आपलें जीव जेथें सुख तेथें आहे असें मानून, तिच्याच भजनीं तें लागतें. नाना प्रकारचे खेळ त्याला आकर्षून घेतात. तारुण्याचा प्रादुर्भाव होतांच अंगीं मदनाचा संचार होऊं लागतो. मनाचा विकार वाढूं लागून हरएक वस्तूचें स्वरूप कळूं लागतें. इंद्रियांच्या ठिकाणीं नवतीचा पूर भरून जातो. शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हींच काय तीं सुखाचीं आणि आनंदाचीं विलासमंदिरें वाटूं लागतात. त्या विषयाचीं मुख्य साधनें कनक आणि कांता यांसारखें नंदनवन त्रैलोक्यांत नाहीं, अशी पक्की खातरी होते. "सकलसुखसीमा सुंदरा" हें वाक्य केवळ श्रुतितुल्य मान्य होतें. अग्निनारायणाला जों जों इंधन प्राप्त होईल, तों तों

त्याची भूक जास्त वाढत जाते, त्याप्रमाणें ह्या विषयांचा सोलगड वाढत जातो, तों तों त्यांचा विस्तार वाढून त्यांच्याविषयींची इच्छा अनर्वाद वाढते. जों जों विषय चें दृष्टीस माजतें तें तों विषयांच्या साधनांचा कनक व कांता ही दुष्कल साधन नसून मूर्तिमंत सुखें हींच आहेत, असें वाटून ज्या सुखाच्या साधनार्थ त्यांचा उपयोग त्या सुखास विसरून जाऊन ह्या साधनाकरितांच हालअपेष्टा आणि अपमान सोसून व जीव गेला तर बेहत्तर, पण दामाजीपंत किंवा प्रियतमा यांस लवमात्र धक्का न लागो असें त्यास वाटूं लागतें.

## सानंदं सदनं.

दैववशात् श्रीमंताच्या पोटीं जन्म झालेला असला म्हणजे घोंडारें, मळेनळे वागबगीचे वगैरे यथास्थित असतात. विलासमंदिर निराळें, आरामहाल निराळा, उपवनें निराळीं, जलमंदिर निराळें, केलिमंदिर निराळें, तात्पर्य दीलखुष होण्याजोगें घर असतें.

## सुताश्च सुधियाः

पांच पुत्र, सहावी कन्या ही श्रीमंताचीं लेंकरें सर्वतोमुखीं त्यांची तारीफ चालते. कांहीं बोललीं किंवा कांही केलें तरी लोक वाहवा करितात. पितृवचनभंगाचें कारणच नाहीं. यामुळें अर्ध्या वचनांत विनयानें वागणारे पुत्र आणि आपल्यापेक्षा सुखी घराण्यांत पडल्या कारणानें अलंकारभूषणें ह्यांचा भार मोठ्या जुलमावर वाहणारी लाडकी लेंक आणि त्या सर्वांस पुत्रोत्साह झालेले?

## कांता मृदुभाषणी.

कोणत्याही गोष्टीला कमी नाहीं. तोंडांतून निघण्याचा अवकाश कीं. चाहेल तो पदार्थ, वस्त्र, अलंकार, आणि भोगचाई साहेबांच्या सेवेस हजर, चाईसाहेबांस उद्योग काय तो स्वतःचा थाट, स्वतःचें रंजन आणि यजमानाची मनधरणी, मग सेवातत्परतेला काय उणें! त्यांत आंगीं चातुर्य आणि थोर कुळांत जन्म असल्या कारणानें श्रीमंताची मर्जी संपादन करण्यास लागणारा विनय, तोंडपुजेपणा, मानभावी गोड भाषण, नजर, आर्जव व पुढेंपुढें गोंडा घोळणें, ह्या कला पूर्ण अवगत, मग पतीला तळहातावर झेलून लवणभंजनानें आपल्या हातांतील कळसूत्री बाहुलें करून ठेवण्यास काय उशीर?

यजमानास शिंक आली पुरे कीं बाईसाहेबांचा जीव खालीं वर होऊं लागलाच. चार औषधें घेऊन सेवेस हजर. पानावर उन्हाचा कां कवडसा पडेना,

कीं पैठणीच्या पदराची सावली केलीच. अहाहा ! अशी धर्मपत्नी प्राप्त झाली असतां स्वर्गसुख करतलामलकाप्रमाणें कां न वाटेल ?

## आज्ञापरः सेवकः

ज्याची पत्नी आणि पुत्र इनके सेवातत्पर, आणि ज्याच्या घरीं नित्य नवा देणग्या आणि दाग दागिने मिळावयाचे त्याचे सेवक अहोरात्र तत्पर असतील, ह्यांत काय नवल ? काळोखांत मध्यरात्रीं मोठ्या बिकट रानावनांतील एखादा पदार्थ मिळावा, अशी इच्छा दाखविली कीं पुरे, श्रमाचें सार्थक होण्यास उशीर नाहीं. हें माहीत असल्या कारणानें आपल्या जीवाचें रान करून तो पदार्थ पैदा करून आणून हजर करण्यास तयार. इमानी आणि आज्ञा शिरसा वंद्य करणाऱ्या सेवकापासून होणारा संतोष सामान्य नाहीं.

## आतिथ्य.

वरच्या थाटाचे यजमान आणि परिवार असल्यावर त्या घरीं पाहुणे आणि आतिथ्य करून घेणारे, यांच्या गर्दीला काय तोटा ? " मधु दिसे बहु सालियावरी ॥ सोयरे जमा होति त्या घरीं " असें सहजच होतें. भिक्षुक, हरदास, पुराणीक, भाट, बहुरूपी, नट, नर्तक, ह्यांच्या झुंडी येऊं लागतात. संभावना आणि बिदागी मिळाल्यावर अनमान कां ? उदरनिमित्त बहुरूप वेषः असल्या साधूंचे मेळे येऊं लागतात. " साखरेची गोडी मुंगी घाली उडी " असा प्रकार होतो.

## शिवपूजनं

घरचीं देवपूजा, नित्य अनुष्ठानें, एकादशणी, " यजमानास अनिष्ट तें उपाध्यास इष्ट " या न्यायानें ग्रहांचे जप, दानें, शांति वगैरेच्या निमित्तानें पैसा ओढण्याचा उपाध्येबुवांचा सपाटा चालू असतो. यथासांग कर्म कितपत होतें आणि घोटाळे काय असतात तें राम जाणे !

## मानमान्यता.

सरकार दरबारांत बहुमान, प्रवेशाचा लाब खडी ताजीम, राजासनासन्निध जागा, सभा, कमेट्या झाल्या कीं अध्यक्ष स्थानीं योजना, नवे नवे किताब या प्रमाणें बहुमान नेहमीं होत असतो दरबारांत किंवा गांवांत कोणतेंही कृत्य रावसाहेबांच्या सल्लामसलतीशिवाय व्हावयाचेंच नाहीं. रावसाहेबांचें आगमन सन्मा-

नाचें सदाचारीच असावयाचें; रस्त्यानें जातांना नमस्कार, जयगोपाळ, शरणागत, रामराम, मुजरे, जोहार आणि सलाम घेतां घेतां हात दुखू लागतो.

## शब्दविषयास पर.

जीवराज संसार करण्यास निघाले, त्यांची दैववशात अशीच स्थिति झाली. परमेश्वर कृपेनें सर्व गोष्टींची अनुकूलता असून रमणीय व रसिक भार्या लाभली. सुखाच्या सप्तानें अपत्यास सुख मिळेल असें वाटल्यावर नेटें स्वार्थसाधु नजर, सर्व लोकांची चंडाळ चौकडी जमावयाचीच, आणि विषयवासना आपला धरखुळ माजवावयाचीच. जाताजाता पहिल्या सपाट्यास शब्द विषयानें मोहना घातली. त्यांचे कान सदासर्वकाल गायन ऐकण्याविषयीं लोलूप झाले. शुक, सारिका, चंडोल वगैरे नाना प्रकारचे नाना देशांतले पक्षी त्यांनी जमा करून त्यांस गाण्यास, नाचण्यास, शिकविण्याकरितां पाळणें ठेविले. तास तास दोन दोन तास त्यांची मजा पहात व गाणें ऐकत बसावें, खुषमस्कऱ्यांनीं आणखी आणखी नादीं लावावें. सदा यावी, रोज नवे पक्षी आणावे. याप्रमाणें पक्ष्यांचा थाट चालला असतां तंतुवाद्याचा चटका त्या खुषमस्कऱ्यांनीं लावून दिली. हजारों रुपये खर्चून नवीं जुनीं वाद्य जमा केलीं, तीं वाजावण्यास व वाजविण्यास शिकविण्यास त्या त्या कलांतील दर्दी लोक ठेविले त्यांनाही कांहीं तास जाऊं लागले. जों जों कर्णांस शब्द विषय मिळूं लागला तों तों त्यांची तृप्ति होण्याचें एकीकडे राहून त्यांची तृष्णा अधिकाधिक वाढूं लागली. पक्षी आणि निर्जिव वाद्यें यांनी जर इतकी गमत होते, तर गवई लोकांकडून त्या वाद्यांच्या सहाय्यानें गाणें केलें तर फारच बहार होईल. असें खुषमस्कऱ्यांनीं मनांत भरवितांच जाती परजातीच्या गवयांची योजना झाली. आगीवर तेल पडावें त्याप्रमाणें कर्णतृष्णा भरारली. गवयापासून चांडाळ चौकडीची कामवासना थोडीच तृप्त होणार! त्यांस तर तें पाहिजे होतें, पण प्रथमच वेश्याजनांची गोष्ट काढली असती तर सुशील जीवराज आणि त्यांची प्रियकर गृहधर्मीण यांस रुचलें नसतें म्हणून पायरी पायरीनें त्यांनीं यजमानास आणि यजमानीणीस जाळ्यांत गुंतविल्यावर जनानी गाण्यांचीही रेलचेल करून दिली. त्यापुढें मध्यरात्रीनार्थ पोऱ्यांचे तमाशेही होऊं लागले. मृगनागप्रमाणें जीवराज गायनानें डोलूं लागले. गायनकलेंत आपल्यास मोठे दर्दी समजूं लागले.

मधून मधून कथा कीर्तनेंही होत असत. पोटभरू हरदास, यजमान आणि त्यांचे परिवार यांचें धोरण ठेवूनच आपलें काम करीत असतात. कथा तरी शृंगार शतक, शुकरंभा संवाद यांतील मार्मिक श्लोकांनीं आणि लावण्या, संगिते, ह्या चालीवर प्रतिष्ठित तमाशाच बनूं लागल्या.

## स्वर्गाचा हल्ला.

गायनाच्या नादास्तव जवळ विलेल्या वेश्या तरुण, खुबसुरत नखरेबाज आणि हावभाव पटु. त्यांचे नेत्रकटाक्ष म्हणजे अर्जुनाच्या किंवा श्रीरामाच्या बाणाप्रमाणें अमोघ होत. त्यांच्यापुढें महान महान ज्ञानी आणि निग्रही ऋषी सुद्धां टिकले नाहींत. मग भोळेभाबडे सदा घृतकुल्या मधुकुल्या, झोडणारे जीवराज काय टिकणार ? झाले त्यांचे कुनरे. त्यांच्या व आपल्या संतोषाकरितां कनक वस्त्रें, ऊर्णावस्त्रें, त्या जे जे म्हणतील ते ते पदार्थ पुरविण्यांत द्रव्याचा व्यय होऊं लागला.

चक्रांत एकदां बोट गुंतलें कीं, उलटा चरक फिरला नाहीं तोंपर्यंत सर्व शरीरही तो पिळून टाकतो. त्याप्रमाणें एक विषय मनांत घुसला कीं, पांचीं आलेच समजावे.

## रूप मोहनी.

गायनाच्या निमित्तानें रूप विषयाचाही नाद लागला. रूपविषयाच्या प्रत्यक्ष मूर्तीच ज्या वेश्या त्याच गळयांत पडल्या. रोज मजलसीच्या नादानें डोळे सवकले. नाटकगृहें, प्रदर्शनें, छकडी, सरकशी, तमाशे, वगैरे पाहण्यास वेश्या बरोबर स्वतां गेलेंच पाहिजे, या प्रमाणें रूप विषयाचाही सुकाळ झाला.

## दुर्व्यसन-दंभ.

हलकट लोकांची संगति म्हणजे दुर्व्यसनाचें द्वार व दुर्गतीचें मूळच होय. हळू हळू गांजा, दारू, इत्यादिही आपली कृपा जीवराजावर करूं लागली. कोजा खुशालचंद बनून दंभाचा भक्त झाला, म्हणजे कामावर लोक आपल्या घरीं यावें, दरबारांत आपलें वजन असावें, त्या योगानें सर्व लोकांवर आपली छाप असावी सर्वांनीं आपल्यास भ्यावें. असें त्यास सहजच वाटूं लागतें. जीव राजापाशीं विपुल द्रव्य आणि वर लिहिल्याप्रमाणें त्याच्यावर पंच विषयांची झालेली कृपा ह्यामुळें पोलीस शिपायापासून [illegible]ड्यासाहेबापर्यंत कोणीही सरकारी का-

मग,र येवो त्याचा त्याच्यापरी आदरसत्कार रावसाहेबांकडे व्हावयाचाच. वरिष्ट प्रतीचे कामगार आले कीं, रावसाहेब त्यांच्या तैनातीस असावयाचेच. त्यांस मेजवान्या, पानसुपाऱ्या व्हावयाच्याच. नाच, तमाशे, बैठकी ह्यांची सामग्री सिद्धच असल्याकारणानें त्यांचीही व्यवस्था व्हावयाचीच. मग ते मिंधे करून जिवाजीपंत लोकांचीं कामें त्याजकडून करून देण्याकरितां दलाली करूं लागले. अत्तर, गुलाब, गुलाल, हार, तुरे, गजरे, अरगजांच्या डब्या, वगैरे कामगार लोकांची मनधरणी करण्याकरितां तयारच.

## सुखाची धुंदी.

बहिणी, भाऊ, आप्त, सोयरे, कन्या, पुत्र वगैरे गोकुळाप्रमाणें परिवार असून यजमानावरून सर्व ओवाळून जाणारीं अशी स्थिति प्राप्त झाल्यावर " कोन्योस्ति शशिब सद्रशं मया " असें कोणास वाटणार नाहीं.

अशा सुखाच्या सुकाळांत असणारे जीवराज यांस संसार दुःखमूल आहे, असें एके वेळीं कथेंत ऐकूं आलें, तेव्हां त्यांस मोठा चमत्कार वाटला. "सुख पहातां जवा पाडें, दुःख पर्वता एवढें "हा संतशिरोमणीचा अभंग ऐकून त्याचा ते विचार करूं लागले, कावीळ होऊन नजर पिवळी होते, त्याप्रमाणें ऐश्वर्य-रोगानें सुखमय झालेले त्यांचे विचार होते. त्यांस असें वाटूं लागलें कीं, लोक ह्या अभगाचा अर्थ करितात तो चुकीचा आहे. प्रपंचांतील सुखें किती म्हणून वर्णन करावीं. एका एका सुखाची सुद्धां किंमत कोणास करितां येणार नाहीं. असें असतां महासमर्थ श्रीतुकाराम महाराज सुख जवा पाडें असें कसें म्हणतील हवा, पाणी, उजेड, वगैरे सहज प्राप्त होणाऱ्या गोष्टींचें जसें महत्व कोणाच्या लक्षांत येत नाहीं, तसेंच संसारांत होणाऱ्या सुखाचा महिमा कोणी मनांत आणीत नाहीं. पंच विषय आणि मनास होणारे भोग यांपासून होणाऱ्या सुखाचा हिशोब आपण बरोबर ठेवीत नाहीं, सुखदुःखाची तुलना बरो-बर करून पहात नाहीं, म्हणून सुख थोडें व दुःख फार वाटतें. बारीक नजरेनें तंतोतंत हिशोब केला तर सुख जास्ती, फारच जास्ती भरेल. महाराजांनीं म्हटलें आहे त्याचा अर्थ असा लाविला पाहिजे कीं, नरहो, सुखाचा विचार न करितां सुखाला तुम्ही जवा पाडें पाहतां, आणि दुःखाचा बाऊ करून उगीच आक्रोश करीत बसतां, याप्रमाणें जीवराजांस जिकडे तिकडे आनंद दिसूं लागला. पूर्व वयात सामान्यतः चांगली स्थिति असली तरी अनुभव नसल्या

कारणानें संसार आनंदमय वाटतो, जीवराज तर उत्तमोत्तम थाटांत मग्न होते, त्यांस तसें वाटलें तें ठीकच. परंतु टक्के टोणपे बसून विषय, मायाजाळ, वैभव, आणि सत्ता यांचा पुरा अनुभव ज्यांस येतो, त्यांस मात्र त्यांचें मर्मज्ञान होतें. म्हणून तशा अनुभवाअंतीं ह्या सर्व गोष्टी कशा प्रकारच्या ठरल्या आहेत हें व जीवराजास शेवटीं अनुभव काय आला, हें पुढल्या खंडांत वर्णिलें आहे.

---

# भाग ७

## खंड दुसरें—भव दुःख.

### विषय दुर्विपाकत्व.

**स्पर्शें गज मृग शब्दें, मीन रसें गंध सेवुनी भ्रमर ॥**
**रूपें पतंग मेला, नरसुख सकलीं कसें टिकें अमर ॥१॥**

( स्वकृत. )

### खातरजमा.

पंचज्ञानेंद्रियें आणि सहावें मन ह्याच सुखाच्या वाटा आहेत, असें सूक्ष्म विचारांतीं दिसून येतें. " मनः षष्टाणी इंद्रियाणी " " इंद्रियानां मनचास्मी " ह्या गीता वाक्यावरून मन हें सहावें ज्ञानेंद्रियच आहे. शब्द, स्पर्श, रूप रस, गंध आणि मोह हें ह्या सहा इंद्रियांचे अनुक्रमें विषय आहेत. हे विषय सुख-परिणामी आहेत किंवा दुःख-परिणामी आहेत ह्याचा प्रथम विचार केला पाहिजे. विषयांचा त्याग करा, असें नुसतें सांगितल्यानें त्याग करितां येणार नाहीं विषय मिथ्या आहेत, अनावश्य आहेत, त्यांच्यापासून फायदा मुळींच नाहीं, भयंकर हानि मात्र होते. अशी मनाची खातरी होईल तेव्हां त्यांस कंटाळून त्यांपासून मन माघारें फिरेल; तोंपर्यंत मनाला मारून मुटकून माघारें फिरविण्याचा यत्न आपण कितीं जरी केला तरी तो व्यर्थ होईल. अट्टल दारूबाजास लोकांनीं कितीही उपदेश केला आणि त्याच्या मानानें तितक्या पुरता निश्चय जरी केला तरी तलफ आली कीं तो +++++ तोंड घातल्या- वांचून राहणार नाहीं. कांहीं कारणानें जर त्यालाच अमलाची किळस येऊन शिसारी बसली तर मात्र बळें बळें बाटली दिली, तरी तिजकडे तो पाहणार सुद्धां नाहीं. ह्यास्तव विषयांच्या परिणामाचा आतां विचार करूं.

## पंच विषयांनीं पांच प्राण्यांचा नाश.

मृगाला गायनाचा मोठा नाद असतो म्हणून पारधी गायनानें त्यास मोहीत करून पकडतात. रानहत्ती ज्या रानांत असतात तेथें खाडा खणून त्याचें तोंड आच्छादित करून त्यावर गवत उगववून त्याचे एके बाजूस हत्तीण उभी करितात तिच्या लोभानें मदोन्मत्त हत्ती तिच्याकडे येऊन खाड्यांत पडतो. दीपज्योति कांहीं रम्य पुष्प आहे, असें समजून त्याला आलिंगन देण्यास जाऊन पतंग प्राणास मुकतो. गळास लाविलेल्या आमिषाच्या लोभानें मासा आमिष गिळण्यास जाऊन प्रणास मुकतो. भ्रमर सुगंधाच्या लोभानें रमाविलास स्थानीं प्रविष्ट होऊन मकरंद सेवनाच्या नादांत गुंग असतां तें मिटून जातें तें विदारून बाहेर येण्यास त्यास कांहींच कठीण नसतें, पण तो प्रेमपाशबद्ध होऊन त्या बंदिवासांत पडतो.

प्रभाव वाढलेले पांची विषय घात करतील ह्यांत काय नवल. एकेका विषयानें एकेक प्राणी प्राणास मुकला, मनुष्याला तर पांची विषय प्राणप्रिय आहेत. त्यांचें एकमेकांशीं संमेलन करून त्यांच्या सुखाचे अनंत पर्याय मनुष्यानें वाढविले आहेत. त्या पर्यायांना अनेक प्रकारचे नवे नवे फांटे फोडून नवीं नवीं यंत्रें तंत्रें त्यांच्या समर्थनार्थ निर्माण केलीं आहेत. हे सर्व प्रकार नित्य नवे वाढतच आहेत. त्यायोगानें सहस्रपुटी अभ्रकाप्रमाणें त्यांचा प्रभाव अमर्याद वाढून गेला आहे. अशा भयंकर प्रभावानें वाढलेले पंच विषय सेवन करणाऱ्या मनुष्याचा अनंत प्रकारांनीं फडशा उडाला तर त्यांत काय नवल आहे ?

## विषापेक्षां विषय भयंकर.

विषापेक्षां सुद्धां विषय घातक आहेत. विषाच्या नुसत्या कल्पनेनें कोणी कोणी मरत नाहीं, पण विषयाच्या नुसत्या कल्पनेनेंही मनुष्य वेडें होतें ! बायको बायको म्हणून उन्मत्त वायु होऊन कितीकांनीं प्राण सोडले आहेत, आजारामध्यें वावडे असलेले रतिविलास, नुसते मनांत आल्यानें कुपथ्य होतें. श्रीमंत थोरले माधवराव साहेब; रमाबाईसाहेबांच्या दर्शनानेंच कुपथ्य होऊन धनवंतर्युपम सदाशिवभट लागवणकर यांचा नाइलाज होऊन स्वर्गस्थ झाले. त्रप्राप्त्यर्थ कित्येक लोक नाना प्रकारचे बरे वाईट उपाय करून आपल्यास क्षीण करून घेतात. स्त्रीजन तर ह्या वेडानें काय करतील आणि काय नाहीं ! पुरुषाच्या तोंडास किती काळें फांसतील याचा नेमच नाहीं ! !

लढायांच्या रणभूमीवर हजारों माणसें पडलीं, मोंगलाचा मुलूख गेला, मानहानि झाली आणि श्रीमंतास काशीवासास लावण्याचे एकीकडे राहून त्या साडेतीन शहाण्यांत गणना पावणाऱ्या महशूर उलमुलुखास पुण्याची हवा आणि बंदिवासाचे सोहळे प्राप्त झाले.

## अधिकार मद.

रसक्रियेनें ( होमिओप्याथिक ) गोळ्या करितात, त्यांजमध्यें औषधाचा अति सूक्ष्म अंश असतो. पण त्याचा प्रभाव मात्र मूळच्या औषधापेक्षां जास्त होतो. त्याप्रमाणें राजतेजाचा अंश राजाचे नोकर लोकांत अत्यल्प असतो, पण त्या नोकरांच्या अंगीं उद्दामपणा, निर्दयपणा आणि परपीडेची हौस फार असते. राजा पहावा तर विनयसंपन्न व दयाळू असतो. जो जो हलक्या पायरीचा नोकर तो तो उर्मटपणा व परपीडा जास्त दिसून येते. सर्पापेक्षां विंचवाची नांगी जास्त वेदना करिते. आणि ता दिमाखानें वर करून तो चालत असतो. असल्या नोकर लोकांच्या जिव्हा कधीं कधीं लोकांस असह्य वाक्बाणानें ताडण करितात. गरिबागुरिबांशीं संबंध असतो तोंपर्यंत त्यांच्या रंगड्या चालतात. एखाद्या मानधन पाणीदाराशीं का गाठ पडली म्हणजे जन्मभर केलेल्या पापाचें एकदम प्रायश्चित्त मिळतें. सन १८५७ च्या बंडाच्या वेळस पंढरपुरास नागेशराव म्हणून मामलेदार होता. त्यानें कन्हयालाल ह्या राजपुत्रास ( रजपुतास ) वाक्ताडण केल्याबरोबर त्यानें एक घाव दोन तुकडे करून मामलेदार साहेबांस यमपुरी दाखविली. कैक अमलदारास गुपचीप बक्षिस मिळालें आहे. कैकास अरे तर कारे असा न्याय अधिकाराच्याच गादीवर मिळाला आहे. कितीएकास वरिष्टाकडून कोरडे मिळाले आहेत. तथापि ही द्वाड खोड नोकर लोक अजून सोडीत नाहींत. हें मोठें आश्चर्य आहे. पण आश्चर्य तरी कशाचें ? ते ज्या अधिकारावर असतात त्या अधिकाराचा तो गुण आहे. त्यास त्यांनीं तरी काय करावें ? तेच कामगार नोकरी सोडून घरीं बसले म्हणजे कोठें त्यांच्या तोंडाशीं कुलूप बांधिलेलें असतें ? मग ते हवे तितके लघाळ नाहीं का होत ! अधिकारमदानें अंधत्व येतें म्हणून समोर आलेल्या मनुष्याची योग्यता, अधिकार, कुलीनपणा वगैरे गुण त्यांस दिसत नाहींत, याला त्यांनीं काय करावें ?

## नारदवृत्तीचीं माणसें.

स्वतःच्या शब्दाच्या दुर्योजनेनें होणारे अनर्थ वर सांगितले. आपला घात

व्हावा अशी इच्छा कोणास नसते, म्हणून कांहीं तरी विचार करूनच ज्याचा तो बोलत असतो. इतकें असून होणारासारखी बुद्धि झाली ह्मणजे भलतेच शब्द निघून जाऊन अनर्थ होतात त्यास इलाज नसतो. पण विघ्नसंतोषी नारदवृत्तीचीं माणसें असतात त्यांच्या मनांस दुसऱ्याच्या नाशानेंच समाधान होतें. म्हणून तीं माणसें नेहमीं लावालाव करीत असतात. त्या योगानें फारच भयंकर अनर्थ होतात. एकाच्या केसाला धक्का लागला तर दुसऱ्याचा जीव घाबरा होतो असा ज्यांच्यामध्यें संबंध असतो, ज्यांच्यामध्यें विरोध येईल अशी कल्पना सुद्धां कधीं कोणास येत नाहीं अशा माणसांमध्यें हाडवैर पाडण्याचें सामर्थ्य ह्या नारदवृत्तीच्या माणसांच्या जिव्हेंत असतें. या चहाड्यांनीं राज्येंही डळमळूं लागतात किंवा बुडतात. बापलेक, भाऊभाऊ ह्यांचें हाडवैर पडतें. पवित्र पतिव्रता स्त्रीचा अव्हेर मूर्ख नवरा करितो. चहाडाच्या जिव्हेची मोहनी भोळ्या भाबड्यास मात्र नाचविते असें नाहीं. चहाडी करणाराचें कौशल्य असेल त्याप्रमाणें मोठीं पटाईत व सावधीर माणसें सुद्धां फशीं पडतात. श्रीरामास वनवास होण्यास मंथरेच्या जिव्हाग्रीं असलेला कलीचा वासच कारण झाला. परमभक्त पांडव आणि परमात्मा त्यांचा सारथी यांचें युद्ध चित्ररथाच्या निमित्तानें नारदमुनींनीं घडवून आणिलें. प्रति अर्जुन म्हणविणाऱ्या राघोबादादांच्या धवल कीर्तीला खग्रास ग्रहण ह्या चहाडीनेंच लाविलें.

## आत्मस्तुति.

मनुष्यमात्रास चांगलें म्हणवून घेण्याची हाव असते. ती असणें चांगलेंच आहे. पण खऱ्या कृतीनें खरा चांगुलपणा मिळविला पाहिजे. काम न करितां बक्षीस मिळत नाहीं. तसें बक्षीस मिळविण्याची इच्छा केली म्हणजे अर्थातच फशीं पडावें लागतें. नसता चांगलेपणा मिळविण्यास दंभाचा आश्रय करावा लागतो. दंभाच्या स्वाधीन झाले म्हणजे बेसावधपणा, उधळेपणा, थाटमाट इत्यादि दुर्गुण आपोआप गळा पडून मनुष्याची दुर्दशा करितात. अर्थात आत्मघात होतो म्हणून आत्मस्तुतीनें आपण आपलीच हत्या केल्याचें पाप लागतें, असें आपल्या शास्त्रांत सांगितलें आहे. एकवेळेस धर्मराजानें पार्थाच्या गांडिवाचा धिःकार केला. गांडिवाचा धिःकार करणाराचा शिरच्छेद करण्याची पार्थाची प्रतिज्ञा होती. यामुळें राजा धर्माचा शिरच्छेद केला पाहिजे, किंवा भ्रष्टप्रतिज्ञ झाले पाहिजे, असा बिकट प्रसंग येऊन पोहोंचला. तेव्हां पांडवा-

च्या संकट समुद्राचा सेतु भगवान ह्यांनीं पार्थास सांगितलें कीं, मनुष्याची निंदा केली असता अशस्त्रवधच केल्याप्रमाणें आहे. त्या निंदेनें त्याची हत्या करण्याचा दोष लागतो. तूं धर्म राजाची निंदा त्याच्या समक्ष कर म्हणजे त्याच्या वधाची तुझी प्रतिज्ञा सत्य होईल. भांबावलेला अर्जुन युक्ति सांपडली म्हणून हर्षभरित झाला, आणि त्यानें युधिष्ठिराची निंदा तर केलीच, पण लागलेच त्याला स्मरण झालें कीं राजधर्माची निंदा करणारास कंठस्नान घालण्याची आपली प्रतिज्ञा आहे, म्हणून आपल्या बाणानेंच आपला प्राणघात करण्यास सिद्ध झाला. पुन्हा भगवंतांनीं त्याचें समाधान करून त्यास सांगितलें कीं, स्वमुखानें आपली स्तुति केली असतां आत्महत्तेचा दोष लागतो. ह्यासाठीं तूं आपली स्तुति करून प्रतिज्ञाभंगाच्या दोषांतून मुक्त हो. पापपुण्याचा विचार न केला तरी आत्मस्तुति आणि परनिंदा हे दोन्ही प्रकार फार तापदायक आहेत. पापपुण्य एकीकडे ठेविलें तरी मार्गे लिहिल्याप्रमाणें आत्मस्तुतीचें दुष्परिणाम होऊन आत्मघात होतो. परनिंदेमुळें तर फारच अनर्थ होतात. परनिंदा तोंडावर केली तर लागलाच कलह होतो. बहुधा तोंडावर कोणी कोणाची निंदा करीत नसून पश्चातच करितात. नारदवृत्तीचीं माणसें सर्वत्र असतात आणि परनिंदा दुसऱ्या माणसाशीं बोलण्यांत होत असते, यामुळें ती बातमी ज्याची निंदा त्यास आयतीच वाढीदिढी सुद्धां पोहोंचते. कदाचित् निंदा करण्याचा हेतु नसून सद्धेतूनें बोललेल्या शब्दाच्या हेतूचा विपर्यास करून चुगलीखोर लावालावी करितात. कितीएक वेळां वरिष्ट अधिकारी किंवा बलिष्ट यांची केलेली निंदा त्यांच्या कानांवर जाते,तेणेंकरून दुर्बलनिंदकाचा सहज चुराडा होऊन जातो. आत्मस्तुतीच्या शतपट हानि परनिंदेमुळें होते. परनिंदा करणारास लाभ मुळींच नसतो, पण आपली स्तुति करण्याची चटक लागली म्हणजे आत्मस्तुतीचें समर्थन करितांना निंदा सहजच होते. दुनियेंत काय तो शाहणा, रूपवान, धनवान आणि सद्वर्तनी मी असें म्हणावयाचें मनांत आलें कीं पडोसा दुसऱ्याचा दाखवून त्यांचीं निंदा ओघासच येते. कवढा हा आपल्या हातानें आपल्या घरास कोलत्या लावण्याचा अव्यापारेषु व्यापार !

## निंदकांचे उपकार.

निंदकांचा नाश न करितां आपल्या अंगीं कांहीं व्यंग किंवा दोष आहे कीं काय ह्याचा शोध करून सज्जन आपली सुधारणा करून घेतो, आणि निंदकाचे

उपकारच मानितो. " अप्रियस्यच पथ्यस्य श्रोता वक्ताच दुर्लभः " एक मार्मिक कवि म्हणतात कीं, प्रत्यक्ष मातोश्रीपेक्षां सुद्धां निंदकाचे उपकार फार आहेत. मातोश्री मुलाची हालहाल चाकरी पुत्रस्नेहामुळें करिते. पण निंदक किती श्रेष्ठ आहे पहा. त्याचा यत्किंचितही फायदा नसतां तो आपल्या ओष्ठ-युगुलांचीं दोन खापरें घेऊन प्रत्यक्ष जिव्हेनें लोकांचा मल ( दोष ) काढून त्याला स्वच्छ करितो. शत्रुवर तर त्याची मलक्षालनाची कृपा फार होते. निंदेमुळें चुक्या कळून किंवा ईर्षेस चढून मनुष्य महत्कृत्यें जिवाची सुद्धां पर्वा न करितां करिते. लक्ष्मण शक्तीच्या प्रसंगीं मारुति आला हें माहित नाहीं असें दाखवून त्या भक्तोत्तमाची निंदा रामानीं मुद्दाम केली, तेणेंकरून त्यास अत्यंत ईर्षा उत्पन्न झाली. श्रीमंत माधवराव साहेब पेशवे दादासाहेबांस सोडवून आणण्यास निघाले असतां मार्गांत सुभेदार मल्हारराव होळकर भेटून चल बाळा, पुण्याचें राज्य करूं म्हणाला असतां त्या वीरश्रेष्ठास श्रीमंतांनीं वाक्बाणानें विद्ध करून म्हटलें कीं " पानपतच्या रणांगणावर आपण निंद्य वर्तन केल्याचें एकिलें तें खरेंच असेल. " ही निंदा ऐकतांच त्या प्रतापसूर्यानें एकदम द्वादश नेत्र उघडून " असें आहे काय ? तर पहा आतां या मल्हारीची तरवार " असें म्हणून श्रीमंताबरोबर परत जाऊन प्रति अर्जुनास सोडवून आणिलें. परनिंदा अत्यंत गर्हणीय आहे तथापि लोकांस मोठी वाईट चट लागली आहे. रिकामपणीं दोन माणसें एके ठिकाणीं जमलीं कीं लोकांची चर्चा सुरू होतें. तो वेळ हरिकथा किंवा हरिनाम ह्याकडे किंवा ज्ञानार्जनाकडे लाविला तरी स्वार्थ व परमार्थ नाहीं काय साधणार ?

## पापायपरपीडनं.

परपीडेसारखें महात्पाप नाहीं. मनुष्याला समाधान झालें म्हणजे आशिर्वाद देण्यास सांगावें लागत नाहीं. त्याप्रमाणेंच पीडा झाली असतां शिव्या शाप देण्यासही सांगावें लागत नाहीं. लोकांचे शाप आणि तळतळाट हे शब्दच आहेत. ह्यांचा परिणाम भयंकर होतो मृत पशूच्या कातड्याचा भाता चालतो त्याच्या वाऱ्यानें अग्नीच्या ज्वाळांनीं प्रत्यक्ष लोखंडाचें पाणी होतें, मग मनुष्यासारख्या ज्ञानवान प्राण्याचे सजीव भाते ज्याच्या नाशाकरितां अहोरात्र सुस्कारे टाकितात त्याचा नाश झाल्यावांचून कसा राहील ! आपल्यापासून कोणास पीडा न होईल असें आचरण ठेवणें फार फार शहाणपणाचें व हिताचें

आहे. अधिकाराच्या धुंदींत शाप आणि तळतळाट काय करतो आहे, ह्या उगीच वेडया समजुती आहेत असें कोणाकोणास वाटतें तें वाटणें अविचाराचेंच आहे. पण तें खरें मानिलें तरी जगामध्यें शत्रू अथवा अनिष्ट चिंतणारे फार असणें चांगलें काय ? ह्याचा विचार कोणासही कळण्याजोगा आहे. हितचिंतक किंवा मित्र असतील तितका आनंद, समाधान व हित वाढेल. अहित चिंतणारे असतील तितकी काळजी आणि उपद्रव वाढेल हें अगदीं प्रकट गुह्यच नाहीं काय ?

## नानृतात परमं पापं.

मनुष्याच्या नाशास आणि अपदेस कारण अनीति आहे. मनुष्यासारखा ज्ञानवान प्राणी जो परमेश्वराचा भूमंडलावरील प्रतिनिधी सुद्धां म्हणविण्याचा प्रयत्न करितो, करणी करील तर नारायण सुद्धां होतो. त्याला पराधीनता प्राप्त व्हावी हें मोठें आश्चर्य आहे. वस्तुत: सर्व माणसांचा हक्क सारखा आहे असें असतां एका माणसावर दुसऱ्यानें अंमल करावा हा न्याय कोठला ? तीस किंवा चाळीस कोटी लोकांवर एका मनुष्यानें सत्ता करावी हें अंधळें गारुड कशानें उत्पन्न झालें ? हें उत्पन्न होण्यास असलेल्या कारणामध्यें अनीति हें एक बळवत्तर कारण आहे. मनुष्याला स्वार्थानें वेडें केल्यामुळें त्याची प्रवृत्ति अनीतीकडे झाली. जें सांपडेल तें बळकवावें असें वाटूं लागलें. सगळींच माणसें स्वार्थपरायण झालीं तेव्हां अर्थातच दांडगाईवर मजल आली. बळी तो कानपिळी हा गोंधळ माजला. सगळी बंडाळी झाली. तेव्हां कांहीं तरी व्यवस्था करण्याची अवश्यकता सहज निर्माण झाली, म्हणून शास्ता नेमण्याची कल्पना उद्भवून लहान लहान टोळ्या होऊन त्या नायकांच्या अंमलांत आल्या. ह्याच प्रकारची वृद्धि सारखी होत आहे. एकेका राजानें अनेक राष्ट्रें व देश आपल्या अंमलांत आणिले आहेत.

## राजनीतीचा जन्म

परापहाराची अनीति बंद करण्याकरितां मुळांत राजनीति अवतरली. पण अनीतीची मोहनी आणि पराक्रम इतका कांहीं अतर्क्य आहे कीं, तिनें ह्या राजनीतीस आपल्यावर अंमल करूं न देतां तिलाच आपली बटीक करून ठेविलें आहे. पूर्वीं व्यक्तिव्यक्तींत मात्र परापहार म्हणजे अनीति होत होती. ती बंद करण्यास मोठ्या तोऱ्यानें आलेल्या राजनीतीस तिनें व्यक्तीमधील

परापहार अंशतः बंद करण्याची लालूच दाखवून आपली शक्ति क्रोडोपटीनें वाढविली. राष्ट्रांच्या अपहाराचा सपाटा तिनें अनीतीच्या प्रतिबंधार्थ अवतरलेल्या राजनीतीकडूनच चालविला आहे. ह्या अनीतीचें मूळ अनृताशिवाय काय आहे. हे शास्ते निर्माण झाले म्हणून मनुष्यमात्रास पराधीनत्व प्राप्त झालें.

## बेभरंवसा.

पायदळी पडून नाश पावलेल्या आपल्या राष्ट्राच्या उन्नत्तीकरितां कारखाने काढण्यास नाना हुन्नर करण्यास व व्यापार वाढविण्यास पुष्कळ लोक धडपड करीत आहेत. पण दामाजीपंत नाहींत म्हणून निराश व्हावें लागत आहे, ह्याचें कारण काय ? ही सुवर्णभूमि धुऊन गेली म्हणून पैसा नाहींसा झाला हें खरें, पण आपल्यास प्रारंभास पाहिजे आहे इतकें सुद्धां धन या देशांत नाहीं असें नाहीं. सरकारी प्रामिसरी नोटा व ब्यांका ह्यांचा हिशेब पाहिला असतां क्रोडो रुपये आपल्याच लोकांचे अगदीं हलक्या व्याजानें पडले आहेत. ते देशाच्या उद्धारार्थ करण्याच्या उद्योगाच्या भांडवलास कां मिळत नाहीं ? ते ठेवणारे आपणच. पण आपले पैसे आपल्या लोकांस म्हणजे आपल्यास देण्यास धीर न होण्याचें कारण अनृतच होय. कोणास कोणाचा भरंवसाच नाहीं. भांडवलाकरितां पैसे दिले तर आप्यायस्वः होण्याचा धाक ! तेव्हां कोण देईल !

## सगळेंच खोटें.

सगळाच मुळीं अनृताचा बाजार ! तेथें खरें खोटें काय निवडावें. मुळीं दृश्य सृष्टीच भासमान म्हणजे मिथ्या तर पुढें खरें राहिलें काय ? खरें जें आहे त्याची मुळीं शुद्धच नाहींशीं झाली आणि खोटा पसारा खरा मानूनच सर्व जन्मभर खटपट चालली आहे. एक चैतन्यच सर्व निरनिराळ्या रूपांनीं अनंत माणसें झालें आहे हें मर्म विसरल्या कारणानेंच द्वैत उत्पन्न झालें. द्वैतामुळें अहंकार व अहंकारामुळें स्वार्थबुद्धि उत्पन्न झाली व तिच्या पोटीं परापहार जन्मला व याच्यासाठीं अनृत आवडलें. असो. अनृत हेंच सर्व पापाचें मूळ म्हणून " नानृतात्परमं पापं " हेंच सत्य.

## स्पर्श.

**भांगार कांता द्वय कात राया, केल्या विधीनें नरकातराया**
**जो सांपडेना नर कातराया, तो योग्य होई नरका तराया**

वामन.

## व्यभिचारजन्य ताप.

कनक आणि कामिनी या दोन कात्र्या मनुष्याचा विध्वंस करीत आहेत स्पर्श विषयाचें प्रधान पात्र स्त्री होय. इतर सगळे विषय एका इंद्रियास मात्र सुख देतात. परंतु स्पर्शसुख सगळ्या देहास व देहाच्या प्रत्येक भागास होतें. स्पर्शसुखानें पाप ताप आणि दैन्य ह्यांचा सुकाळ होतो. दुर्धर रोग होऊन आपल्या हातानें आपल्यास असलेल्या आयुष्यांत मरण येतें. स्पर्श विषयास वाहिलेल्या लोकांचीं घरें दारें जाऊन अन्नान्न गति त्यांस प्राप्त होते हा सिद्धांत ठरलेला आहे. अपकीर्ती ही त्यांच्या कपाळीं लिहिलेलीच असते. बाजारी व्यभिचाराचा हा प्रकार झाला विपरीत मार्गानें होणाऱ्या व्यभिचाराच्या अनर्थास पारावारच नाही. त्यापासून होणारे अनर्थ सर्वांस नेहमीं दिसतच आहेत ते टाकीं लावणें इष्ट नाहीं.

## स्पर्श व्याधाचे चार कुत्रे.

चारी विषय ह्या स्पर्शव्याधाचे कुतरे आहेत. व्याध शिकारीस निघाला म्हणजे सावजें चोहोंकडून हुलकावून माऱ्यांत कुतरे आणतात, त्याप्रमाणें चारी विषय, नरनारी यांस कामराजाच्या तडाक्यांत आणून पोंचवितात. विश्वामित्रासारख्या प्रचंड सावजावर मोहनास्त्र घालण्यास निघतांना मेनकेनें "परिमलनिकट असावें साह्य मला वसंत काम पवमान" असें मागणें महेंद्रापाशीं मागितलें. बाकी मूर्तिमंत सामुग्री तिजपाशीं होतीच.

## बड्या धेंडांची फजिती.

ह्या पंचशराच्या माऱ्यांतून शुकासारखे थोडेच सुटले. ब्रम्हा, विष्णु, महेश्वर, इंद्र, चंद्र ह्या सर्वांस ह्यानें सिधें केलें. साठ सहस्र वर्षे केलेलें तप मेनकेच्या पायावर ठेवून तिजबरोबर कुतरें होऊन जाऊन स्वर्गी वसिष्टादिकांनीं ओळखून उत्थापन दिल्यानें फटफजिती होऊन पाण्यापेक्षां पातळ होण्याचा दारुण प्रसंग ह्या स्पर्शसुखानें विश्वामित्रावर आणिला. जैमिनी सारख्याचा गर्व हरण करून "नापिकर्षति" हीं अक्षरें परत घेण्यास ह्याच बहाद्दारानें लाविलें. बड्या बड्या धेंडांची हीं दुर्दशा, मग इतर देव दानव, मानव, यक्ष, किन्नर ह्या गरीब गुरिबांचा कोण पाड ! ह्या स्पर्शसुखाच्या, वागुरा नितंबिनी, मध्यें नसत्या तर संसाराला इतकें निस्सार स्वरूप मुळींच न येतें आणि मानव परमागतीस पोंचले असतें. असें एका कवीनें म्हटलें आहे.

संसार तव निस्सार पदवी न दवी यः
अत्तरा दुस्तरा नस्युर्य दिरे मदिरे क्षण

## परिरंभ.

रम्य पुष्पाच्या भ्रमानें दीपास आलिंगन देण्यास लागून शलभ दग्ध होतो, त्याप्रमाणें ह्या स्पर्शसुखाच्या परिरंभाच्या नादानें ह्या संसाराचें परमदुःसह ओझें डोक्यावर घेऊन परिणामीं मनुष्यें दुर्दशा पावतात, संसारिकाचे हाल कुतरा सुद्धां खात नाहीं.

## दांपत्यसंबंध.

परमेश्वराची करणी आणि योजना अगाध आहे. व्यभिचार अथवा चामचोरी हें महत् पातक आहे खरें परंतु मानवेतर प्राण्यास तें नाहीं. त्यांचें विशेष जोडपें एकस्थळीं एकत्र राहणें शक्य नाहीं, ते नेहमीं पराधीन किंवा निर्वाहाच्या अनुरोधानें फिरणारें म्हणून त्यांच्यांत दांपत्यसंबंधच प्रभूंनीं ठेविला नाहीं. ऋतुकाल मर्यादा ठेविली आहे. उपदंशादिक रोगांचा संभव ठेविला नाहीं. पण मानवास ज्ञान दिलें म्हणून त्यांच्यामध्यें दांपत्यसंबंध ठेविला आहे. हा संबंध नैसर्गिक नाहीं असें म्हणणारांचे डोळे उघडण्याकरितां दांपत्यसंबंध सोडून स्वेच्छाचार करणारांस ह्या हातावरचे झाडे ह्या हातावर दाखविण्याकरितांच कीं काय उपदंश-विकार मनुष्यामागेंच लाविला आहे !

## व्यभिचारजन्य कोपानळ.

व्यभिचारजन्य कोपानळाची शिगलोट मानवाच्या ठिकाणीं मात्र उत्पन्न करून ठेविली आहे. ह्या सतिछलोद्भव कोपानलाच्या भडक्यांत परशुरामाच्या कुठारानें एकवीस वेळां क्षत्रिय कुळाचे ढीग घातले. श्रीरामांनीं राक्षसकुल ढकलून दिलें. पांडवांनीं अठरा अक्षोहिणी सेनेची आहुति दिली. आजपर्यंत भूमंडलावरील असंख्य राज्यें स्त्रीजनांच्या अभिलाषाच्या कारणानेंच मदांध राजांस शलभाप्रमाणें दग्ध करून दुसऱ्याच्या हातांत गेलीं. कोणी राजा स्त्रियांवर जुलूम करूं लागला कीं त्याची इतिश्री होण्याचे दिवस नजीक आले असें समजावेंच. अखेर, अखेर बाजीनें आपल्या सर्व दुष्कृतिप्रमाणेंच स्त्री-

ण लज्जेच्या दुर्दशेची कमाल करून पुण्यपत्तनांत कुंकुमशाही माजविली, आणि संपूर्ण हिंदुस्थानास दयाळू कंपनीच्या स्वाधीन करून ब्रह्मवर्तास गमन केलें, तरी तेथें सुद्धां वेडे चाळे सुटले नाहींत. १२०० कलौरुत्या बरोबर होत्या. जित्याची खोड मेल्यावाचून जात नाहीं म्हणतात तें खरें.

## लाटसाहेबांचा प्रयत्न.

ब्रिटिश राजसत्ता एकाच्या स्वाधीन नाहीं. राजा व प्रजा ह्यांचा साक्षात् संबंध मुळींच नाहीं. या योगानें ह्या राज्यांत हा गोंधळ होण्याचा संभव फारच कमी झाला; तथापि कांहीं सोल्जर वगैरे ह्या राज्याच्या धवल कीर्तीवर काळे शिंतोडे टाकितात. त्यांचा समाचार सध्यांच्या परम दक्ष लाट साहेबांनीं घेऊन राज्याची कीर्ति स्वच्छ राखण्याची सुरुवात केली आहे. हें राजा आणि प्रजा ह्या उभयतांसही श्रेयस्कार आहे. प्रजेचा संतोष आणि आबादानी हेंच राज्याचें संरक्षण आहे, हें ब्रिटिशांस चांगलें माहित आहे.

## पररमणी.

यमलोकींचे नरक ह्या स्पर्शसुखाच्या नादानें व्यभिचार करणारांनीं पुष्कळांशीं भरत असतील. शेंकडा नव्वद तरी खुन ह्या स्पर्शसुखाच्या विपरित लीलेनें होऊन एकाबद्दल दुसरा फाशीं जातो. पररमणी चांडाळाच्या सुघन पोळीप्रमाणें त्यागावी आणि बळेंच आली असतां शत्रूच्या प्रखर गोळीप्रमाणें तिला भिऊन दूर पळावें असें मोरोपंडित म्हणतात.

## विपरीत लीला.

अनंगाच्या विपरीत लीलेनें नैसर्गिक माया ममता नष्ट होऊन बापलेक भाऊभाऊ सुद्धां एकमेकांचे वैरी होतात. अनाथ अज्ञान नातवास आजोबा भोकलून देतात. आपलें दुष्कर्म निर्वेध चालावें व उघडकीस न यावें म्हणून व्यभिचारिणी पोटच्या लेकाचा घात करिते. अहिरावणाच्या राणीप्रमाणें आपल्या नाथाचा घात करविते. असें कोठवर सांगावें. शंकरांनीं अनंग जाळून टाकून अनंग केला आहे तरी ह्या मदनानें इतका अनर्थ केला आहे मग सांग असता तर काय करता देव जाणे.

## मिजास.

स्पर्श सुखाच्या मुख्य भागाचें वर्णन मागें झालें. दुर्दशा होण्यास स्पर्शसुख मिजाशीच्या रूपानें आणखी कारण होतें. संपत्तीचा गुणच असा आहे कीं ती

प्राप्त झाली म्हणजे मनुष्य सुखाच्या मार्गे लागतें, ठीकच आहे. संपत्ति मिळवावयाची कशाला, सुखासाठींच ना ? मनुष्य सुखाच्या मार्गे लागलें कीं, आळसाचें बिऱ्हाड त्याच्या शरिरांत येऊन बसतें. आळस वाढला म्हणजे त्यास मिजास हें नांव प्रतिष्ठित आहे. मनुष्य मिजाशीच्या स्वाधीन झालें कीं, तरतरी, उत्साह उद्योगप्रीति, दक्षता प्रभृति कल्याणकारक गुण अस्तास जातात. आणि थलथलीतपणा, मेद, अशक्तता, निरुत्साह, कूपमंडूकत्व, निरुद्योगीपण इत्यादि अवगुण प्राप्त होतात. एक पिढी तेजस्वी, पराक्रमी होऊन धन, कनक, सत्ता लौकिक इत्यादिकांनीं मंडित झाली कीं, तिची संतति उलट प्रकारची होते असा अनुभव आहे. असें होण्यास मिजासच कारण आहे. खुर्चीवरून गादीवर येण्यापलीकडे काम करण्याचें कारण नाहीं. अशी स्थिति झाली कीं, संपत्तीची वाढ पूर्ण झाली असें समजावें. वाढ पूर्ण झाली कीं, उलट दिशेस म्हणजे अधोगतीस प्रारंभ होतो. आपल्या पूर्वजांनीं संपत्ति आणि विपत्ति ह्यांच्या अनेक फेऱ्या घातलेल्या आहेत. शेवटची संपत्तीची फेरी सवाई माधवरावांच्या समाप्तीच्या वेळीं पूर्ण झाली, आणि अधोगतीस सुरुवात झाली. संपत्तीचे विपरित चाळे चालतां चालतां ब्राह्मण लोक मिजाशीच्या शिखरावर चढले. स्वराज्य गेलें त्याच्या मागें संपत्ति गेली. पण मिजाशीची लागलेली द्वाड खोड गेली नाहीं. उद्योग विलासी इंग्रज लोकांनीं जिकडे तिकडे शांतता पसरून दिली. स्वसंरक्षणाचे प्रयत्न करण्याचें कारणच ठेविलें नाहीं. आपल्यावर त्यांचे किती तरी उपकार म्हणून सांगावें! त्यांनीं आपल्यास कोणतेंच काम करण्याची तसदी ठेविली नाहीं. आपलीं सर्व कामें ते करीत आहेत म्हणा किंवा आमच्या हरतानें करवून आम्हास उलटें पोटासही देत आहेत म्हणा, कांहीं म्हटलें तरी आम्हास भरपूर मिजास ( आळस ) त्यांनीं अर्पण केली आहे, तेणेंकरून आम्ही सर्वस्वी नादान व दुबळे बनलों आहों. आमच्या डोक्यावरील केर काढण्यास सुद्धां आम्हास नोकर लागतात. ब्राह्मणाचे किंचित का मेहनतीचें काम असेना तें त्याच्यानें होत नाहीं. त्याला कणबी गडी पहावा लागतो. ब्राम्हण गडी ( पुरुष ) नाहीं असें ह्यावरून नाहीं कां होत ? सारांश, ह्या मिजाशीमुळें आपली सर्व शक्ति नष्ट झाली आहे. आपला गडीपणा ( पौरुष ) नष्ट झाला आहे. स्पर्शसुखाचे सालवाड आतां पुरें केलें पाहिजेत, पण तें करावयास सांगणें नकोच. दारिद्र्यांजन जसजसें भनल तलतशी मिजास आपाआपच नष्ट होईल.

# रूप.

## सौंदर्यमोहिनी.

पदार्थाच्या उपयोगावर त्याचा अभिलाष असावा. पण या रूप गारोड्यानें नजरबंद केल्यामुळें उपयोगाकडे दुर्लक्ष होऊन आग्रमान रूपालाच मिळाला आहे. केपढा विपरीत परिणाम झाला आहे पहा, घरचीं लेकरें उपास काढीत आहेत, दैना भोगीत आहेत, आणि सातासमुद्रांपलीकडच्या श्वेतद्वीपस्थांउ आम्ही इच्छाभोजन घालीत आहों. आमच्या गिरण्या बहुतेक डळमळूं लागल्या. हिंदुस्थानच्या लक्ष्मीचें मंदिर मुंबई शहर, ह्याचें वैभव गिरण्यांच्या ऱ्हासामुळें डळमळूं लागलें, तरी आमच्या लोकधाराजिण्या पराज्ञान-पुष्ट लोकांचें डोळे उघडत नाहींत. गिरण्यांच्या मालकांची अकल जाग्यावर येत नाहीं, ते आपला व्यक्तिस्वार्थ अद्याप सोडीत नाहींत. शेवटीं सगळें जाऊन भीक मागावी लागेल, पण ती तरी घालील कोण ? हें मनांत आणीत नाहींत. कपडे वापरण्यास घरची तीस कोटी माणसें असून, घरचा माल खपत नाहीं, आणि परदेशाहून कोट्यानुकोटि रुपयांचा माल येतो तो मात्र खपतो आहे. आपली साधी भोळी माताच आपल्याला पूज्य, तीच आपलें कल्याण करील, तिला सोडून श्रीमंताच्या भपकेदार आईकडे आपण गेलों तर लाथाच मिळतील, हें आम्ही लक्षांत आणीत नाहीं ! घटोत्कचनिर्मित नखरेदार वस्तूंस भूलून कौरवसमूह फजित पावला, तसे आम्ही परदेशच्या वस्तुसौंदर्यास भूलून आपलें दारिद्र्य वाढवीत आहों, हा सर्व प्रभाव ह्या रूप-विषयाचा आहे,

### कृत्रिम सौंदर्य.

मनुष्यास आवश्यक कारणाकरितां होणाऱ्या खर्चापेक्षां ह्या दर्शन संतोषाकरितां कितीतरी पटीनें व्यर्थ खर्च होतो आहे, ह्याचा कोणी विचार तरी करतें काय! रूपविषय आमच्या नित्याच्या व्यवहारांत कितीतरी घुसला आहे पहा! रोजच्या जेवणांत हळदीचा खप केवळ नेत्र संतोषार्थ होत आहे. मसाल्याच्या रंगाकरितां कोळसे पोटांत जात आहेत. ह्या विषयापासून

प्रत्यक्ष उपयोग मुळींच नाहीं. कोट्यनुकोटी रुपयांचें सोनें, रुपें, रंगाचें सामान, हंड्या, झुंबरें, अतशबाजीचें सामान, रोषनाईचें सामान, रेशीम वगैरे जिन्नस दरसाल ह्या क्षणमात्र तमाशा ( तम+आशा=खोटी आशा ) करितां फन्ना होत आहेत. ते पदार्थ तयार करण्याच्या कामांत लाखो लोकांचीं आयुष्यें खर्ची पडत आहेत. शेकडों बिघे जमीन हे पदार्थ तयार करण्याच्या सामग्रीकडे गुंतत आहे. ह्या सर्व गोष्टी उपयुक्त पदार्थ तयार करण्याकडे लागतील, आणि साधी निर्मळ वर्तणूक मनुष्यांस आवडूं लागेल, तर सुखाची वृद्धी केवढी होईल? कृत्रिम सौंदर्यापेक्षां स्वाभाविक सौंदर्य किती तरी मनोहर आहे! पण, मन गतानु–गतिक बनून स्वाभाविक सौंदर्याची ओळखच विसरून गेलें आहे. स्वच्छ पांढरे शुभ्र किंवा गुलाबी लाली चढलेलें वस्त्र किती रम्य व पवित्र असतें; पण तें आवडत नाहीं. घाणेरड्या खळीनें आणि रंगांनीं भरलेलीं वस्त्रें कधीं न धुतां, मळ सांचलेला असतां, घामाचे डाग पडलेले असतां, प्रदराचे डाग पडलेले असतां, तीं जीवापलीकडे आवडतात. एकंदरींत नुसता-रूपविषयही आम्हां मनुष्यांना फार हानिकारक असून त्यांत दंभ मिश्रित झाल्या कारणानें प्रदीप्त अग्नीवर तेल ओतल्याप्रमाणें अनर्थकारक परिणाम होत आहेत.

## रूपविषयगारोडी.

रूप हा विषय मनुष्याला अंध करणारा नजरबंद गारोडी आहे. ह्याचे कटाक्षबाण मनुष्यावर पडले कीं, त्याला विचार सोडून जातो. भय व लज्जा नाहींशी होते. मदिरेक्षणा पाहिल्याबरोबर पुरुषाची स्थिति कशी होते, ह्याचा अनुभव कोणी कोणास सांगण्याचें कारणच नाहीं. रंभेला दाद न दिल्या कारणानें गर्वभारानें वाकलेला नर आपल्या मनोनिग्रहाच्या घमेंडींत भगवानास धिक्कार करून बोलला असतां त्याची छाती उतरण्याकरितां भगवानांनीं क्षणांत सुभद्रा, तर क्षणांत अन्य स्त्री दिसणारा वेष घेऊन त्याला कसकसें नाचविलें आणि शेवटीं त्याची नारदासमक्ष कशी फजिती उडविली, ही कथा वाचावी म्हणजे रूपविषयाचा प्रभाव चांगला लक्षांत ठसेल. सुभद्रेच्या रूपानें मोहित होऊन अर्जुनाची स्थिति कशी झाली होती पहा.—

## आर्यार्ध.

**घाली घृतांत सैंधव दुग्धीं जंबीर पायसीं कथिका ॥**

अर्जुनासारख्याची ही दुर्दशा ! मग आपली काय कथा ? ह्या मदिरेक्षणा

खरोखरी अमंगळ आणि घाणेऱ्या असतात. पण रूपविषयाचा प्रभाव केवढा जबरदस्त आहे पहा. त्यांच्या श्वेतकुष्टासारख्या गौर वर्णामुळें व हजार नूर नखऱ्यामुळें त्या ज्ञानसंपन्न पुरुषास मोहून विषयाचें कुत्रें करून टाकितात.

## रस.

## आहार, विहार, परायणता व धर्मग्लानि.

या कलियुगांत रस व स्पर्श ह्या दोन विषयांचाच मोठा अंमल आहे. या युगांतील माणसें आहारविहारासेरीज दुसऱ्या कशाची ओळख ठेवणार नाहींत, पर्वा करणार नाहींत, असा असलेला सिद्धांत पहा कसा तंतोतंत अनुभवास आला आहे. रामजोशी बुवांनी फार दिवसांपूर्वी " पाहतां पाहतां धर्म बुडाला । अधर्म झाला चोहोंकडे ॥ जिकडे तिकडे कली मातला । कठीण काल हा आला पुढें ॥ " असें ह्मटलेलें आतां किती पूर्णतेस आलें आहे पहा ! पृथ्वीवरील प्रमुख प्रमुख धर्मांत जीं तत्वें सांगितलीं आहेत त्यांतून एक तरी हल्लीं कायम राहिलें आहे काय ? भूतदया ठेवावी, कोणी कोणाचा अपहार करूं नये, सर्व माणसांनीं बंधुप्रेमानें रहावें, संकटांत पडलेल्यास मदत करावी, खऱ्याखोट्यास व पुण्यपापास भिऊन निर्मळ व्यवहार करावा, असें कोणाच्या बरें धर्मांत सांगितलें नाहीं ? पण जगाकडे पहा, केवळ चोरांचा बाजार माजला आहे ! रानटी स्थितींत अराजक असतां आपण केलेलें पीक आपल्या पदरीं पडेल असा भरंवसा नसल्या कारणानें शेतकऱ्यास सदोदीत हत्यारबंद होऊन शेताचें रक्षण करावें लागत असे; तीच स्थिति आज २० व्या शतकाच्या आरंभीं आहे कीं नाहीं पहा ! जरा कोणी राजा किंवा राष्ट्र कमकुवत दिसलें कीं, त्याच्यावर झडप पडलीच. राष्ट्रांचीं दिवाळीं निघण्याचा समय आला आहे, इतका लष्करी खर्च प्रत्येक राष्ट्रानें वाढविला आहे. एकमेकांच्या नरड्यांचे घोट घेण्यास आणि एकमेकांस लुटण्यास प्रत्येक राष्ट्र टपून बसलें आहे. शिव ! शिव ! रानटी स्थितीपेक्षांही ही स्थिति लाजिरवाणी नव्हे काय ? एकमेकांस मदत करा म्हणून सांगणाऱ्या धर्मसंस्थापकांच्या पंथांत हा केवढा गोंधळ ! ह्यामुळें सगळें जग आज यमयातना भोगीत आहे. जीं मानवीसुखसमृद्धि करण्याच्या पवित्र कामीं लागलीं असतीं, तीं कोट्यनुकोटि माणसें प्राणघात करण्याच्या तयारात गुंतून पडलीं आहेत !

## ज्ञानांधता.

लोकांशीं काय करावयाचें. "कुत्ता जाने चमडा जाने" आपलीच स्थिति पहा, एखाद्या भाग्यशाली बापानें लोकांच्या उपयोगीं पडावें म्हणून पुरलेलें अपार धन मुलास माहीत नसल्या कारणानें बापाच्या पश्चात् दरिद्र येऊन तें द्रव्य पुरलेल्या जागेवरच मुलानें भीक मागत बसावें! कोणी रोज मजुरी करणारानें कांहीं कवड्या त्यास दिल्या म्हणजे त्यास मोठा श्रीमान समजुन त्याचा त्या मुलानें बोलबोला करावा; तशी आमची स्थिति झाली आहे. छे! छे! तशी सुद्धां झाली नाहीं! त्या बिचाऱ्याला आपल्या पायांखालीं निधि असल्याचें काय माहीत? पण आमचें तसें नाहीं. आह्मांस दिसण्याजोगें सर्व ठेविलें आहे. पण आम्ही तिकडे पहातच नाहीं. आमच्या पूर्वजांनीं आम्हांस वेद आणि शास्त्र हीं उपनयनें दिलीं आहेत. आठ वर्षाचें वय झाल्याबरोबर आम्ही उपनयन (मुंज) धारण करून दुनियेंत कोणी नाहीं असे दुजन्मी (द्विज) व्हावें, आणि आपल्या पूर्वजांचें ज्ञानभांडार अवलोकन करून त्यास भर घालावी, अशी योजना करून ठेविली आहे; पण आमच्या दुर्दैवानें आम्ही अंध झालों आहों. एका एका वाक्याची सुद्धां योग्यता शेंकडों ग्रंथांस व्हावयाची नाहीं, अशा नीतिग्रंथांचीं पेवेंचीं पेवें आणि कोठारेंचीं कोठारें येथें भरलेलीं असतां त्यांकडे कोणी लक्ष देत नाहीं. इकडुनच पश्चिमेस गेलेल्या ज्ञानरवीचा उदय पश्चिमेस झाला आहे, असें वेड्यासारखें आपण म्हणतों! पश्चिमेस उभ्युदय कधीं तरी झाला आहे काय? आपली प्रदक्षिणा पुरी करून तो पुनः पूर्वक्षितिजाकडे जपानांत येत आहे. आह्मांस दारू विकूं नका, ह्मणून सांगण्यास केन साहेब पाहिजेत! आमचें पवित्र ज्ञान अधिकारविहीन-मनुष्यांस मिळूं नये ह्मणून तें आम्ही शूद्रांपासून सुद्धां लपवून लपवून ठेवीत असतां कस्तुरीच्या वासाप्रमाणें आमच्या दिव्य ज्ञानाचें तेज पृथ्वीच्या उत्तरसीमेपर्यंत प्रकाशलें असून आम्हांस गीतातत्व सांगण्यास अनुनाई पाहिजे! आमच्या दारीं भीक मागणारे भिकारी, आणि जात्यावर ओंव्या ह्मणणाऱ्या बायका ह्यांच्या तोंडातून सुद्धां कित्येक अमोलिक नीतितत्वें सहज निघतात, पण तिकडे कोण लक्ष देतो. सारांश, या युगांत धर्म आणि नीति पार लुप्त होऊन आहार विहार ह्यांस म्हणजे रस आणि स्पर्श ह्यांसच काय तें प्रधानत्व मिळालें आहे!

## रसत्यागाची अशक्यता.

विरक्त लोक बाकीचे विषय विवेकानें सोडतात, पण रस सोडणें शक्य नाहीं. पूर्वकाळीं वातांबुपर्णाशनि योगी होऊन गेले; पण वातांबुपर्ण तरी पाहिजेच होतें कीं नाहीं ! अंतकाळापेक्षां माध्यान्हकाळ कठीण. त्या वेळेस कसला कां होईना, पण गोळा दिलाच पाहिजे, त्यावांचून सुटका नाहीं. सध्यां तर अन्नमयच प्राण आहे. तेव्हां अन्य गति नाहींच. विरक्त आणि बद्ध ह्यांत इतकेंच अंतर कीं, नाइलाज समजून कांहीं तरी गोळा विरक्त देतो, पण त्याच्या रुचीची वगैरे पर्वा करीत नाहीं; बद्ध रुचीकरितां तळमळ करितो.

## अहिंसा परमो धर्मः

मुंगीपासून ब्रह्मदेवापर्यंत सर्वांचा जीव सारखाच. जीवावरील प्रेम सर्वांस समान. आहार, निद्रा, भय आणि विहार सर्वांच्या मागें लागलेच आहेत. सुखाविषयीं अभिलाष आणि दुःखाविषयीं तिरस्कार सर्वांस सारखा आहेच. एक ज्ञान तेवढें मनुष्यास जास्त आहे, अशा ज्ञानसंपन्न माणसांनीं व्याघ्रादिक हिंसक पशूंप्रमाणें दुर्बळ मुक्या जनावरांचें हनन करून आपल्या पोटाची खळगी भरावी, हें किती तरी नीच कर्म आहे ! परमेश्वरापाशीं ह्या पापाबद्दल कांहींच कां शासन सोसावें लागणार नाहीं ? सर्व धर्मांमध्यें अहिंसा हा श्रेष्ठतम धर्म आहे, असें कोण विचारी मनुष्य ह्मणणार नाहीं ?

## दुर्बळ कोट्या.

जग निर्माणकर्त्यानें सर्व प्राणि मनुष्याच्या उपयोगाकरितां निर्माण केले आहेत, मांसाहार करितां यावा, म्हणूनच सुळे दांत मनुष्यांना दिले आहेस, दुर्बळ लहान प्राण्यांस प्रबळ मोठे प्राणि खातात हा सृष्टिक्रम स्वाभाविक आहे; यावरून मनुष्यानें मांसाहार करावा, असा ईश्वरी संकेतच आहे, असल्या कोट्या केवळ दुर्बळ होत. असें म्हणणें म्हणजे आपण त्या क्षुद्र प्राण्यांप्रमाणें ज्ञानहीन आहों असें पतकरणें नव्हे काय ? पूर्वावस्थेंत ज्ञानाभावामुळें चरितार्थाकरितां धान्यादिक निर्माण करण्याची माहिती नव्हती. म्हणून माणसांनीं हिंसक पशूंचें अनुकरण करून त्यांचीच वृत्ति त्या काळच्या कोत्या बुद्धि-सामर्थ्यानुरूप स्वीकारिल्या होत्या. म्हणून तो आधार दाखवून मांसाहार आणि मद्यपान ह्यांचें मंडन करणें ह्मणजे पाळण्यांतील बालकांच्या वृत्तीचा आधार घेऊन प्रौढांनींही मलतेंच खावें, दिगंबर रहावें, आणि

पाहिजे तेथें देहधर्म होऊं द्यावे असें ह्मणण्याइतकेंच सुयुक्तिक व समंजस नव्हे काय ? मनुष्यास पाहिजे तें दुष्कर्म करण्याजोगे अवयव दिले आहेत, म्हणून त्यानें दुष्कर्म करीत रहावें, असाच ईश्वरी संकेत आहे असें ह्मणतां येईल काय ? बलिष्टानें दुर्बळांस लुटावें अशीच ईश्वराची आज्ञा आहे असें म्हणण्यास कोणा तरी सुशिक्षित विचारी मनुष्याची जिव्हा धजेल काय ? असले बाष्कळ प्रलाप करणें म्हणजे पृथ्वीवरील धर्मशास्त्रें आणि न्यायनीति जाळून टाकणें आहे.

## धर्माची परिपक्कता.

मनुष्याकरितां सर्व प्राणी निर्मिले आहेत असें ह्मणण्यापेक्षां मनुष्यांसुद्धां सर्व प्राणी परस्परांनीं एकमेकांस उपयोगी पडावें तेणेंकरून सर्वच प्राण्यांचा चरितार्थ सुखानें आणि आनंदानें चालावा म्हणून प्रभूंनीं निर्माण केले आहेत. हें म्हणणें किती सुयुक्तिक आणि न्यायाचें आहे ! सर्व प्राण्यांचें संगोपन पोटच्या लेंकराप्रमाणें काळजीनें आणि ममतेनें करून त्यांस कामास लावून त्यांपासून उत्पन्न होणारें इहलोकींचें अमृत सेवन करून, मनुष्यानें आपला फायदा करून घ्यावा; आपलें सुख वाढवावें ह्मणूनच ते निर्मिले आहेत. पोटाची गार भरण्यास मांसापेक्षां सुलभ, हितावह व सुखावह पदार्थ मुबलक आणि नानाप्रकारचे नारायणांनीं करून ठेविले आहेत. धर्माची परिपक्कता भूतदयेवरून ओळखली पाहिजे.

## आवडतें शास्त्र.

सुळे दांत जनावरांचें मात्र मांस खाण्यास उपयोगी पडतात असें नाहीं. माणसांचें मांसही त्यांनीं खातां येतें. त्यांनीं आप्तस्वकीयांचेंही मांस खातां येईल. मग दुष्काळांत माणसें अन्नावांचून कां मरतात ? माणसें खाणारास दुष्ट व रानटी ह्मणून त्यांचा तिरस्कार मांसआहारी लोक कां करितात ? माणसांनीं माणसांस खाणें मात्र रानटीपणा आहे, पण इतर प्राण्यांस खाणें विहित, आहे असें म्हणणें म्हणजे आवडतें शास्त्र होय.

परमेश्वर सर्वांचा जनक, आपल्या अज्ञान व दुर्बळ बालकांस खाऊन ज्ञानी म्हणविणाऱ्या बलिष्ट कारस्थ्यांनीं आपल्या पोटास आग लावावी, असें त्यास वाटण्याचा संभवच नाहीं. यमाजी भास्कराच्या राज्यांत ह्या रसभक्तांची गर्दी फारच झाली असेल. बहुतेक रोग ह्या रसाच्या नादानें मनुष्याचा विध्वंस

करीत आहेत. ज्याची जीभ ताब्यांत नाहीं तो दुःखाच्या व विनाशाच्या मार्गास लागलाच समजावा. त्याच्या घरादारास पाय फुटलेच समजावें.

## दुष्काळाची आवृत्ति.

नरासुरांच्या पोटाच्या धाडीचा परिणाम ह्या धान्यसमृद्ध भरतखंडावर अति दारुण झाला आहे. दररोज लक्षावधि जनावरांची कत्तल होत असल्या कारणानें जनावरांच्या जीवावर अवलंबून असणारी शेतकी दुर्बळ झाली; निसत्व झाली. मेहनतीस बैल नाहींत, खत नाहीं. ह्यामुळें वाढत्या लोकसंख्येस पोसण्यास भूमि समर्थ असून असमर्थ झाली आहे. वरचेवर दुष्काळाची आवृत्ति होत आहे.

## शक्तिऱ्हासाचें कारण.

हिंदी प्रजा ह्मणजे अगदीं नादान, कमकुवत असा तिचा ठाम लौकिक झाला आहे. परद्वीपस्थ आपल्या तर्कांनीं नाना प्रकारचीं कारणें ह्या गोष्टीस सांगत आहेत. आमचे सांप्रतचे विद्वान लोक आमचें वैभव गेल्यानंतर ५० वर्षांनीं जन्मलेले त्यांस पूर्वींची माहिती नाहीं. सर्व कांहीं ज्ञान परक्यांच्या पुस्तकावरून झालेलें, स्वतःच्या पुराणादिकाकडे ओढा नाहीं, मग माहिती कोठून व्हावी ? देशांतील स्वाभाविक रचनेमुळें व हवेमुळें आम्ही कमकुवत व्यायाम नसल्यानें आहों, वगैरे वाटेल तें जरी परक्यांनीं सांगितलें तरी माना डोलवाव्या, आम्ही मूळचेच नादान आहों असें कबूल करावें, गोऱ्यांच्या पुढें आम्ही यःकश्चित् आहों, ही समजून व्हावी हें ठीकच आहे. पण ह्या शतकांतच नैसर्गिक कारणें उत्पन्न झालीं नाहींत, ह्याच देशांत अनेक नवनाथ सहस्त्रबळी होऊन गेले. पेशवाईअखेर सुद्धां हल्लींच्या युरोपियनांस बगलेंत मारण्याजोगे बलाढ्य लोक होते. एका दिवसांत पुण्याहून पंढरपुरास खांद्यावर जबरदस्त कढईचें ओझें घेऊन जाणारा दंडवते उपनांवाचा ब्राह्मण पंढरपुरांत ३०।४० वर्षांमागेंही पाहिलेला आहे. उतारवयांत सुद्धां तो अनेक अनाथ प्रेतें बगलेंत मारून नेत असे. असे पुष्कळ लोक माझ्या ऐकण्यांत आहेत. त्यांची माहिती दिली असतां विस्तार फार होईल. सुमारें ४० वर्षांपूर्वीं ह्या डोळ्यांनीं पाहिलेलीं माणसें व हल्लींचें मल्ल पाहिले म्हणजे सखेदाश्चर्य वाटतें. गेल्या सालीं राज्यारोहणाच्या वेळेस येथून नेलेलें निवडक सैन्य पाहून तेथील लोक लज्जित झाले हें प्रसिद्धच आहे. ह्यावरून आम्ही

मूळचेच दुर्बळ नसून आह्मांवर कोसळलेल्या परवशतेच्या कारणानें, आम्ही दुर्बळ होण्यास अनेक कारणें झालीं आहेत. त्यांचा शोध करून सविस्तर विवेचन करूं म्हटल्यास एक ग्रंथच होईल. सध्यां आपल्या चालू विषयास लागूं तेवढेंच कारण सांगतों. नरासुरांच्या क्षुधा शमनार्थ जो गोवध होतो आहे, तोच आमच्या बळाच्या क्षयरोगास कारण आहे. हिंदी लोकांत पुष्कळ समाज व मुसलमान, मांसाहारी आहेत. पण दररोज त्यावरच पोट भरणारे नाहींत. ह्यामुळें ते पुष्कळ दिवस देशांत असूनही आमच्या बळावर हें अरिष्ट आलें नव्हतें. हिंदी प्रजा मग ती कोणत्याही जातीची असो, तिचें बळ सर्वस्वी दुधावर आहे. पशुसमृद्धि कायम राखून आपलें बळ वाढविण्याचें साधन दुग्धपान करून बलवर्धनाचें अक्षय साधन ज्या आमच्या अत्यंत चतुर पूर्वजांनीं योजून ठेविलें ते धन्य होत.

## आत्मघातास आपणच कारण.

गोवधाचा दोष राजावर सर्वस्वी ठेवणें अविचाराचेंच आहे. राजाकडून गोवध बंद होईल ही आशा व्यर्थच आहे. पण ह्यावरून निराश होण्याचें मात्र कारण नाहीं. नीट विचार करून पाहिलें असतां ह्या गोवधाचा दोष बहुतांशीं आपल्याच माथीं येतो. आपण स्वेच्छाचारी धांगडधिंग्याच्या बेबंद बादशाहींत सांपडलों नाहीं. सुनियंत्रित ब्रिटिश राज्याच्या अमलांत आहों. आपण आपल्या गोमाता कसायांस विकल्या नाहींत तर जुलुमानें त्यांस हात लावण्याची कोणाची जुरत आहे! आपणच आपल्या हातानें गोमाता दुसऱ्यास द्रव्याच्या लोभानें देतों आणि शेतें पिकेनात आणि बलवर्धन साधन मिळेना ह्मणून रडत बसतों.

## लंगडी सबब.

कोणाचें म्हणणें असें येतें कीं, आह्मांस फार दरिद्री सरकारानेंच करून ठेविलें आहे. ह्यामुळें द्रव्याच्या लालुचीपुढें आमचें कांहीं चालत नाहीं. पण असें ह्मणणारांस काय उत्तर द्यावें? ज्याचें मन ज्याला आवरत नाहीं त्यानें आपल्या अज्ञानाबद्दल लोकांस दोष देणें केवळ मूर्खपणा होय. हा मूर्खपणा आमच्या राष्ट्राच्या अंगीं अगदीं भिनून गेला आहे. परदेशी माल आम्हांस सौंदर्यानें व यत्किंचित् स्वस्ताईनें मोह पाडतो ह्मणून आमचा नाइलाज होतो. अधिकाऱ्याची कृपा आह्मांस मोह पाडते ह्मणून आमचा उपाय चालत नाहीं, म्हणून आम्ही सत्यापलापांस भीत नाहीं. सगळ्या देशाचे वाटोळे करणारे

कायदे करण्यास आह्मांस मत द्यावें लागतें. अशा शेंकडों गोष्टी आम्हांस कशाच्या तरी मोहानें कराव्या लागतात, असें जोंपर्यंत चालणार तोंपर्यंत आह्मी असे विनाशाकडेच सारख्या भर वेगानें धांवत राहणार. दर वर्षासच नव्हे, दररोज जरी आह्मीं राष्ट्रीय सभा भरविल्या, सरकारचीं टेबलें अर्जांनीं व ठरावांनीं भरून काढिलीं, तरी सरकारी अधिकारी उपहासपूर्वक हंसून त्यांस केराच्या टोपल्या दाखवितील. आपल्या हातीं असलेल्या गोष्टी ज्याच्यानें होत नाहींत, त्यांस परस्वाधीन—त्यांतून बलाढ्य परकी राजाच्या स्वाधीन असून त्यांच्या हिताविरुद्ध व मनाविरुद्ध गोष्टी त्यांच्याकडून कशा प्राप्त होतील, मागणाराच्या अंगीं घेण्याची योग्यता असेल तरच देणारा वळतो.

## दुग्धपान.

गोवध बंद करण्याचें राहो, पण आहेत जनावरें तीं बाळगून दुग्धपान करण्याची वहिवाट ठेवण्यास काय हरकत आहे ? दुग्धाचा खप वाढला ह्मणज अर्थातच तितक्या अंशानें गोरक्षण वाढेल. दुग्धपान करावें म्हणावयाचें फार सोपें आहे, पण पैसे आणावे कोठून असें ह्मणणें सहज आहे, पण देशामधील दारू, ताडी, सोडावाटर इत्यादि पेयांचा नव्हे, प्रत्यक्ष विषाच्या खपाची किंमत आकारून पाहिली तर तेवढ्यामध्यें समाजाच्या दुग्धपानाची सोय सहज लागून देशाचें बळ वाढेल पण " विनाश काले विपरीत बुद्धि " राष्ट्र नष्ट करण्याची प्रभूची इच्छा आहे कीं काय कोण जाणे !

## उत्कर्षाबरोबर अपकर्षाचें बीजारोपण.

प्रभूची योजना मोठी अतर्क्य आहे. सूक्ष्म विचार केला असतां असें दिसून येतें कीं, कोणच्याही राष्ट्राच्या उत्कर्षाबरोबरच त्याच्या भाव विनाशाचें बीजारोपण करून उत्कर्षाच्या आणि विनाशाच्या वृक्षाची वाढ बरोबरच प्रभु करीत असतात. हें बीज दुर्व्यसन व दुर्गुण होत. दुर्व्यसनें हीं रसविषयांपैकींच आहेत. ह्या दुर्व्यसनांचा परिणाम किती तरी दारुण झाला आहे ! राष्ट्राच्या विनाशाचें व अधोगतीचें प्रत्यक्ष बीज दुर्व्यसन कसें असतें हें निरनिराळ्या राष्ट्रांच्या व्यसनांचा विचार केला असता सहज दिसून येतें. ह्मणून तो थोडा विचार पुढें केला आहे.

## अफूनें चिनास बुडविलें.

सत्ताधारी राष्ट्रें आजला भूमंडलावर जीं आहेत त्या सर्वांत प्राचीन, चिनी-

राष्ट्र होय. ख्रिस्ती राष्ट्रांवर महासरस्वती प्रसन्न होण्यापूर्वी कलाकौशल्यांत अग्रमान या राष्ट्राकडे होता. हें राष्ट्र सामर्थ्यानें आणि बुद्धिमत्तेनें कोणासही हार जाणारें नाहीं. त्रिकालज्ञ आर्यांनीं आपले वंशज पराधीन न व्हावे व पवित्र आर्यभूमीला परक्यांचा विटाळ न व्हावा ह्मणून " न नीचो यवनात्परः ' " न वदेत् यावनीं भाषां प्राणैः कंठगतैरपि. " असे निर्बंध करून ठेविले आ-तोच बाणा चिनी लोकांचा. आपल्या भूमीवर परक्यांचा पाय ठेवूं द्यावयाचा नाहीं, आपल्या देशांत दुसऱ्याची डाळ शिजूं द्यावयाची नाहीं, असा त्यांचा निश्चय होता. तें राष्ट्र ह्मणजे मानवी महासागर होय. शुद्धीवर राहतें, तर सर्व भूमंडळ पादाक्रांत करणें त्यास मुळींच अशक्य नाहीं. पण इतरांचा उत्कर्ष करण्याची प्रभूची योजना असल्याकारणानें चिनी लोकांच्या मागें अफूचें शुक्ल-काष्ट लागलें ! हिंदुस्थानच्या महसुलाचा मोठा भाग ते लोक. अफुवरील कराच्या रूपानें भरीत आहेत ! " दुर्यामें ससस " म्हणतात त्याप्रमाणें थो-डीशी परकीं भूतें जाऊन त्यांनीं त्या चिनी लोकांस तुडविलें ! शेळ्या मेंढ्या-प्रमाणें त्यांची कत्तल केली ! नामर्द माणूस सुद्धां सोसणार नाहीं, असा खेळ त्यांच्या डोळ्यादेखत केला. हा सर्व परिणाम दुर्व्यसनाचा होय.

## ख्रिस्त्यांच्या मागें दारू.

सगळ्या भूमंडळावर ज्यांच्या पराक्रमाचा आणि शहाणपणाचा व विद्या-चारसंपन्नतेचा डंका वाजत आहे, त्या ख्रिस्ती राष्ट्रांकडे पाहिलें तरी हाच प्रकार आहे. दुर्गतीच्या माउलीनें त्यांस इतकें पछाडलें आहे कीं, त्यांच्या निर्वाहा-च्य पदार्थांच्या कैक पटीनें ह्या विषप्राशनाकडे खर्च ते करीत आहेत ! तेणें-करून त्यांच्या शहाणपणाचा, पराक्रमाचा व संपत्तीचा एकसारखा ऱ्हास होत आहे; तो चालत्या काळाच्या धुंदींत त्यांस समजत नाहीं. भावी विनाशाच्या बीजाचा वृक्ष त्यांच्या उत्कर्षाबरोबर झपाट्यानें वाढत आहे.

## आपणही तसेच.

आपण अपकर्षाच्या पूर्णतेस पोहोंचून लोकांच्या पायदळीं पडलों आहों, तरी आपल्यांतही अंमलाचा प्रकार कायम राहिलाच आहे ! काशी वगैरे प्रांतांत शांभवी इतकी कांहीं सर्वसाधारण होऊन बसली आहे कीं, तीं अंमल अस-ल्याचेंही भान राहिलें नाहीं. अन्नपाण्याप्रमाणें रोज सेवनाची अवश्य वस्तुच ती बनून राहिली आहे. बारा दिवसांच्या लेंकरांसही बोंडल्यानें दुधाप्रमाणें ती घालितात ! माळवा, मारवाड वगैरे प्रांत अफूनें घेरले आहेत ! कुसुंबा

आदरातिथ्याच्या शिष्टाचारांत प्रमुखस्थान पावला आहे! दक्षिणेंत तमाखूचें प्रस्थ माजलें आहे! चाळीस वर्षांपूर्वी तमाखू तपकिरीच्या रूपानें प्रसृत होती. तपकिरीचें व्यसन उपहास-पात्र नव्हतें. शिष्टाचार म्हणून परस्परांपुढें रुप्याच्या सोलापुरी डब्या करीत असत. हल्लीं ती बहुतेक नाहींशी होऊन त्यावेळीं उपहासास्पद असलेली तमाखू सध्यां शिष्ट संभावितांच्या सभेंतच नव्हे, पवित्र वेदघोषांतही रौप्य पात्रांत विराजमान होऊन फिरत आहे! तिलाही मागें सारून साहेबांच्या अनुकरणानें चिरूट, विड्या वगैरेच्या रूपानें तिची क्रीडा झपाट्यानें वाढत आहे! मुलांस शिक्षण देत असतां आपल्या पवित्र आसनावर गुरु व उपगुरु आणि प्रौढांस सन्मार्गच्युत न होऊं देण्याकरितां न्यायासनावर आरूढ झालेले शास्ते न्यायाधीश धूम्रपान करीत असतात! जणूं काय, आपल्याप्रमाणेंच मुलांनीं आणि प्रौढांनी पुढें चालवावें ह्मणून त्यांस वळण लावीत असतात.

## व्यसनास कारण संगत.

पुष्कळ लोक असें समजतात कीं, निरनिराळ्या देशांत निरनिराळे अम्मल अवश्यक आहेत, पण तें खरें नाहीं. विलायतेकडे पन्नास हजार लोक अहिंसक झाले आहेत! मद्यमांसास ते शिवत नाहींत! परकी भूतें चिनांत राहून अफू खात नाहींत. काशी, माळवा, मारवाड वगैरे प्रांतीं दक्षिणेंतील गेलेले लोक भांग किंवा अफू सेवन न करितां सुखानें राहतात. सर्व व्यसनें केवळ संगतीनें गतानुगतिकतेनें आणि विचाराच्या उपेक्षेनें मनुष्याच्या गळां पडून त्याचा सर्व प्रकारें विध्वंस करीत आहेत. तीं सेवन करण्यांत कांहींच फायदा नाहीं.

## व्यक्तींचा परिणाम.

व्यसनांपासून व्यक्तीवर कोसळलेले अनर्थ, हाल, अपेष्टा रात्रंदिवस आपण पहातच आहों. त्याविषयीं विस्तार कशास पाहिजे? असले दुर्व्यसनानें तळमळत पडलेले दुर्दैवाचे पुतळे नारायणांनीं निर्माण तरी कशाला केले? असें वाटतें. पण, दुनियेंतील सर्व लोकांनीं त्यांची दुर्दशा पाहून जागे व्हावे, व्यसनांच्या नादांत पडूं नये, म्हणून ह्या दुर्व्यसनाच्या सजीव प्रतिमाच नारायणांनीं लोकांपुढें उभ्या करून ठेविल्या आहेत. त्यांकडे विचारपूर्वक नित्य पहात राहून शाहण्यांनीं आपलें हित साधावें.

## नवीं नवीं व्यसनें.

दुर्व्यसनाचे सजीव पुतळे रोज दिसत आहेत, विपत्तीची कडेलोट झाली आहे, तरी आपले डोळे कोठें उघडत आहेत ! आपलें आपण उमजतच नाहीं, म्हणून आपली दुर्दशा करून परदेशांतील तेजस्वी, कर्ते व पराक्रमी लोक आपल्यावर अंमल करण्यास पाठविले म्हणजे तरी लाज वाटून त्यांचे सद्गुण आपण घेऊं म्हणूनच कीं काय वारंवार आपल्यावर परकी लोकांचा अंमल होत आला आहे. पण आपण पडलों पक्के निगरगट्ट, लांडोरवृत्ति आणि विचारांध ! यामुळें आपल्यास परक्यांचे सद्गुण दिसत नाहींत. बुडत्याचा पाय खोलाकडे तसें होऊन आपण त्यांच्याकडे पाहतच नाहीं. त्यांच्या वाईट चालीरीति, त्यांचीं दुर्व्यसनें ह्यांत मात्र त्यांच्यावर ताण आपण करतों. सांप्रत भूपृष्ठावर सर्वांत श्रेष्ठ अशा इंग्रज लोकांचा सहवास आणि छाया, ईश्वरकृपेनें आपल्यास प्राप्त झाली आहे. पण काय उपयोग ! ते दयाळूपणें आपलें विद्यामृत आपल्यास पाजीत आहेत ! पण त्यापासून आपण काय कमाविलें आहे ? त्यांची श्ववृत्ति ( चाकरी ), कज्जेदलाली ( वकिली ), चार बाटल्यांची आषाढपाटी ( डिस्पेन्सरी ), पसरून बसणें, पोपटाप्रमाणें त्यांनीं शिकविलेली लटपटपंची ( भाषणें ) त्यांच्या हेरांचें काम ( वर्तमानपत्रें ) लोकांच्या वर्गणीनें पोट भरून फुकट करणें ह्याखेरीज कोणती कमाई केली आहे ? पारशी, भाटे तरी बरे, त्यांनीं गिरण्या घालून एक तरी पाऊल पुढें टाकलें आहे. आतां दुर्गुणांची कमाई पहा ! आपल्या लोकांनीं मद्यमांस खावें म्हणून त्यांनीं स्कालर्शिपा ठेवल्या नाहींत, बक्षिसें ठेविलीं नाहींत, चहाकाफी पिणारांस नोकरीची लालूच ठेविली नाहीं. पाव बिस्कुटें खाणारांस किताब देण्याची योजना केली नाहीं. सारांश, त्यांच्यावर आपल्या दुर्व्यसनांचें लेपर ठेवण्याजोगें कारण त्यांजकडून झालें नाहीं. पण वरील सर्व वाईट पदार्थांचा प्रसार आमच्यामध्यें झपाट्यानें वाढत आहे. आमची कोठें चहा उरली नाहीं म्हणूनच कीं काय कोण जाणे आम्हीं आपल्या चुली आणि बायका ह्यांस नेहमीं चहा करण्यास लाविलें आहे. स्वराज्य गेलें, त्याच्या बरोबर ऐश्वर्य गेलें, सत्ता गेली, वजन गेलें तेव्हां आतां बळ वाढवून रांडमास आणून काय करावयाचें, म्हणूनच कीं काय कोण जाणे, आम्ही बलवर्धन करणाऱ्या दुग्धादिक रतिबांचा संबंध ते दूर टाकून शरीरप्रकृतीचा नाश करण्याचा गुण असल्याविषयीं डाक्टर लोकांचे दाखले घेऊन येणाऱ्या चहाची आपले घरीं मोठी चहा आम्हीं करून ठविली आहे. सुखी व प्रतिष्ठित

घराणें ओळखण्याचें चिन्ह सकाळच्या प्रहरीं चुलीवरील चहाचें आधणच करून टाकलें आहे. गाईम्हशीच्या दुधाचीं पातेलीं आतां आमच्या सुधारलेल्या चुलींस आवडेनाशीं झालीं आहेत. धारुष्णाचे चांदीचे पेले आतां आमच्या अर्भकांच्या मुखांस कंटाळले. चहाकाफीची चिनी किंवा विलायती मातीचीं बोळकीं त्यांच्या कपाळीं आलीं आहेत. तिसरे प्रहरीं, बलवर्धक फराळ घरीं गोड लागत नाहीं. वाळ्याच्या वासाचें स्वच्छ पवित्र गार पाणी आवडत नाहीं. बाजारांतील उपहारगृहांत विलायती खाद्य पेयें किरिस्तान, मुसलमान वगैरे गलिच्छ लोकांनीं अभक्ष्य पदार्थ घालून केलेलीं, व पाहिजे त्यांनीं उष्टावलेल्या कांचपात्रांत वाढलेलीं, फार प्यारी झालीं आहेत. सोडावाटर, लेमोनेड, मद्यार्क मिश्रित सरबतें ह्यांनीं भरलेल्या बाटल्या पाहिजे त्या जातीच्या लोकांनीं तोंडास लाविलेल्या पवित्र ब्राह्मणवंशांत जन्मास आलेलीं पोरेंसोरें खुशाल तोंडास लावून गटगटा पीत आहेत. त्यांची चटक लागली म्हणजे प्रथम घरांत हस्तलाघवाला सुरुवात करून पुढें मोठ्या चोऱ्या करण्यापर्यंत संभावित पिढिजाद्या घराण्यांतील राजविद्याभूषित तरुणांची मजल येऊन पोहोंचली आहे. पोरांस हंसावें तर साठी बुद्धि नाटी झालेल्या वडिलांसच बाटल्या आणून देण्यास व फोडून ओतून देण्यास कोंवळ्या मनाचे पुत्र लागतात. शाळेप्रमाणें पुढें परिणाम झाला म्हणजे मात्र कपाळाला दोष देतात. विलायती खाद्य पेयांचीं दुकानें रस्तोरस्तीं झालीं आहेत. सजरोस मुलें व तरुण लोक त्यावर ताव मारीत आहेत. चहाचा खप वाढविण्याकरितां तो पोस्टांतून विकला जाण्याची खटपट गोरे चहावाले करीत आहेत. धन्य त्या बिचाऱ्यांच्या परोपकारांची ! ते आमच्या दर घरांत सुद्धां चहा व मद्यमांस आम्हांस पुरवितील व भरवितील सुद्धां. आमच्या लोकांनीं मात्र घरांदारांवर तुळशीपत्र ठेवण्यास तयार होऊन परमेश्वरांनीं दिलेल्या जिव्हेची शांति व रसविषयाचें सार्थक करण्यास कसर करूं नये.

## गंध.

गंधविषयानेंही मन मोहित झालें म्हणजे मनुष्याला विचार राहत नाहीं. सुगंध सुगंध ह्मणून भ्रमणाऱ्या भ्रमराप्रमाणें त्यांची अवस्था होते. आणि सुगंधाच्या नादीं भरून हुरळलेलीं माणसें कधीं कधीं फार खर्चाखाली येऊन बुडतात. हा विषय बाकीच्या विषयांइतका घातक नाहीं. गंधद्वारें रोगबीजें

पसरून मनुष्यघात होतो, हा मात्र ह्या विषयाचा दारुण परिणाम आहे. साथी-च्या अनेक रोगांस दुर्गंध कारण होतो. रोगाच्या संसर्गानेंही रोग येतात तो संसर्ग गंधद्वारेंही होतो.

---

# भाग ८.

## मोहदुर्विपाक.

**नायं जनोमे सुखदुःख हेतुः । न देव आत्मा ग्रह कर्मकालः ॥**
**मनः परं कारण मा मनंति । संसारचक्रं परिवर्तयेद्यत् ॥ ॥**
(सु. भा.)

## मनास भोग.

ज्ञानेंद्रियांनीं होणारा सुखदुःखाचा भोग प्रथम मनास झाल्यासारखा वाटतो, इंद्रियांस विषय प्राप्त होतात, तेव्हां सुखदुःखाचा भोग होतो, पण मन स्मृतिगामी असल्यामुळें त्याला विषयांच्या स्मरणाबरोबर सुखदुःख वाटूं लागतें, हा ह्याचा मोठा चमत्कार आहे. स्पर्शसुखाचें प्रमुख साधन स्त्री ती जवळ नसतांही शुकरंभा-संवादांतील रंभेचें भाषण अथवा शृंगारशतकांतील मार्मिक श्लोक वाचूं लागल्याबरोबर मनास स्पर्शसुख वाटूं लागतें. छकडी, तमाशे, नाटकें पाहतां पाहतां हें स्पर्शसुखांत रंगून जातें, ह्याहून गंमत ही कीं, देह प्रत्यक्ष स्पर्शसुख एका स्त्रीशीं किंवा पुरुषाशीं घेत असतां त्याच वेळेस शंभर कोसांवर असलेल्या अन्य व्यक्तीशीं मन रममाण होत असतें, किंवा संभाषण किंवा कारस्थान करीत असतें. प्रदर्शनें किंवा मोठमोठ्या लग्नसमारंभाचीं हुबेहूब वर्णनें वाचूं लागलें म्हणजे मनापुढें मूर्तिमंत लखलखाट उभा राहून तें रूपविषयांत मग्न होतें. सुदामचरित्रांतील " मांडून स्वस्तिक सुवर्ण पाट " हा कटाव ऐकतांना मनाला पक्वान्नें खाल्ल्याचा भास होतो. कोणाचें गाणें ऐकिल्याचें स्मरण झालें, कीं मन लागलेंच त्या गाण्यचें सुख अनुभवून त्याची नक्कल करूं लागतें. एखाद्या ठिकाणीं जातांच तेथील परिस्थितीबद्दल मनाचा कल होईल त्याप्रमाणें तेथें, वस्तुतः सुगंध किंवा दुर्गंध नसला तरी, त्यास सुवास किंवा दुर्गंध भासूं लागतो. गंध्याच्या दुकानांत अत्तर नसेना, पण गंध्याचें दुकान समजून त्यांत पाय ठेवतांच ह्याला सुवास येऊं लागतो.

## रस व अलंकार.

बिचाऱ्या जिव्हेला काय ते षड्रस माहीत. ते तरी सगळेच सगळ्या जिव्हांस प्रिय असतात असें नाहीं. कोणास कोणचा तरी आवडतो, पण मनाला ते सगळे पुरत नाहींत; ह्मणून त्यानें काव्यामृतांत नवरस उत्पन्न करून स्वप्रेम हा दहावा रस बळेंच उत्पन्न केला आहे. नेत्रांला संतोष उत्पन्न करणारे हजारों अलंकार पाहून मनाची तृप्ति न होतां त्यानें काव्यामध्यें शब्दालंकार आणि अर्थालंकार निर्माण केले आहेत

## मनोराज्य.

मनुष्याला झोंप लागल्यावर स्वप्न पडतें, पण मनाला मनोराज्यरूप स्वप्न जागेपणींच दिसतें. शरीर आपला धंदा करीत असतां हें मन स्वप्नांत चूर झालें म्हणजे शरीरही त्याच्या प्रेरणेनुरूप हालचाल करूं लागतें. प्रसिद्ध श्रीचिंतामण महाराज देव शरीरास ध्यानाच्या खटाटोपींत गुंगवीत असतांही मनानें फुलबागेंत प्रवेश केलेला श्रीतुकाराम बोवांनीं ओळखून देव महाराजांस ती ओळख दिल्याची गोष्ट जगजाहीरच आहे. बालमित्रांतील संताजी आणि क्रमिक पुस्तकांतील शेख महंमद मनोराज्यांत डोलूं लागून आपल्या जीवनाधारास मुकल्याचें सर्वांस ठाऊक आहेच. सर्वसंगपरित्याग करून डोंगरावर पर्णशाला करून राहणाऱ्या मनाला विषयांचा परित्याग जोंपर्यंत झालेला नसतो तोंपर्यंत शरीरास डोंगरावर ठेवून मन गांवांत दारोदार फिरून नाना विषयांचा भोग घेत असतें.

## परभोगाचा परिणाम.

ह्या मनाचा विलक्षण प्रकार असा आहे कीं, दुसऱ्याच्या दुःखानें हें दुःखी आणि सुखानें सुखी कधीं कधीं होत असतें. ह्यानें अभिमान धरून कोणाच्या ठायीं ममत्व स्थापन केलें पुरे, कीं त्याच्या सुखदुःखानें ह्याला वेदना होऊं लागतात. लेंकास ठेंच आणि बापाच्या डोळ्यास पाणी. बायकोस धुपणी, नवऱ्यास झुरणी; सुनेच्या अंगावर दागिने, मामंजींना आनंद. दुसरा चमत्कार हा कीं, ह्याच्या विपक्षाच्या सुखदुःखाचा ह्याच्यावर उलट परिणाम होतो! शत्रूचा पराजय झाला, म्हणजे हें साखर वाटूं लागतें, आणि शत्रूचा जय होतांच हें विव्हल होऊन जातें. ह्याहीपेक्षां चमत्कार, कीं ह्याचा कांहीं नफा तोटा नसतां हें एका पक्षाचा अभिमान बळेंच धरून त्या पक्षाच्या जया-

जयाच्या संबंधानें सुखदुःख मानूं लागतें. अमक्याच घोड्याचा शर्यतींत जय व्हावा असें ह्यास वाटूं लागतें. कायदेकौन्सिलांत टिळकच निवडून यावेत, किंवा गोखलेच यावेत, अशी इच्छा करून त्यांच्या जयापजयानें हें मन डोलूं लागतें किंवा रडूं लागतें. जपान आणि चीन किंवा ग्रीक आणि टर्की ह्यांच्या लढायांशीं इकडील लोकांचा कांहींही संबंध नव्हता, पण तारके व्हां पाचीन असें कोणाकोणास होई, आणि कोणी ह्या पक्षाचा तर कोणी त्या पक्षाच्या जयापजयानें सुखदुःख प्रदर्शित करीत. लांकडाच्या सोंगट्यास मरण कशाचें ? पण त्या नरदेच्या मरणानें खेळणारा विव्हळ होतो. तात्पर्य हें मन बळेंच अभिमानाच्या फेऱ्यांत पडून आपल्या मागें नसती कांचणी लावून घेणारें आहे.

## सुखाचा हव्यास.

मनाचा हा स्वभावच पडून गेला आहे. दुनियेंतील धन, दौलत बागबगीचे, जमिनी जुमले, वस्त्रें भूषणें वगैरे लाखो खटले ह्यानें बळेंच आपले ह्मणून आपल्या मागें लावून घेतले आहेत. बायको, मुलें, आप्तसोयरे, इष्टमित्र, दासदासी, मित्रशत्रु हा सगळा बाजार. ह्या मनानें अभिमान-वश होऊन आपल्या डोक्यावर घेतला आहे. जन्मभर कष्ट करून शेवटीं दुर्गतीला जाण्याचें परम नीच व घातक काम ह्यानेंच मनुष्याच्या गळ्यांत अडकवून दिलें आहे. सर्व दुःखापेक्षां खडतर दुःख आप्तस्वकीय ह्यांचा मृत्यु, त्याची बाधा ह्या मनाच्या अभिमानानेंच जनाला उभी जाळीत असते. सुखाचा अत्यंत हव्यास असल्या कारणानें सुखाकरितांच सर्व कांहीं खटाटोप ह्या मनानेंच जमविला आहे. ह्याची सुखाविषयीं हाव इतकी कांहीं अमर्याद आहे कीं, येथें मात्र सुख भोगून एका जन्मानें ह्याची तृप्ति होत नाहीं. पुढें स्वर्गलोकीं किंवा पुढल्या जन्मीं सुख प्राप्त व्हावें, ह्मणून नाना व्रतें उपासतापास करून हें आपल्याला व आपल्याबरोबर देहाला अत्यंत कष्ट देत आहे. लटक्या ममतेनें हें इतकें वेडें होतें कीं ह्यातारपण होऊन सुखदुःखाचे सर्व संस्कार भोगून फजित पावून सुद्धां ह्याला समाधान होत नाहीं. अंतकाळीं वासनेंत गुंतून प्राण्याला हें अति नीच आणि क्लेशकारक पिशाच योनी सुद्धां घेण्यास लावतें. ह्यानें पूर्वजन्मीं पापापुण्याचा संचय करून संचिताची जोड करून ठेविलेली आहे. तिच्या अनुरोधानें ह्या जन्मीं प्राणि सुखदुःख भोगीत आहेत. ह्या जन्मीं हे पुढल्या जन्माच्या सुखदुःखाची तयारी करून ठेवीत आहेत. लोकांपासून

सुख व्हावें, ग्रह प्रसन्न होऊन सुख व्हावें, असें नाना प्रकार करून सुख व्हावें ह्मणून मनुष्यें यत्न करीत असतात. पण तीं सर्व कारणें मनानेंच निर्माण केलेलीं आहेत. मनाच्या पूर्वार्जिताप्रमाणें ग्रह अनुकूल प्रतिकूल होतात. देह सशक्त किंवा अशक्त होतो. देवता रुष्ट किंवा प्रसन्न होतात. काळ फलप्रद किंवा अनिष्ट होतो. तस्मात् सुखदुःखास कारण मन होय. मनुष्याच्या उद्धारास किंवा अधःपातास हेंच कारण होय. " मन एवं मनुष्याणाम् कारणं बंध मोक्षयोः " असें भगवंतांनीं ह्मटलें आहे. मनानें उत्पन्न केलेलें मोहजाल दुःखास कारण आहे.

## विपरिताचें सुपरीत.

मनाच्या आंगीं सुपरिताचें विपरीत किंवा विपरिताचें सुपरीत भासविण्याच विलक्षण गुण आहे. भगवंतास दुर्योधनाचीं पंचपक्वान्नें गोड न वाटून विदुराच्या कण्याच गोड लागल्या. विदुरभार्या भगवंतास पाहून भक्तिप्रेमभरानें इतका ब्रह्मानंदीं गढून गेली कीं, तिच्या वस्त्राची तिला शुद्ध नाहींशी होऊन ( ब्रह्मानंदीं लागली टाळी कोण देहातें सांभाळी, ) भगवंतास आंतील केळी देऊन आपण साली खाण्याचें भान न राहतां उलट वर्तन केलें. विदुरांनीं तिला सावध केल्यावर अर्थातच भगवंतास केळीं दिलीं. त्यापेक्षां सालीच मला गोड लागत असें भगवान ह्मणाले. तात्पर्य मनानें जें घ्यावें तें सर्वच गोड.

## आदरापेक्षां मरण बरें.

मार्मिक माणसें शत्रूस लज्जित करण्याकरितां खुबीदार वागणूक करितात. आणि शत्रूवर उपकार करून त्याचा आदर करितात. तेव्हां त्या आदरानें शत्रूस आनंद न वाटतां मरणापेक्षां मरण होतें. पांडवांस लज्जित करण्याकरितां घोषयात्रेस आलेल्या कुरुपतीस बांधवांसुद्धां, स्त्रियांसुद्धां, व ऐश्वर्यासुद्धां चित्ररथानें कैद करून नेलें असतां अजातशत्रूनें भीमार्जुनांकडुन गंधर्वांचा पराभव करून कुरुपतीस सोडवून आणिलें, तेव्हां त्या मानी दुर्योधनास त्या आदरापेक्षां गंधर्वांपासून मरण आलें असतें तर बरें झालें असतें असें वाटलें. वीरपत्नि परशुरामभाऊची भार्या आपला पुत्र शत्रूपासून पोषाख घेऊन बंधमुक्त होऊन आलेला पाहून आपल्या विधवा सुनेकडे पाहून ह्मणाली, हिच्याकडे पाहून मला आनंद होतो पण तुला पाहून दुःख वाटतें. कुरुप शेंबडा आपला मुलगा बाबा करून पुढें आला असतां ते बोबडे शब्द " अमृतं बाल

साषणं " होतात. नावडत्या बायकोचें मीठ आपला धर्म सोडतें. ध्रुवाला मातोश्रीच्या प्रमादामुळेंच अढळपद प्राप्त झालें. तात्पर्य मनास गोड तें वाईट असलें तरी चांगलेंच.

## स्वार्थाचा विसर.

मन सदा आपस्वार्थी आहे. पण ह्याला भुलून जाण्याची मोठी संवय आहे. तेणेंकरून हें एखाद्या व्यक्तीच्या किंवा वस्तूच्या नादीं लागलें, कीं आपला स्वार्थ विसरून जातें. आपण कोण, करतों काय, ह्या नादानें होतें आहे काय, ह्याची सुद्धां त्याला शुद्ध नाहींशी होते. मग त्याच्याजवळ जें कांहीं असेल तें सर्व त्या प्यान्या वस्तूस अर्पण करणें हेंच शतकृत्य समजून तें तसें करून कधीं कधीं मोठ्या विपत्तींत व तापांत पडतें. किंवा कधीं कधीं त्याचें कोटकल्याण होऊन मोठा लौकिक किंवा जन्माचें सार्थकही होतें.

## शरीरावर परिणाम.

मनाचा शरीरावर इतका विलक्षण अंमल आहे कीं, शरीराच्या रचनेंत कांहीं बिघाड झाला नसून किंवा कांहीं अपायकारक पदार्थ शरीरांत गेला नसूनही नुसत्या मनाच्या कल्पनेचे सुद्धां बरे वाईट परिणाम शरीरावर होतात. भुतबाधा, करणी, चेटकें ह्यापासून मनुष्यास नुसती पिडाच होऊन राहते असें नाहीं, कधीं कधीं मृत्यु सुद्धां येतो. हे सर्व प्रकार बहुशः खोटे असतात, पण परिणाम खरा घडतो. प्रत्यक्ष स्मशानभूमींत गैरमाहित वाटसरू खुशाल फराळ करून निघून जातो. किंवा रात्रभर खुशाल झोंप घेतो. त्यास कांहीं होत नाहीं. भित्रें मनुष्य नुसतें तेथें गेलें आणि त्याच्या मनानें कचर खाल्ली, कीं तें लागलेंच झंज लागतें. धीट माणूस स्मशानाला भीत नाहीं, त्यास कांहींच होत नाहीं. पण तोच का भ्याला कीं परिणाम घडतो. एक धीट मनुष्य मध्यरात्रीं स्मशानांत पहार पुरून येण्यास, पैज मारून गेला. त्याचें मन तर निर्भय होतें, पण त्याच्या धोतराचा पदर त्या पाहरीखालीं सांपडतांच त्याला वाटलें कीं भुतानें आपल्यास ओढलें, तेव्हां तात्काळ तो बेशुद्ध होऊन मेला. पाल आपल्या पोटांत गेली असें एकाचे मनानें घेतल्यापासून तो झिजुं लागला. शेंकडों औषधें दिलीं पण तो बरा होईना. शेवटीं एका धूर्त मनुष्यानें त्याला ओकारीचें औषध देऊन ओकतांना त्याचे डोळे मिटले, तितक्या अवकाशांत एक मेलेली पाल ओकारींत टाकून ती तुझ्या पोटांतून पडली असें सांगतांच

तो रोगी बरा होऊं लागला. एका जणास पंचमीच्या दिवशीं तूं मरणार असें कोणी सांगितलें होतें. पंचमी उजाडेपर्यंत तो धट्टाकट्टा असून पंचमी आज असें कळतांच अंथरुणास खिळला, मान सुद्धां उचलवेना. षष्ठी उजडतांच पूर्ववत् झाला.

## ग्रह.

मन अति चंचल असल्या कारणानें त्याला कोणत्याही गोष्टीविषयीं किंवा कोणत्याही व्यक्तीविषयीं ग्रह करून घेण्यास अगदींच अवकाश लागत नाहीं. तसा ग्रह त्यानें केला म्हणजे त्याचा विचार मंद होतो, आणि परिस्थिति व भोंवतालच्या माणसांविषयीं, आप्तस्वकीयांविषयीं सुद्धां त्याचे तर्क व अनुमानें त्याच्या ग्रहास अनुसरून तें करूं लागतें. ह्या ग्रहामुळें कधीं कधीं मोठे अनर्थ होतात. पत्रिकेवरून आपला काळ सध्यां उत्तम आहे. असा जर ग्रह झाला, तर आपण कोणचेंही काम हातीं धरलें तरी जयच होईल असें वाटून काम पत्करण्याच्या पूर्वीं अवश्य सावधगिरी व दूरवर विचार राखण्याची उपेक्षा होऊन मसलत अंगावर येते, आणि ग्रहांची अनुकूलता असली तरी लाभांत न्यूनता तरी येते. काल अनिष्ट आहे असा ग्रह झाला तर धैर्य खचून जातें, आणि जिकडे तिकडे प्रतिकूलताच दिसूं लागते, कोणी मनुष्य आपले कडे आला असतां त्याच्या चर्येवरून किंवा त्याच्या पूर्वापार संबंधावरून तो अमक्या कारणास्तव आला, असा ग्रह होतो; आणि त्या कारणाप्रमाणें राग किंवा दुसरा मनोविकार प्रबळ होऊन मनुष्याची वृत्ति तदनुसार होते, आणि वृत्तीस अनुसरून त्या आलेल्या मनुष्याशीं वर्तन होतें. आणि त्याच्या येण्याचा हेतु अनुमानाप्रमाणें नसला म्हणजे भलताच प्रकार होऊन सगळा गोंधळ होतो. आपलीं माणसें आपल्यास धारजिणी असणार नाहींत, किंवा नाहींत, असा ग्रह झाला म्हणजे त्यांच्या वागणुकीसंबंधानें भलतीच समजूत होऊन बसते. त्यांचें सद्वर्तन असलें तरी तें विपरीत वाटूं लागतें. सहज लीला दुर्वर्तनाच्या हेतूच्या वाटूं लागतात. असें अनंत प्रकार कोठवर सांगावे ! सख्खे भाऊ, जिवलग मित्र, फार काय सांगावें प्रत्यक्ष नवराबायको ह्यांच्या मनामध्यें सुद्धां एखादे वेळेस द्वेष किंवा विरुद्ध संबंध कांहीं नसतां वृथाभिमान किंवा अट उत्पन्न होऊन तो माझ्याकडे येत नाहीं, तर माझें तरी काय खोळंबलें आहे ! मला कां अगदीं मानच नाहीं काय ? त्याला इतका ताठा तर मी काय ह्मणून त्याची आर्जव कोडग्यासारखी करूं, असें उभ-

यतांच्या मनांत येतें. खरें पाहिलें तर दोघेही वाट पहात असतात. वाईट हेतु अगर ताठाही नसतो. पण ताठ्याबद्दल ग्रह मात्र उत्पन्न होऊन विपरीत प्रकार घडतात. ह्यासाठीं मनाचा ग्रह होऊं न देतां प्रत्येक गोष्ट प्रत्येक प्रसंगीं पूर्ण विचारपूर्वक करावी.

## मनोमनसाक्ष.

सर्वांतर्यामीं आत्मा एकच आहे, यामुळें आपल्या मनांत बरें वाईट दुसऱ्याविषयीं आलें तर लागलेंच आपल्याविषयींही त्याच्या मनांत तसेंच येतें. सावकार व राजा ह्याचा अकृत्रिम स्नेह होता. एके दिवशीं सावकाराच्या मनांत सहज आलें कीं, आपल्यापाशीं चंदनाचीं लांकडें पडलीं आहेत, त्याचा खप राजा मरेल तेव्हां होईल, त्याखेरीज गिऱ्हाईक कोठलें ? इकडे लागलेंच राजासही असें वाटलें कीं आपल्याला पैसा पाहिजे आहे, त्यापेक्षां त्या सावकारास लुटावें. याप्रमाणें परस्परांस दुर्बुद्धीचा स्पर्श मात्र झाला पण लागलाच त्यांच स्नेह पुनः जागृत झाला आणि विष्णवेनमः ह्मणून ते मोकळे झाले. गोगल गायींचें तादात्म करून त्यांतील गायी निरनिराळ्या स्थळीं ठेविल्या ह्मणजे एक जशी हालते तशीच दुसरी हालते ह्मणून त्यांच्या चलनवलनावर अक्षरें ठरवून त्यावरून तारायंत्राप्रमाणें बातमी देण्याची योजना करितां येतें असें एकदां वाचलें आहे. त्यावरून मनोमय साक्षीची समजूत खरी वाटते.

## अघात प्रत्याघात.

मन कोणासही दिसत नाहीं, पण त्याचा परिणाम शरीरावर घडतो. त्यामुळें चर्या, स्वर, व अन्य चेष्टितें ह्यांवरून मनांत काय आहे ह्याचा बोध होतो. स्त्रीमुखाकडे पुरुषाचें अवलोकन सत् किंवा असत् हेतूनें होईल ह्मणजे पुरुषाकडून ज्याप्रकारचा अघात होईल त्याचेंच प्रत्युत्तराचा प्रत्याघात स्त्रीकडुन होतो. पवित्र ममतेनें बापानें किंवा भावानें पाहिलें तर लेकीस किंवा बहिणीस हास्य उत्पन्न होऊन ममता वाढते. नवऱ्यानें पाहिलें असतां प्रीति उत्पन्न होऊन नेत्रकटाक्षानें प्रत्युत्तर मिळतें. परक्यानें दुष्ट हेतूनें पाहिलें तर तिरस्कार आणि तोंड फिरवणें होतें व राग येतो. चर्या, स्वर व इतर चेष्टितें ह्यांचेंही असेच पुष्कळ प्रकार आहेत. त्यांवरून मनांत चाललेले सर्व व्यापार चतुर माणसांस ताडतां येतात.

# भाग ९.

## वैभव नाशकारक आहे.

### श्लोक.

अनित्यानि शरीराणि वैभवानि न शाश्वतं ॥
सदा हि सन्निहिते मृत्युः कर्तव्यं धर्मसंग्रहः ॥

सु. भा.

## इंद्रपद हिंदुस्थान.

भस्मासुर वधार्थ मोहनीरूप धारण करून भगवान आले, तेव्हां तो जसा भुलून त्यांच्यामागें नाचूं लागला त्याप्रमाणें सत्तारूप मोहिनी जनतेचा विध्वंस करण्यास ह्या भूमंडळावर येऊन नृत्य करीत आहे. ती आपल्यास प्राप्त व्हावी ह्मणून बहुतेक प्राणी तिच्या मागें लागले आहेत. सुंदोपसुंद ह्या दैत्यांनीं तिलोत्तमेकरितां आपलें अकृत्रिम आणि अप्रतिम बंधुप्रेम विसरून एकमेकांच्या गदाप्रहारांनीं प्राण सोडिले. तिलोत्तमा कोणासही मिळाली नाहीं ती नाहींच. त्याप्रमाणें सत्तामोहिनी करितां कृतयुगापासून देवादैत्यांचा कलह होतां होतां दैत्य निर्मूळ झाले, पण इंद्रपद त्यांस लाभलें नाहीं तें नाहींच. हल्लींच्या युगांत राज्यतृष्णेनें व्याकूल होऊन प्रबल झालेलीं राष्ट्रं दुर्बलांवर धाडी घालीत आलीं आहेत. ह्या क्रमानें मुसलमान, रोमन, ग्रीक, स्पानियड्स, पोर्चुगिज वगैरे पुष्कळ राष्ट्रांनीं त्या सत्तामोहिनीच्या मागें नृत्य करून सुंदोपसुंदाप्रमाणें आपला व आपल्या शत्रूंचा चुराडा करून घेतला. शेवटीं सत्ता तिलोत्तमा नाहीं ती नाहींच. आपण मात्र दुर्बल झालों. पूर्वींच्या इंद्रपदाच्या ठिकाणीं सध्या हिंदुस्थान झालें आहे. वैभवाचें शिखर ह्मणजे हिंदुस्थानाची सत्ता होय. जें जें राष्ट्र प्रबळ होतें तें तें हिंदुस्थानावर धाव घेतें. सध्यां इंग्रजलोक ह्या इंद्रपदाच्या रक्षणाकरितां व रशियन त्याच्या भक्षणाकरितां गदा घेऊन सुंदोपसुंदाप्रमाणें उभे आहेत. ह्यांच्या झुंजांत किती लक्ष मानवांची आहुति देण्याची ईश्वरीयोजना असेल व शेवटीं हिंदुस्थानरूप तिलोत्तमा कोणाच्या हातीं लागणार किंवा काय गति होणार तेंही प्रभूचें प्रभूलाच ठाऊक.

## चीन. तिलोत्तमा.

मांसखंड मुखांत धारण करून उडणाऱ्या कावळ्याच्या मागें पुष्कळ कावळे लागून त्याला बेजार करितात. त्याप्रमाणें चाळीस कोटी प्रजेचा चीन देश हें मांसखंड चीनच्या बादशाहाच्या मुखांत असलेलें पाहून पृथ्वीवरील प्रबल असलेलें सर्व पांढरे कावळे त्याच्या मागें गोळा झाले आहेत. त्याचा पाठिराखा जपान हंस त्याच्या रक्षणार्थ नाना प्रयत्न करीत आहे. भूतलावर यादव कुलाचा फार भार झाला तो नाहींसा करण्याकरितां त्यांचा फडशा त्यांच्याच हातानें केला तोच प्रकार ह्या मानवी महासागरावर (चिनावर) गोऱ्या कावळ्यांस सोडुन काण्याची भगवंताची योजना आहे कीं काय, असा तर्क सहज होतो. पुढलें कोणास कळणार. पण इतकें खास कीं थोडयाच वर्षांत चीनरूप तिलोत्तमेच्या पायावर काळ्या, पांढऱ्या व पिंवळ्या नरशीर कमलाच्या पुष्कळशा लखोल्या पडणार. सध्याच रशियन आणि जपानी ह्यांच्या रक्ताच्या नद्या वाहत आहेत.

## आत्मघात.

शिव ! शिव ! मनुष्यासारख्या ज्ञानवान प्राण्यांनीं आपल्याच हातांनीं आपले गळे कापावे हें किती तरी नीच व शर्मेचें कृत्य आहे ! पशू, पक्षी किंवा वृक्ष, पाषाण यांना वाचा असती तर त्यांनीं सुद्धां ह्या सत्तालोभानें बेशुद्ध झालेल्या द्विपद पशूंची फटफजिती करून आपल्याहीपेक्षां ह्याला नीचतम मानिलें असतें. मोठा चमत्कार हा कीं असल्या लाजिरवाण्या कृत्यास पराक्रम असें नांव देऊन त्याचे पोवाडेही माणसें गातात. त्याचे इतिहास लिहून त्यांचीं पारायणें करितात. रानट्यापेक्षां लक्षपट हत्या आणि परपीडा करून पुनः सुधारलेले विद्याचारसंपन्न म्हणवितात. भूतलावर क्षमा, दया, शांति प्रभृति शेंकडों सद्गुणांची वृद्धि होऊन भूतल केवळ आनंदवन होऊन त्यांत प्राणिमात्राचा विहारस्वानंद परिपूर्ण व्हावा, त्यांनीं आपल्यास ओळखून आपल्यास अनन्यभावें शरण येऊन आपल्यांशीं एकरूप होऊन जावें ह्मणून ह्या एकट्याच प्राण्यास परमेश्वरानें ज्ञान दिलें. त्याचा सत्यनाश करून माणसें आपल्या हातानें आपला घात करून घेऊन नरकांत जाण्याची वाट सुधारीत आहेत. मानवाची अशी दैना करणारी भगवन्माया आणि कविराज यांची धन्य आहे.

## द्रव्यलोभ.

राष्ट्र ह्मणजे व्यक्तिसमुदाय. अर्थातच राष्ट्राचे गुण तेच व्यक्तींत असतात. एक राष्ट्र दुसऱ्या राष्ट्रावर टपलेलें असतें आणि माणूस दुसऱ्या माणसावर टपलेलें असतें. दुसरा गाफील राहील केव्हां आणि मी त्यास लुटीन केव्हां हा प्रयत्न व्यक्ति करीत असतात. धनदौलत, अधिकार आणि भूमि ह्यांजवर सत्ता मिळविण्याकरितां रात्रंदिवस माणसें झटत आहेत. ह्मणजे सत्तारूप मोहिनीच्या मागें नाचत आहेत. द्रव्य पाहिलें कीं मन द्रवत नाहीं असा मनुष्य फार क्वचित! द्रव्याण्यापुढें कोणाचें महात्म्य नाहीं. द्रव्याकरितां पोटचें पोर किंवा जन्मदाता बाप ह्यांचाही घात करण्यास मनुष्य तयार होतें. राज्येचीं राज्यें फितुरानें बुडालीं आहेत. असांस द्रव्याची लालुच दाखवून पोलीस लोक बंडाळी करणारास कसें पकडतात हें सर्वश्रुतच आहे.

### आर्या.

**मोठा लोभ जनाला कलिरायाच्या युगांत कनकाचा ॥**
**तैसा दार सुताचा व बंधूचा जननीचा व जनकाचा ॥ १ ॥**

—असो. ह्या बाबतींत जितकें लिहावें, जितक्या खटपटी व लटपटी उघडकीस आणाव्या तितक्या थोडयाच. त्यांच्या विवेचनांचें एक पुस्तकच होईल. ह्मणून ती दिशा सोडून वैभवाचे परिणाम कसकसें होतात ह्याचा विचार करूं.

### संपत्तीचा परिणाम विपत्ति.

मनुष्याच्या शरीररचनेवरून, त्याच्या स्वभावावरून, त्याच्या वागणुकीच्या परिणामावरून असें अनुमान होतें कीं, त्यास जों जों संपन्नता प्राप्त होते, तों तों तो आळशी, शिथिल, बेफिकीर, व नामर्द होऊन आपलें अकल्याण करून घेतो. जसजशी अडचण, विपत्ति आणि दगदग त्यास पडेल, तसतसा तो युक्तिवान, उद्योगी आणि सशक्त होऊन पाहिजे तें काम करण्यास पटाईत होतो. ह्यामुळें एक सिद्धांतच ठरल्यासारखा आहे कीं, संपन्न व सुखी देशांतील वस्ती हलगर्जी, निरुद्योगी आणि अडाणी असावयाचीच. त्या योगानें तिला दारिद्र्य व परतंत्रता यावयाचीच. नापीक आणि हवापाण्याचा त्रास असलेल्या देशांतील उद्योगी, कंटक व बळकट लोक वर लिहिलेल्या सुपीक देशांत जाऊन तेथील अनुकूल स्थितीचा फायदा घेऊन तेथें सुसंपन्न होऊन तेथील गेदी मूळरहिवाशांवर अंमल करावयाचेच. आपल्या भरतभूमी-

मध्यें हीं स्थित्यंतरें सदासार्वकाल होत आलीं आहेत. आर्यलोक अन्य स्थळाहून येथें येऊन सुसंपन्न होऊन ऐश्वर्य मोगिते झाले. हळू हळू सुखी आईबापांची परंपरा वाढतां वाढतां त्यांच्या वंशांच्या अंगीं वर लिहिलेले संपन्न परिस्थितीचे परिणाम उत्पन्न होऊन ते बुडत्या मार्गास लागले. पहाड पर्वतांतील भिकार मुलखांतून कटाक्ष मुसलमान लोक इकडे येऊन विद्याचारसंपन्न होऊन राज्यलक्ष्मीचे अधिकारी अमीरउमराव झाले. पुनः गरल सहोदरी लक्ष्मी हिनें त्यांजवर सुसंपन्न परिस्थितीचें दुष्परिणाम घडवून त्यांस कैफी, बदफैली, मिजाशी आणि अव्यवस्थित केलें. त्यांच्या उद्यानें व त्यांजकडे सगळ्या द्रव्याचा आणि अधिकाराचा ओघ गेल्यामुळें आर्यांच्या वंशजांचा वैभवरोग दारिद्र्यांजनानें पार नाहींसा झाला. पुनः तें जागृत होऊन आपल्या नैसर्गिक गुणांनीं मंडित झाले. त्यांनीं गेलेली सत्ता हिसकावून घेतली. पुनः राज्यलक्ष्मीनें त्यांच्या गळ्यांत माळ घातली. अशीं सुमारें दोनशें वर्षें गेलीं. पुनः हिऱ्यांच्या पोटीं गारगोट्या उत्पन्न झाल्या. पुनः शैथिल्य वाढलें. कर्तबगारी गेली. रान मोकळें दिसल्याबरोबर नापीक देशांतील व्यापारी हळूच शिरून आर्यलोक रानटी, कुचकामाचे, नाहींतसे झाले आहेत. आपण होतों कोण, आणि झालों आह्मी कोण ह्मणून पुनः त्यांस वाईट वाटूं लागलें आहे. तत्पर्य ऐश्वर्य दिसण्यांत जरी चांगलें दिसतें, तरी तें दुर्विपाक आहे. भरतीच्या मागें ओहटी तशी वैभवाच्या मागें विपत्ति ठेवलेलीच आहे.

## कोंकणस्थ.

देशांतील निरनिराळ्या भागांविषयीं सुद्धां असाच अनुभव आहे. या इलाख्यांत सगळ्यांत कमी उत्पन्नाची आणि कमी क्षेत्राची जमीन रत्नागिरी जिल्ह्याची आहे, त्यामुळें कोंकणांतील माणसें सगळ्या इलाख्यांतील माणसांपेक्षां तरतरीत, कष्टाळू, चपल, बुद्धिवान् आणि पाहिजे तें काम करण्यास तयार व पटाईत आहेत. तिकडील आणि इकडील जनावरांत सुद्धां असाच फरक आहे. इकडील सर्पांपेक्षां तिकडील सर्पांमध्यें सामर्थ्य ह्मणजे विष प्रखर. वाघ पाहतांच इकडील गाई, बैल घाबरून पडतात पण तिकडील गाई, बैल तितके भीत नाहींत. वाघ्रु आलें तर त्याच्याशीं थोडा तरी सामना देतात. चार पांच पिढ्या ह्या संपन्नदेशीं मुलुखांत राहिलेले कोंकणस्थ आणि कोंकणांतून येणारे ताजे कोंकणस्थ ह्यांजमधील पाण्यांतही मोठें अंतर असतें.

## कोंबड्यास रत्न.

खेड, पुरंदर इत्यादि तालुक्यांत जमिनीचा तोटा असून भिमथडी, इंदापूर तालुक्यांत त्या विपुल आहेत. आणि मगदुराला फार ज्यास्ती आहेत. एकेका कुळास पुष्कळ एकर जमीन आहे. पण संपन्न तालुक्यांतील रयत सदा निरुद्योगी, दरिद्री आणि कमी जमिनीच्या प्रांतांतील रयत हुषार, कष्टाळू आणि सुखी आहे. सरकारानें भिमथडी तालुक्यांत कालवा नला पण कोंबड्याला रत्न म्हणतात तसा प्रकार तेथील गेंदी लोकांचा पहिल्यानें होऊन पुरंदर तालुक्यांतील व दुसरीकडील उद्योगी लोक तेथें जाऊन गबर झाले.

वाक्चक्षुः श्रोत्रलय लक्ष्मीः कुरुते नरस्य को दोषः ।
गरल सहोदर जाता न मारयति यत्र तच्चित्र यश्रि ॥१॥

## मिजास व ताठा.

वैभव सुखकर वाटतें खरें, पण ज्या गरीब मनुष्याला तें प्राप्त होतें त्याचतें प्राप्त होण्याच्या वेळची स्थिति आणि प्राप्त झाल्यानंतर बरेच दिवस गेल्यावरची स्थिति ह्यांची तुलना करून पाहिली असतां असें दिसून येतें कीं, त्याचें शरीरसामर्थ्य फार कमी झालें. त्याच्या आंगांतील चपलता व तरतरीतपणा नष्ट होऊन जडत्व आणि शैथिल्य शिरलें. तो पुष्कळ परावलंबी झाला. त्याच्या डोकीवरील केर काढण्यास सुद्धां त्याला लाज वाटूं लागली. तो मिजासखोर म्हणजे आळशी झाला. त्याला अन्न पचेनासें झालें, मेधोवृद्धि झाली. लहान लहान रोगांनीं त्याच्या शरिरांत प्रवेश केला. त्याला गर्वानें पछाडिलें. त्याला दुसरीं माणसें कस्पटाप्रमाणें वाटूं लागलीं. तो पूर्वपार विसरून गेला. पूजार्ह माणसांशीं नम्रता ठेवण्याचें भान त्यास राहिलें नाहीं. वैभवरोगानें त्याचे कान गेले, डोळे गेले, सारासार विचारही गेला. द्रव्योन्माद हाच दुर्व्यसनांचा जनक आहे. आणि दुर्गति त्या दुर्व्यसनाची कन्या आहे. गर्वाचें घर सदा खालीं आहे. गर्व परमेश्वराला मुळींच आवडत नाहीं. ज्याला गर्व होतो तो फशी पडणार असें समजावें. सत्यभामा, बलराम, मारुती, गरुड, भीम आणि अर्जुन अशा निस्सीम प्रेमांतील माणसांचा सुद्धां गर्व सहन झाला नाहीं. मग वरकडांची काय कथा ! आपल्या नांवावर पाषाण तरले असा गर्व श्रीरामचंद्रास एकदां शिवला तोहि टिकला नाहीं. एकीकडे जाऊन एक खडा पाण्यांत टाकून पाहिला तो लागलाच बुडाला. परमेश्वराला गर्व सोसत नाहीं ही समजूत अभाविकास पटत

नाहीं म्हणून एकीकडे ठेविली, तरी युक्तीनें सुद्धां असेंच ठरतें कीं, गर्वामुळें मनुष्याचा सावधपणा व दक्षता कमी होते, यामुळें दुर्लक्ष वाढून त्याच्या प्रयत्नांत कमीपणा वाढत जातो, आणि त्याचा उन्माद त्याच्या शत्रूला व इतर लोकांस दुस्सह होतो, यामुळें त्याचाही प्रयत्न त्या गर्विष्टास खालीं पडण्याचा होतो. अर्थात्च त्याच्यावर अनेक संकटें उत्पन्न होतात, आणि तो गाफिल असल्यामुळें नाश होतो. सोनपत येथील भयंकर नाशास भाऊ साहेबांचा गर्वच कारण झाला.

## स्वास्थ्य घातक आहे.

देशाचा प्रकार तसाच आईबापाच्या श्रीमंतीचा आहे, हें वर्म पेशवाईंतील कर्त्या पुरुषांस माहित होतें. त्यावेळीं चालता काळ असतां त्या वेळच्या लोकांनीं स्वास्थ्य संपादन करण्याची तजवीज केली नाहीं. करते तर त्यांस सहज मिळालें असतें ह्मणून त्यांचेंच अपराक्रमी बायकोचे वंशज त्यास दोष देत असतात. इनामें, वर्षासनें भटाभिक्षुकांनीं घ्यावीं,तरवार बहादर किंवा कलमबहादूर यांनीं तीं घेणें भागूबाईपणाचें आहे. वंशजाकरितां बेगमी करून ठेवणें ह्मणजे त्यांस पोषे आणि नेभळे बनविणें आहे असें ते मानीत. मुलांनीं पराक्रम गाजवावा आणि वैभव मिळवावें. आयत्या पिठावर रेघोट्या ओढूं नयेत असें ते ह्मणत असत. त्यांचेंच ह्मणणें खरें त्यांची समजूत आपणा दुर्भाग्य लोकांस सकृत्दर्शनीं चुकीची वाटेल, पण पुढें आपण इतके अभागी होऊं असें त्यांस स्वप्न पडलें नव्हतें. तेंही असो. पण कोणाच्या तरी कारणानें जहागिरी, सरंजाम, इनामगांवें ज्यांस मिळालीं आहेत त्यांची स्थिति नीट विचार करून पहा म्हणजे त्यांस पोषे आणि नेभळे बनविणें हें त्यांचें ह्मणणें अगदीं बरोबर होतें असाच तुमचा सिद्धांत ठरेल.

## उत्पन्नदारांची दुर्दशा.

पेशवाईंतील उत्पन्नदारांपैकीं जहागिरी जप्तीस व विक्रीस पात्र नाहींत म्हणून सरकारनें ठरविलें आहे. म्हणून त्या वाचल्या आहेत. जीं इनामें व दुसरीं उत्पन्नें स्वत्वनिवृत्ति करण्याजोगी होतीं, त्यांपैकीं आज मितीला संपादकांच्या वंशजांच्या ताब्यांत किती आहेत, ह्याचा तपास केला तर शेंकडावळ किती बसेल पहा. जीं उत्पन्नें राहिलीं आहेत त्यांतून ऋणकोहूनें मासल्याशिवाय किती आहेत, त्याचाही हिशेब पहा. उत्पन्नदाराच्या पोटीं आल्यामुळें बनलेल्या

प्रतिसाहेबांपैकीं किती लोक हुशार, कार्यदक्ष, विद्वान, निर्व्यसनी व उद्योगी आहेत पहा. थोडक्यांत इतकेंच पहा कीं, ज्या उत्पन्नाच्या जीवावर ते साहेब म्हणवितात तें नाहींसें झालें तर त्यांची स्थिति कशी होईल ? आपला चरितार्थ चालविण्यास ते कोणचें काम करण्यास योग्य ठरतील. अर्थात् अगदींच हलकें, पण तें करण्यास लागणारें सामर्थ्य त्यांच्या आंगीं आहे काय ? इतका परिणाम त्यांच्यावर त्या उत्पन्नाचाच झाला कीं नाहीं ? त्यांस वडिलांनीं हें विघ्न करून ठेविलें नसतें तर उत्पन्नदार नसलेलीं कोट्यानुकोटी माणसें आपल्यापरी उद्योग धंदे करून दोन पैसे मिळवून आनंदानें चरितार्थ करून असतात. त्याप्रमाणें त्यांना राहतां आलें नसतें काय ? ह्या उत्पन्नाच्या वतनदारीच्या हरळीच्या मुळीला लगटून राहिल्यामुळें कुळकर्णी वगैरे वतनदार लोक दुर्दैवाचे आणि दारिद्र्याचे पुतळे बनून काळ काढीत आहेत.

## सांसर्गिकांचा नाश.

पशवाईंत पैशाच्या आणि सोन्याच्या राशी मुलांकरितां ठेऊन गेलेल्या आई-बापांचीं लेंकरें तर लागलीच दुर्व्यसनांत पडून कफल्लक होऊन धुळीचे दिवे लात गेलीं. हजारांतून एखादा आजोबाचे पैसे पाळून असेल कीं नाहीं ह्याची सुद्धां भ्रांतीच आहे. पूर्वज संचित–द्रव्य–विषाचा परिणाम नुसता त्यांच्या वंशजांवर झाला आहे असें नाहीं. त्यांच्या सांसर्गिकावर सुद्धां झाला आहे. जहागिरदार यांत विशेषेंकरून मराठे जहागिरदार ह्यांचे आप्त, सोयरे, मेव्हणे, मामा इत्यादिक मानकरी यांच्या स्थितीची बारकाईनें चौकशी केली असतां असें दिसून येतें कीं, त्यांस पाण्यासारखे पैसे त्यांच्या बहिणी वगैरेंच्या द्वारें प्राप्त होतात. कच्चे खर्च व नेमणुका दरबारांतून असतात. पण चमत्कार असा होतो कीं, ते अमली, दुर्व्यसनी, व्यवहारशून्य होऊन शेवटीं कर्जबाजारी होतात. बहिणीचा, आतेचा किंवा मावशीचा वसिला संपून ते आपल्या गांवीं आल्या-वर आढावा पहावा तर आळवण्याबरोबर तळवणी गेलें. नवीन वतनदारी मिळ-विण्याजोगें पैसे मिळाले पण नवी तर नाहींच कमाविली, पण वडिलांचा तुकडा होता तोही धुंदींत गहाण पडून शेवटीं गेला. बरोबर फक्त दुर्व्यसनें आणि वाईट सवयी आल्या. परावलंब करण्याचें साधन नसल्याकारणानें जे त्यांचे भाऊबंद आपल्या उद्योगकल्पतरूस पाणी घालीत राहिले, तेच त्या राजाश्रितांपेक्षां सुखी. तात्पर्य धन आणि वैभव दुर्विपाकी आहे.

दीक्षिताच्या वंशांतील दीक्षिताप्रमाणें, साहेबाच्या ( बढ्या बापाच्या )

पोटीं आले ह्मणून झालेले साहेब आणि त्यांच्याच आश्रयानें निर्वाह करून स्वकष्टानें विद्या संपादन करून रावसाहेब व रावबहादूर किंवा आनरेबल होऊन लक्षाधीश बनून झालेले साहेब ह्यांमधील जमीनअस्मानाइतकें अंतर कोणासही कळण्याजोगें आहे. तात्पर्य स्वतःश्रम करून मिळविलेल्या पैशाखेरीज आपोआप जो पैसा मिळतो तो परिणामी नाश केल्यावांचून रहात नाहीं.

## हिशेब.

धनवैभव सुखकर दिसतें, पण तें संपादन करण्यास काय काय करावें लागतें, किती दुष्कर्मे घडतात, किती श्रम पडतात, जीवावरील धाडसें किती करावीं लागतात त्यांचा अनुभव मूर्तिमंत सर्वांच्या पुढें आहेच. तेव्हां त्याचें वर्णन करीत नाहीं. धनवैभवापासून भासणारें सुख आणि तें मिळविण्याकरितां झालेले आयास व पापाची जोड ह्यांचा विचार करण्याचें कोणाचे मनांत येत नाहीं. सर्व लोक-सत्तामोहिनीच्या मागें नाचत आहेत म्हणून ठीक आहे. वर लिहिल्याप्रमाणें हिशेब केला तर धनवैभवाचें सुख बाकी उरेल कीं नाहीं याची वानवाच आहे.

## धनवैभवत्रिताप.

धनवैभव मिळण्यास मात्र आयास पडुन त्याचा उपयोग निर्वेध आणि चिरस्थाई असता तर असो पण तसेंही नाहीं. तें मिळविण्यास लागणाऱ्या शहाणपणापेक्षां तें रक्षण करण्यास जास्ती शहाणपण लागतें. काळजीचे व दक्षतेचे डोंगर तर विचारूंच नयेत. धनवानास सुखाची झोंप येत नाहीं. आणि राज्यादिक वैभववानास तर दिवसासुद्धां समुद्रवलयांकित पृथ्वीवर पहारा करीत बसावें लागतें. हेर ठेवावे लागतात. कोणच्या वेळेस कोणीकडून धाड येईल ह्याचा मुळींच नेम नसतो. एका खोलीचा बंदोबस्त ठेवण्यास सामान्य धनवानास किती तरी त्रास पडतो. मग दोन्ही गोलार्धांचा बंदोबस्त बाहेरून येणाऱ्या शत्रूविरुद्ध व राज्यांतील फंद, फितूर, बंडाळ्या आणि अराजक भक्त ह्यांचे अवचित येणारे मारे त्यांच्याविरुद्ध बंदोबस्त ठेवणें, त्या सर्वांची काळजी वाहणें; किती कष्टप्रद असेल ह्याचा विचार करावा. बरें इतकें करूनही धनवैभव चिरस्थाई कोठें आहे? कालचक्र फिरलें उर तें एका क्षणांत निघून जातें. थोड्याच महिन्यांत फ्रान्स देशाच्या बादशहास राजलक्ष्मीस मुकून परदेशांत जाऊन रहावें लागलें. एका शतकांत वीस राजे मारेकऱ्याच्या हस्तें कुतऱ्याच्या मोतीनें मेले गेले. सारांश. धनवैभव मिळविण्यास

व राखण्यास कष्ट आणि शेवटी तोंडांत मारून गेलें म्हणजे जन्मभर कष्ट होणारें आहे.

---

# भाग १०.

## संसारदुःखाचें सरण.

### श्लोक.

दुःखांगारक तीव्रः संसारोयं महानसो गहनः ॥
इह विषयामृत लालस मानस मार्जारमा निपत ॥ १ ॥

सु.

## लक्ष्मी चांचल्य.

वसंतकाळ वर्षभर राहत नाहीं. माध्यान्हीं रवि सगळा दिवस असत नाहीं. त्याप्रमाणें धन, यौवन आणि सद्दी सदादिन टिकत नाहींत. महाविष्णुसारखा भर्ता, आणि वैकुंठासारखें विलासस्थान आहे, तथापि तेथें चैन पडत नाहीं! असली ही चपला लक्ष्मी, त्रैलोक्यांत संचार करीत आहे. आज एकाला हरबऱ्याच्या झाडावर चढवावें, उद्यां उतरून टाकावें असा हिचा नित्यक्रम आहे. आर्य, यवन, आरब मिस्त्री, ग्रीक, रोमन, पोर्तुगीज स्पानिअर्डस बलंदेजी, ह्या सर्वांस हिनें एकदां हरबऱ्याच्या झाडावर चढविलें होतें; त्यांस झुकांडी देऊन हल्लीं तिनें आपलें मोहनास्त्र युरोपांतील बडीं राष्ट्रें, अमेरिकेंतील लोक, आणि जपानी, ह्यांजवर टाकून त्यांस आपल्या मुरलीनें गुंग करून आपल्या नादानें नाचण्यास लाविलें आहे. हिच्या यजमानानीं मोहनीरूप नटून भस्मासुराला ज्याप्रमाणें आपल्याच डोक्यावर हात ठेवावयास लावून त्याचेंच भस्म करून टाकिलें, त्याप्रमाणें ह्या द्रव्यानें मदांध झालेल्या राष्ट्रांस त्यांच्याच हातानें ही गरल सहोदरी केव्हां नष्ट करील, आणि पुढें कोणावर पाखर घालील ह्याचा मुळींच नेम नाहीं. बीज दिसलें न दिसलें तोंच नाहींशी होते, त्याप्रमाणें ही चंचला मागें झाली असें वाटल्याबरोबरच नाहींशी होते.

## धुंदीचा निरस.

सारासार विचार, आत्मसंयमन, मितव्यय आणि सदाचार ह्या चार शिपायांचा खडा पाहरा लक्ष्मीवर राहील, तर ही कांहीं वेळ तरी टिकते, तसा पाहरा न ठेवितां हिला विषयवासनेबरोबर व उधळेपणाबरोबर कां क्रीडा करूं दिली, कीं ही गेलीच समजावें. जीवराजास पूर्व-पुण्याईनें म्हणा, परमेश्वराच्या कृपेनें म्हणा, किंवा वडिलांच्या आशीर्वादानें म्हणा, हिचा प्रसाद झाला होता, त्यामुळें त्याला स्वर्ग ठेंगणा वाटूं लागला, पण ही धुंदी फार वेळ टिकली नाहीं. दैवदुर्विलासास्तव व राजाच्या मनांत निष्कारण संशय संचरला. राज्य पालथें घालण्याकरितां राजास विषप्रयोग करण्याच्या कटाचे पुढारी रावसाहेब (जीवराज) आहेत, ह्या संशय पिशाचानें राजाचें मन पक्कें घेरलें. रावसाहेबांवर इतराजी झाली. मग काय उशीर, "राजा बोले दळ हाले," रावसाहेबांच्या किंवा शहरांतील कोणत्याही मनुष्याच्या ध्यानीं मनीं नसतां, रावसाहेब निजलेले आहेत तोंच काळसर्पाच्या जिव्हांप्रमाणें लखलखणाऱ्या नग्न तरवारीच्या फौजेचा वेढा घराला पडला; कृतांत कटकाधिपतीच काय, असे सरकारी अमलदार घरांत शिरून जप्ती करून रावसाहेबांस घेऊन चालले. जे शिपुरडे रावसाहेबांस पाहतांच लवून सलाम करीत, पोस्ताकरितां हात पसरीत, तेच उद्दामपणें रावसाहेबांस दुरुत्तरें बोलून, घेऊन चालले. रावसाहेबांचे येथें जाफतीस येऊन खुष होणारे, त्यांच्या गाड्या घोडे सत्तेनें लागेल तेव्हां मागून नेणारे, अंमलदार, पूर्वसंबंध एकदम विसरून, हलकट बंडखोराप्रमाणें रावसाहेबांस वागवूं लागले. एका क्षणांत:-"वित्तंच गेहे परावश्य गोष्ठ भार्या गृह द्वारि जनः स्व गेहे." असा प्रसंग येऊन रावसाहेब आपल्या दैवगतीच्या अनुरोधानें यमकिंकररूपी अंमलदारांबरोबर चालले ! हर हर ! ! ऐश्वर्याचा भ्रम किती हो मिथ्या आहे ! एका क्षणापूर्वीं ज्याचें वैभव राजाच्या बरोबरीचें होतें, तोच प्राणी एका क्षणांत कंगालाहून कंगाल झाला ! अत्यंत दरिद्रि मनुष्यास असणारें स्वातंत्र्यसुख सुद्धां बिचाऱ्यास नाहींसें झालें ! ज्याला उन्हाचा कवडसासुद्धां सहन होत नव्हता, पराच्या गाद्या गिर्द्याखेरीज झोंप येत नव्हती, त्याला कारागृहांत रकट्यावर पडण्याचा प्रसंग आला ! चांदीच्या भांड्याखेरीज अन्य धातूंचा ज्याच्या अधरास कधीं स्पर्श झाला नव्हता, त्याला मृण्मय-पात्रानें पाणी पिण्याचा समय येऊन पोहोंचला ! ज्याच्या सेवेस दासदासी सदैव असावयाच्या त्याला स्वहस्तें पाक करण्याची पाळी आली ! शिव शिव ! जन्मांत सदैव

नसल्यावर पाक व्हावा कसा ? घरांत कोठें लांब जरी धूर दिसला तरी ज्याचें मस्तक चढून डोळ्यास धारा लागून गंगा यमुनेचा संगम व्हावयाचा, त्यानें धुराचे लोट सोसून जाळ करून स्वयंपाक करावा ? असो. अशा दुर्धर यातना त्यांजवर कोसळल्या, श्रीसत्यनारायणाच्या कोपानें साधु महाजनास, आणि शनि राजाच्या वक्रनें राजा विक्रमास दुर्दशा प्राप्त झाली तसा प्रकार झाला. कालेंकरून सरकारच्या मनाची बाधा दूर होऊन पश्चात्तार होऊन रावसाहेबांची मुक्तता झाली सर्व देशांस आनंदाचा दिवस उगवला.

## ऋण प्रवेश.

कारागृहांत यजमान गेल्यावर परिवाराच्या, आल्यागेल्याच्या खर्चाकरितां आणि यजमानाच्या सुटकेकरितां, जवळ होता तितका पैसा खर्च झाला. " गेल्याचें धर " म्हणतात त्याप्रमाणें ज्याचे हातीं जें लागेल, तें त्यानें गुंडाळलें. लोकांकडे हजारों रुपये येणें होतें, त्यांस फांवलें. तशांत दुष्काळ आणि ग्रंथिक सन्निपात ह्यांचा कहर लागोपाठ मागें लागला. दार ते नादार झाले, सर्व व्यापार जागच्या जागीं नाहींसा झाला. पैसा नाहींसा झाला. खर्च कमी करतां येईना , तेव्हां उसनवारी सुरू झाली. पहिल्या पहिल्यानें लोकांनीं शब्द झेलले; पण पैसे परत जाण्यास विलंब लागूं लागला तेव्हां आखडलें. मग सर्व अपायांचा पाया जें कर्ज, तें घरांत शिरलें, आणि त्या लक्षाधिशाभोंवतीं आपलें जाळें पसरूं लागलें. पुढें तेंही मिळेना, दिलेलें परत मागण्याचीं बोलणीं हळूं हळूं येऊं लागून शेवटीं तगाद्यावर मजल येऊ ठेपली, तेव्हां सोनें गहाण टाकून त्रास मिटवावा लागला.

## खांद्याखालीं पदर.

इतकें झालें तेव्हां हळू हळू नोकर चाकर कमी केले. घरचीं कामें घरच्या माणसांनींच करण्याचा प्रसंग आला. मिजास नाहींशी झाली. वस्त्रें, प्रावरणें, जेवणखाण बेताबाताचें साधें होऊं लागलें. हें पाहून सुखाचे सोबती, भोजनभाऊ, पाय काढून चालते झाले. फारच निगरगट होते, त्यांस तर जा म्हणावें लागलें. ( हा प्रसंग मरणापेक्षां सुद्धां घरंदाज पिढीजाद्या गृहस्थांस जास्त क्लेश देतो ) . होतां होतां खासगत माणसें सुद्धां जड वाटूं लागलीं, तोंड धरून बुक्याचा मार सुरू झाला. पंचप्राण मानलेले पांच पुत्र, ह्यांस सुद्धा, बाबानों, आतां तुम्ही आपली सोय पहा, असें म्हणावें लागलें. हे शब्द उच्चारतांना असें

वाटलें कीं, हे शब्द उच्चारण्यापूर्वी ही जिव्हा गळून पडती तरी बरें झालें असतें! इतकें केलें पण काय उपयोग ? श्रीमंताचीं लाडकीं लेंकरें ? जन्मांत कधीं बि, चाऱ्यांनीं बाहेरचें ऊन पाहिलें नाहीं, परम कठीण परगृहवास ठाऊक नाहीं- हाल अपेष्टा सोसण्याची आणि कष्ट करण्याची संवय नाहीं, उणें उत्तर मर- णापेक्षां क्लेशकर वाटण्याचा सराव, आंगीं विशेष गूण नाहीं. शरीर कंटक आणि बळकट नाहीं; तेव्हां त्यांनीं कोठें जावें आणि काय मिळवावें? तस्मात् त्यांची कांहीं तरी सोय आपणच करून द्यावी, म्हणून घरांतून सूचना झाली. विचार करितां गोष्ट खरी दिसली, सोय करावी कशी? कोणचाहा धंदा करण्यास दामाजीचें बळ पाहिजे! तें तर नाहीं; तेव्हां करावें तरी काय? आप्त, सोयरे, इष्टमित्र, यांचेकडे याचना करणें, ह्या खेरीज मार्ग दिसेना. "घरांत जमा, तर बाहेर खातरजमा! तरच शब्दास मान! नाहीं तर नुसतें माणूस तृणसमान हा सिद्धांत माहित होता. लाखाचा शब्द फुका जाईल असें वाटलें. जीभ रेटेना, पण प्रसंगाचा महिमा मोठा विलक्षण आहे, कितीहि अप्रिय काम असलें, तरी तें प्रसंग करण्यास लावतो. "कामा तुराणां न भयं न लज्जा" असें होऊन रावसाहेबांनीं शेवटीं आपल्या एका आप्तास विनंति केली कीं, सध्या तुम्ही ऐश्वर्याच्या शिखरावर आहां, त्यापेक्षां वाहत्या गंगेंत हात धुवून घ्या. आमच्या एका तरी मुलाची सोय करून द्या. तो शब्द फोल झाला. एकदां खांद्याखालीं पदर आला खरा, आतां काय भीक मागत्याला बारा घरें! असें मनांत आ- णून बळेंच तुरमुंडी देऊन एकदां मुलांच्या सोयी केल्या. सोयी तरी कशाच्या कोणीकडून दृष्टी-आड केलें.

## घराची घरघर.

पूर्वीं वर्णन केलेल्या घराप्रमाणें दर एका मु ास घर बांधून ठेवण्याचा मनो- राज्यांत बेत ठरला होता. दारिद्र्याचा छापा पडल्यावर तो जागच्याजागीं राहून असलेल्या घराचीच उस्तवारी होईना. सरकारचे नित्य नवे तगादे, फरशा करा, मोऱ्या बांधा; अमक्याच नमुन्याचे शौचकूप बांधा, पाणी–पट्टी, भंगीपट्टी, असे नानाप्रकारचे खर्च घरासंबंधानें आले ते भागवेनात, घर विकवेना, ठेव- वेना, चोहोंकडून कोंडमारा झाला.

## ओढाताण.

ऐश्वर्याच्या धुंदींत पण रावसाहेब बेफाम नव्हते. खर्चिक मात्र होते, पुढील काळाची कल्पना त्यास नव्हती असें नाहीं. त्यांनीं हजारो रुपये खर्चून इनाम

जहागिरीची उपमा शोभण्याजोगे मळेतळे करून ठेविले होते; त्यांचें उत्पन्न चांगलें आलें असतें तरी गुजारा होऊन उघडीक पडली नसती. गाय चारी सडांनीं एकदम आटते तसा विनाशकाल आला म्हणजे चोहोंकडून घेरा घालतो. खुंटी हार गिळते. एकाएकीं भयंकर दुष्काळाच्या आवृत्ति सुरू झाल्या, विहिरी आटल्या, हजारों रुपये खर्चून केलेले बागबगीचे दरसाल हजारों रुपयांचें उत्पन्न देत होते, ते डोळ्यादेखत जळून चालले, विहिरीस खालीं पोटांत पुष्कळ पाणी असून फोडण्यास पैसा नाहीं. चोवीस रुपये शेकडा कडवा झाला, बैलांस वैरण नाहीं. गड्यामाणसांस मजुरी देण्यास पैसा नाहीं, बोंभरणास, खतामातीस पैसा नाहीं गहाण ठेवण्यास सोनें उरलें नाहीं. मोठमोठे शेट सावकार जेरीस आले, जमिनी गहाण कोणी घेईना. विकतही कोणी घेईना.

## तगादे.

इष्टमित्र आप्तसोयरे ह्यांतील गरीब-गुरीब ह्यांनीं आपल्या जीवाभावाकरितां राखून ठेविलेल्या रकमा रावसाहेब नको नको म्हणत असतां सुस्थल समजून रावसाहेबांच्या भरभरीच्या वेळेस ठेविल्या होत्या, ह्या रावसाहेबांची विपन्न स्थिति, आणि चोहोंकडे झालेलें काहूर पाहून आपल्या परत मागू लागले, द्यावे तर पैसे नाहींत, न द्यावे तर अब्रू जाऊन निराधार माणसें उपाशीं मरून त्यांचा तळतळाट लागणार. ह्या विवंचनेंत रावसाहेब आहेत तोंच अमुक कामाकरितां अमुक पैसे पाहिजेत अशीं मुलांचीं पत्रें येऊन धडकलीं. पत्रांत लिहिलेलीं कारणें वाजवीं होतीं. पण पैसे पाठवावे कोठून ? न पाठवावे तर पूर्वी हजारों रुपये खर्च झालेले पाण्यांत जाणार. आप्त, सोयरे, इष्ट, मित्र ह्यांस आंतील इंगित काय माहित! त्यास रावसाहेब गबर आहेत वरून उगीच कोंग केलें आहे हा भ्रम. त्यांजकडूनही मदतीची मागणी येतच आहे त्यांजवर नानाप्रकारचीं आलेलीं संकटें दूर करणार तुम्हांवांचून कोणी नाहीं, असें निरोप येतच आहेत, घरांतील माणसांस खरी स्थिति माहीत असतांही त्यांजकडून सुद्धां नानाप्रकारचे तगादे आहेतच.

## ग्रंथिक संन्निपात व अक्षरशक्ति.

चोहोंकडे ग्रंथिक संन्निपाताचा धडाका चालला आहे, रात्रंदिवस काळीज धडधड ( लकलक ) करीत आहे, कर्जाच्या बचर्या लागल्या आहेत. डांक येऊन पत्र नाहीं असें समजेपर्यंत टपालाकडे डोळे लागले आहेत, पत्र आलें कीं नमस्कार दृष्टी पडेपर्यंत काळीज धकधक करीत आहे, तों वांचून समाधान होतें

तों "पैसे आले पाहिजेत" ही अक्षरशक्ति हृदयाचा स्फोट करीत आहे, पत्र-द्वारें अर्धी भेट होऊन आनंद होण्याचें एकीकडे राहून विंचवडे मात्र लागत आहेत.

## सर घोडया पाणी खोल.

धन-यौवन निघून गेलें. जिकडून तिकडून आनंदाचा वर्षाव होत होता तो जाऊन चोहोंकडून दुःखाच्या ज्वाळा येऊं लागल्या. रात्रंदिवस सुयांच्या पिंजऱ्यांत असल्याप्रमाणें मनाची स्थिति झाली. तेव्हां सौभाग्यवतीची स्थिति कशी झाली असेल हें निराळें सांगावयास नकोच. ज्या मलुबाईनें यजमानाच्या जीवावर लंका लुटली, पाहिजे तो भोग भोगला, पाहिजे ते ख्याल केले, मोठया श्रीमान्, परोपकारी, धूर्त, चतुर म्हणून जगांत मावत नव्हती, तिला एकदम उलट स्थिति आली. तिनें विचार केला कीं, झालें तें बरें झालें, आतां येथें राहण्यांत कांहीं शोभा नाहीं, कांहीं मतलब नाहीं, सुख नाहीं, आपलें कांहीं अडलें पण नाहीं. थोडा फार हात आपण मारलाच आहे, आपले पांच लाल आहेत, एकेकानें एक एक रुपाया दिला तरी एखाद्या क्षेत्रांत आनंदानें राहून देहाचें सार्थक होईल. जन्मभर यजमानांचा जाच सोसला, ऊठ बे ऊठ ! बैस बे बैस ! केलें, पाहिजे तितके आर्जव केले, तरी शेवटीं यश नाहीं, सुखाचा शब्द नाहीं, त्यापेक्षां "सरक घोडया पाणी खोल" असें मनांत आणून लोकांत वाईट दिसूं नये, यजमानास वाईट वाटूं नये, म्हणून इळूंच गोष्ट काढली कीं, यंदाचा चातुर्मास वाईस घालवावा, असें मनांत आहे. आपली खर्चाची तारंबळ आहे, मला चार महिन्यांपुरतें खर्चास अमक्यानें देण्याचें कबूल केलें आहे, तरी आज्ञा व्हावी. यजमान कांहीं गव्हार नव्हते, त्यांनीं सर्व कारस्थान ओळखिलें, आणि विचार केला, कीं आपलें कर्म आपण भोगावें, आपल्या बरोबर दुसऱ्यास त्रास कशाला द्यावा, एक एक कमी होईल, तितकें बरेंच आहे; आपलें मोठें भाग्य कीं, मोठ्या कुळांतील चतुर बायको आपल्यास मिळाली, म्हणून ती अशा सन्मार्गाची तरी वाट काढीत आहे. आपण नको म्हटल्यानें ती रहाणार थोडीच, मग आपला अरमान तरी कां करून घ्या, असें मनांत आणून आज्ञा देऊन मोकळे झाले. बाईसाहेब गेल्यावर रावसाहेब आपल्याशींच विचार करून म्हणतातः—

## श्लोक

" चिरंध्याता रामा क्षणमपि न रामा कृति रियम् ॥ "
" चिरं पीता रामा धरऽमधु न रामां-घ्रि-सलिलं ॥ "
" न तो रुष्टां रामां क्षणमपि न रामाय विनतिः ॥ "
" गतं मे जन्माग्रथं न दशरथ जन्मा परिचितः ॥ १ ॥ "

## उपेक्षा.

गांवांत एकही महत्वाचें कृत्य रावसाहेबांच्या आगमनावांचून होत नव्हतें, पण आतां नुसतें आमंत्रण सुद्धां कोणी करीना; तेणेंकरून रावसाहेबांस वाईट वाटे, आमंत्रण आलें तरीही वाईट वाटे, कारण सर्व आमंत्रणें, आदर, सन्मान, खुर्च्या, लांब लांब पदव्या, ज्याच्याकरितां होत्या तो ( पैसा ) निघून गेला तेव्हां चौघांत हात हालवीत जाऊन तरी काय उपयोग ?

## पोष्य माणसें.

आतां रावसाहेबांजवळ पुष्कळशीं पोष्य माणसें अनाथ झालेलीं मात्र राहिलीं, त्यांस मात्र कोणी धनी नाहीं, टाकावीं, तर रावसाहेबांचा सुस्वभाव आणि करारीपणा त्यांस तसें करूं देईना. तात्पर्य, भीष्माचार्यप्रमाणें शरपंजराच्या जाचण्या खोशीत रावसाहेब पडले. अशा वेळेस सुद्धां वर लिहिल्याप्रमाणें पुत्रकलत्रांचीं मागणीं येतच होतीं तीं वाचून मनांत ह्मणतात, काय हो मी ह्यांच्या चोरींत सांपडलों आहें ! हे षड्रिपु मला अद्याप सोडीत नाहींत। असो. कंठांत प्राण आहे तों सुटका होत नाहीं खरी, आतां व्यर्थ काळजी करूं नये.

## वाक्प्रतोदप्रहार.

भाड्याच्या तट्टावर रोज नवा स्वार. त्यास वाटतें आपल्याला काय दहा कोस मात्र जावयाचें, तितकें त्यानें तुरतुर चालून जावें. त्या घोड्याचा प्राण डोळ्यांत आला आहे, सगळा जन्म ह्या यातायातींतच गेला, ह्याचा विचार स्वाराच्या स्वप्नींहि येत नाहीं; मनाप्रमाणें घोडें चाललें नाहीं, म्हणजे कोरडे उडवितो; पण रोजचाच तो प्रसंग असल्या कारणानें : बिचारें तट्ट

निरुपायानें त्याविषयीं खेद न करितां चालवेल तसेंच चालून मुक्काम गांठीत असतें. त्याप्रमाणेंच रावसाहेबांची हवाल झाली; त्यांची संसाराची हौस पूर्ण झाली, वीट आला, ' हा हा नाथ देहि देहि मरणं ' असा त्यांनीं आपल्या मनीं ध्यास धरिला, पण जन्मजन्मांतरीं ज्यांचें कर्ज फेडण्याचें राहिलें होतें, ते सावकार परिवाराच्या रूपानें रावसाहेबांच्या घरीं तगाद्यास आले होते ! तो परिवार कंटाळणार कसा ? त्याची ताजी उमेद, कोणाची मुंज व्हावयाची, कोणाचें लग्न व्हावयाचें, कोणाचें नहाण, कोणाचें डोहळजेवण, कोणाचें बारसें, असे नानाप्रकारचे सुखसोहळे व्हावयाचे, आणि तीं सर्व कार्यें ज्याचीं त्याचीं पहिलीं पहिलीं मोठ्या हौसेचींच, तीं रावसाहेबांनीं मोठ्या थाटानें पूर्वीप्रमाणेंच करावीं, म्हणून सगळी मंडळी आपली इच्छा प्रकट करीत आहेत; कोणी मोठमोठीं वस्त्रें, कोणी दागिने, कोणी खेळ, कोणी गाडी, कोणी कांहीं, तर कोणी कांहीं, मागत आहे; कौरवपंक्तींत ज्याप्रमाणें द्रौपदीची तारांबळ उडाली त्याप्रमाणें रावसाहेबांची मंघेरी झाली आहे; बाप पाहुणा आला म्हणून रेडा थोडेंच दूध देणार ! सर्वांची हौस म्हणून रावसाहेबांची पिशवी रुपये थोडेंच प्रसवणार ! करवेल तितकें करून वरील तट्टाप्रमाणें रावसाहेब दिवस कंठीत आहेत, स्वाराप्रमाणें परिवार वाक्‌बतोदाचे वरचेवर प्रहार करीत आहे. ' आलिया भोगासी असावें सादर ' म्हणून मृत्यूची मार्गप्रतिक्षा करीत रावसाहेब दिवस काढीत आहेत !

शिव शिव ! ह्या संसाराच्या संगानें कोणास तरी सुख प्राप्त झालें आहे काय? कवींनीं म्हटलें आहे:—

## श्लोक.

अत्तुं वांछति वाहनं गणपते राखुं क्षुधार्तः फणी ।
तंच क्रौंचपतेः शिखीच गिरिजा सिंहोपि नागाननं ॥
गौरी जन्हुसुतामसूयति कलानाथं कपालानलो ।
निर्विण्णः सपपौ कुटुंबकलहादि शोपी हालाहलं ॥१॥
एका भार्या प्रकृति मुखरा, चंचलाच द्वितीया ।
पुत्रस्येको भुवनविजयी, मन्मथो दुर्निवारः ॥

शेषशय्या शयनमुदधौ, वाहनं पन्नगारिः ।
स्मारं स्मारं स्वगृहचरितं, दारु भूतो मुरारी ॥ १ ॥
( सु. भा. )

## दुःखांत दुःख मरण.

### श्लोक.

सुगंधाच्या लोभें, भ्रमत मृग रानीं वनिं सदा ।
शिणे पावे मृत्यू, परि न गवसे कस्तुरि कदा ॥
निजानंदासाठीं, भव उदधि मंथी मन पिसें ।
फिरे जन्मोजन्मीं, परि न सुख तें त्यास गवसे ॥१॥
(स्वकृत.)

## कांहीं तरी उणीव.

एका व्यक्तीस संसारांत दुःख झालें म्हणून काय झालें ? एका शितावरून सगळ्या भाताची परीक्षा करावी, आपल्यावरून जग ओळखावें, ह्या म्हणी भलत्याच ठिकाणीं लागू पडत नाहींत. एक जीवराज दुर्दैवी म्हणून कांहीं सगळें जग तसें नाहीं. संसार दुःखमय आहे, कीं सुखमय आहे हें सामान्य विचार करून बहुजनसमाजाची स्थिति पाहून ठरविलें पाहिजे. जगाकडे पहावें तर कोठें कांहीं कोठें कांहीं, एक आहे एक नाहीं असेंच दिसून येतें. जेथें द्रव्याची समृद्धि तेथें मुलाबाळांचा तोटा. घर स्मशानासारखें भयाण. जेथें मुलालेंकरांचा सुकाळ तेथें द्रव्याचें अनुरुप. अन्नं नास्ति वस्त्रं नास्ति. दोन्ही आहेत तर शरीरास भयंकर व्याधि. तिन्ही आहेत तर नवराबायकोचा छत्तिसाचा आंकडा. परस्परांचे स्वभाव विरुद्ध असल्याकारणानें रात्रंदिवस कटकट. तें ठीक असलें तर भाऊबंदकीमुळें रोज सरकारदरबार आणि नानाप्रकारचीं लचांडें चालू आहेत. कोठें दुर्व्यसनाच्या सुकाळामुळें विपत्तीचे विलास चालू आहेत, घरादाराचे लिलाव होत आहेत. गोरगरीबांची काय कथा ! कोट्यवधि रुपये, सालाचे वसूल होणारें राज्य वडिलांनीं कमावून ठेविलें आहे; पण तें भोगण्याचें मालकाच्या प्रारब्धीं नाहीं. नीच संगतीनें वेडे विद्रे चाळे करूं लागल्यामुळें सार्वभौम सरकाराचा कोप होऊन पदच्युत्ति प्राप्त झाली आहे. कोणी राजे टिक्याचे धनी यजमान

राहून सर्व अधिकार सरकाराकडे ! नांवाला कारभारी. पण खरोखर सासुबाई नेमलेल्या अधिकाऱ्याकडे कारभार गेला आहे.

## यलो पेरिल.

कोठेंही नवल झालेल्या स्वतंत्र राजाचें राज्य, " वळी तो कान पिळी " ह्या हक्कानें बलाढय राजानें बळकाविलें आहे. त्या बळकावणारास तरी शांति कोठली ! त्याला त्याच्याहून बलाढ्य शत्रु रात्रंदिवस, आसनीं, भोजनीं, शयनीं, पानीं दिसत आहेत, त्या शत्रूलाही शांति नाहीं. भूमंडळावर सरळ हेतूनें जरी कोणी कांहीं जमाजम केली, किंवा शस्त्रास्त्रांची सुधारणा केली, कीं स्वपदहरणाच्या भीतीनें देवेंद्राची जशी तारांबळ होई तशी तारांबळ त्याची होत आहे. पीतवर्णी लोक अफूच्या तारेंत गुंग. त्यांच्या ध्यानीं ना मनीं. पण आपल्याप्रमाणेंच त्यांच्या मनांत परापहारबुद्धि जागृत होऊन तो मानवी समुद्र आपल्या देशावर लोटून आपल्यास दास करील कीं काय, अशी काल्पनिक भीति युरोपस्थांना वाटून, " यलो पेरिल, यलो पेरिल " ( पिंवळें अरिष्ट) हा नसता ध्यास ते घेऊन बसले आहेत!

## सदा धाक.

वरील प्रकार तरी प्रतिस्पर्धा असणाऱ्या राजांमधील झाला; पण स्वतःच्या राज्यामध्यें तरी राजाला स्वस्थता असावीना ! तक्ताधिपतीला मोठा आनंद व संतोष असावा; पण खरें पाहिलें तर दारूच्या पेवावर बसल्याप्रमाणें त्याचा जीव धाकधूक करीत असतो. अराजक इच्छिणारे वेडपीर आपणांस कोठें गाठतील आणि धाड घालतील हा धाक त्यास रात्रंदिवस भोसकीत असतो; जेवणांत विषाचा संशय येतो; पाण्यांत विषाची शंका येते; रंगमहालांत स्फोट करणाऱ्या दारूचा भास होतो; महाद्वाराबाहेर पडण्यास मागें पुढें जयत पहारा असतांही भीति वाटते; जातां जातां पूलच बसेल काय, बोगदाच कोसळेल काय, अशा कांक्षा येत असतात. हे राजे, लोकांचे प्राण घेण्यास पाहत असतात; सर्वस्व हरण करण्यास रात्रंदिवस टपलेले असतात. पण काळाचा घाला त्या वेडेपिरांच्या लहरीसरसा आपल्यावर केव्हां पडेल ह्मणून त्यांचें काळीज धसधस करीत असतें. शिव ! शिव! ह्यापेक्षां गांवांत तुकडे मागून मशिदींत गुळाच्या चवीनें खाऊन रात्रभर आनंदानें झोंप घेणारा बेफिकिर फकीर किती

सुसी असतो ! मशिदींत दिवा लावण्याचा धाक नव्हता, तेव्हां फकीरानें शेंपूट धरून हत्ती उभा केला होता. धाक लागल्यावर हत्तीनें त्यास फराफरा ओढीत नेलें.

## राज्यद्रोह.

दुसऱ्या लोकांस पादाक्रांत कांहीं बलाढ्य राष्ट्रांनीं केलेलें आहे, त्यांस वाटतें कीं, पादाक्रांत झालेले लोक तरी आपल्याप्रमाणेंच मानव होत. बुद्धिवैभवानेंही कमी नाहींत. मरणापेक्षां शतगुणित जाच करणारी परवशता त्यांस केव्हां असह्य होईल आणि ते आपल्या शृंखला फेंकून देण्यास केव्हां उभे राहतील, ह्याचा काय नेम आहे? ह्या भीतीनें तीं राष्ट्रें शंकायमान बनून राहिलीं आहेत. पैसेवाल्यास जिकडे तिकडे चोराचा भास होतो. रात्रीं कोठें उंदरामांजरांनीं खडबड केलें पुरें, कीं तो हातांत कांकडा घेऊन, सोटा घेऊन, भुतासारखा घरभर फिरूं लागतो; त्याप्रमाणें ह्या जिंकणाऱ्या लोकांची गम्मत होते. कोणी सभा करो, कोणी व्याख्यानें देऊं लागो, कोणी नीतिविषयीं, उद्योगाविषयीं, कलाकौशल्याविषयीं किंवा व्यापारधंद्याविषयीं उद्योग करा ह्मणून उपदेश करीत फिरूं लागो, कीं ह्यांस राजद्रोहाचा वास येऊं लागतो. संशयभ्रष्ट मनाचे लोक आपल्यास आणि लोकांस व्यर्थ चिंतासागरांत बुडवितात. साप साप ह्मणून भुई बडविण्याच्या नादीं लागतां लागतां एखादा खरा साप वारूळास धक्का लागून भलतीकडूनच येऊन धाड घालण्याचा मात्र असल्या वेड्या चाळ्यांनीं संभव वाढतो.

## धनहानि.

वरील प्रकार तरी ऐश्वर्य आणि धन ह्यांचा झाला, पण धनहानि चिरस्थाई नाहीं, केव्हां तरी परिहार होण्याजोगी आहे. दहा हजारांत एखादा दाता कदाचित् निर्माण होतो. तो कांहीं लोकांचे तरी हाल हलके करूं शकतो. कांहीं पार्शी, भाटे ह्यांनीं आणि यूरोप, अमेरिका, जपान वगैरे संपन्न देशांतील दयाळू लोकांनीं विक्राळ दुष्काळांतील लोकांस जीवदान दिलेलें आपण प्रत्यक्ष पाहिलें आहे. द्रव्याची हानि धैर्यानें आणि विवेकानें सोसतां येतें आणि पुढें भरूनही काढितां येतें.

## काळसर्प.

ह्या मृत्युलोकाच्याच नव्हे ब्रह्मांडाच्या मागें काळसर्प सदोदित लागून रा-

हिला आहे. बोलून चालून आपण मर्त्य, तेव्हां आपला शेवट मृत्यूच आहे, ह्यांत कांहीं विशेष नाहीं; पण अमर म्हणविणारे देव त्यांचा राजा शक्र, ब्रह्मा, विष्णु आणि महेश्वर ह्यांस सुद्धां ह्या सर्वभक्षक काळानें सोडलें नाहीं. मनुष्य जन्मतांच मृत्यूचें प्रस्थान ठेवावें लागतें. तांदुळ, हळकुंड आणि पैसा; नाळा-बरोबर प्रस्थान म्हणून पुरून ठेवितात! जन्म आणि मरण ह्यांच्या दरम्यान-च्या फटींतच काय तो मनुष्याचा कारभार होतो. सुख दुःख काय तें ह्या फटींतच भोगावयाचें. पुढील सुखदुःखाचें साधन सुकृत दुष्कृत काय तें हींतच जोडावयाचें. ही फट बुजेल तेव्हां बुजेल. हिला बुजवावयास कोण खोळंबलें आहे, असें म्हणतां येत नाहीं. निमिष, पळें, घटका, तास, प्रहर, दिवस, आठवडे, मास आणि वर्षे ही सामग्री घेऊन ती फट बुजविण्याचें काम मृत्यु सदासर्वकाल करीत आहे. ज्याची त्याला माहित नाहीं अशी एक वेळ ही फट बुजविण्याची ठरलेली आहे.

## मोहऱ्यांचा अस्त.

धर्मस्थापना करून गोब्राम्हणांचा प्रतिपाल करण्याकरितां, आणि आर्यभूमीस परतंत्रतापंकांतून बाहेर काढण्याकरितां, अवतार धारण करणाऱ्या छत्रपतिरूप आर्यभूमीच्या सौभाग्यतिलकास निर्दयपणें पुसून ह्या दुष्ट कालानेंच हिंदूंच्या आनंदांत विष कालविलें! त्या महात्म्याचें राहिलेलें काम पुरें करण्याकरितां हि-मालयापासून कुमारीपर्यंत भगव्या झेंड्याची शीतल छाया करण्याची प्रतिज्ञा करून ती शेवटास नेत असतां अर्ध्या आडांत दोरी कापून, संपूर्ण हिंदुस्थानच्या उत्कर्षाचा मोड खुडून टाकतांना ह्या चांडाळाचे हात कसे गळून पडले नाहींत! स्वधर्मभ्रष्टता, मदिरापान, अभक्ष्य-भक्षण, नास्तिकपणा, ह्यांकडे महाराष्ट्रांतील मागील पिढीच्या पदवीधरांचा ओघ झपाट्यानें वाहूं लागलेला पाहून ज्या बापसे सवाई बेट्यानें आपल्या ज्ञानभरित अकुंठित संबीर लेखणीनें भ्रष्ट वि-चारांचा सत्यनाश करून नव्या पिढीचा ओघ आपलेपणाकडे वळविला, आपण कुत्र्यांचीं पिलें नसून वाघांचीं आहोंत, आपल्याला दुसऱ्यापाशीं भीक मागा-वयास नको; आपलें वडिलोपार्जित ज्ञानभांडार अगाध आहे, अजून पुष्कळ दिवस परदेशी याचक आपल्यास पोसतां येतील, अशी खातरी करून दिली, तो अमोलिक लेखनपटु आपल्या देशाच्या ज्ञानाचा उद्धार करील, आपल्याला

उर्जितकाळ आणीलें, म्हणून सर्व लोक आशा करून बसले असतां भर तारुण्यांत त्यावर धाड घालण्याचें पाप त्याच दुष्टानें पदरीं घेतलें ! !

## मृत्यूचा कहर.

आज राजाच उचलून नेऊन सगळा देश शोकसागरांत लोटला ! आज काय अंधाची काठीच घेऊन गेला ! सगळा स्वयंपाक मोठ्या मेहनतीनें संपादून करून ताट वाढावें, आणि तोंडांत घांस घालणार तों दुष्टानें ताट उचलून न्यावें ! भर तारुण्यांत येऊन वल्लभाच्या भेटीविषयीं कुलवधु आतुर झाली असून एक एक दिवस युगाप्रमाणें काढीत असतां, वल्लभास काळानें ओढून नेल्याची वज्रपाततुल्य बातमी येऊन धडकत आहे ! ! शेंकडों मुलें पोरकीं होत आहेत, म्हातारीं मातापितरें पुत्रशोकानें विव्हळ होत आहेत, अबला निराश्रित होत आहेत, असा प्रकार होत असतां, असल्या मृत्युलोकांतील आपण वेडीं माणसें दोन दिवसांच्या बाजाराकरितां लोकांच्या मुंड्या मुरगाळीत आहों ! नानाप्रकारें लोकांस लुबाडीत आहों ! सर्पाच्या तोंडांतील बेडूक माशा गिळीत असतो तसा हा प्रकार नव्हे काय ? ह्या एकाच गोष्टीवरून संसार केवळ दुःखांगारकांनीं भणाणलेली खाई आहे, हें उघड आहे. अहिमुखगतभेकसुख समृद्ध मानतां आला तर संसार सम्यकसार ह्मणतां येईल. नाभीगत कस्तुरीच्या वासाच्या शोधाकरितां रानावनांत भ्रमण करतां करतां मृग मरून जातो, तरी त्यास ती प्राप्त होत नाहीं; त्याप्रमाणेंच आनंदास्तव लक्ष चौऱ्यायशीं योनींचे फेरे घेऊन घेऊन अनंत जन्मीं मन शिणतें; पण त्यास निजानंद प्राप्त होत नाहीं.

---

## सुकृत दुष्कृत.

संसाराचे दुष्परिणाम येवढ्यानें संपत नाहींत. वर लिहिलेलीं सुखदुःखें या जन्मीं मात्र भोगण्याचीं आहेत. परंतु संसारसंगानें जीं दुष्कृत्यें घडतात यांचा परिणाम फार दारुण आहे. त्याजबद्दल यमलोकीं शासन होऊन शिवाय जन्ममरणाच्या येरझारा भोगाव्या लागतात.

### श्लोक.

यथा बालस्य वेतालो मृत्यु पर्यंत दुःखदः ।
असा देव सदा कारं तथा मूढमतेर्जगत ॥ १ ॥

( यो. वा. )

## पुण्य म्हणजे खाऊ आणि पाप म्हणजे बाऊ.

मन आनंदाच्या शोधार्थ परिभ्रमण करीत असतां त्याला पंचविषय सुखाचे वाटले. मायाजाल सुखाचें वाटलें. अनुभवांतीं दोन्हीं भासमान, मिथ्या व अनर्थकारक ठरलीं. देह विटाळाचा गोळा व क्षणभंगुर ठरला. सुखदुःखें मिथ्या ठरून निष्कारण पाप, ताप व दैन्य ह्यांचीं विवरें असल्याचें अनुभवास आलें. संसार दुःखागारकांनीं मणाणलेली खाई ठरली. नरजन्मांत येऊन कांहीं सार्थक न होतां भयंकर पापसाधन मात्र झाल्याचें प्रत्ययास आलें. सृष्टीसुद्धां अनित्य कळून आली. सुवास सुवास करीत असतां मृग मेला. त्याप्रमाणें चौऱ्याशीं लक्ष योनींमध्यें अनंत फेरे घेतां घेतां दमलें पण मनाला सुखप्राप्ति झाली नाहीं. अतएव सर्वच जर मिथ्या आहे तर–( श्लोक ) " भस्मीऽभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः येन केन प्रकारेण ऋणं कृत्वा घृतं पिब " हा चार्वाकाचा उपदेश सर्वांस हितकारक वाटून त्याकडेसच सर्वांची प्रवृत्ति झाली तर काय वाईट! सोयीस पडेल तो धर्म व लाभास जुळेल ती नीति. पुण्य म्हणजे खाऊ, पाप ह्मणजे बाऊ येवढेंच काय तें सर्व धर्मांचें आणि न्यायनीतीचें रहस्य कां न व्हावें ? दुनियेंतील सर्व धर्म, न्याय, नीति आणि समाज यांनीं लावून दिलेलीं विधिनिषेधाचीं बंधनें व नियम आणि त्यांच्यासंबंधानें झालेले अनंत ग्रंथ निष्कारण मारूड म्हणून उपेक्षेस पात्र कां न व्हावें ? सर्वच खोटें तर पुण्य पाप तरी कशाचें वरें ? ईश्वर कोणीं पाहिला आहे ? तो तरी कशाचा खरा ? असें सहजच मनांत येतें. पण असें मानिलें तर अनंत ब्रह्मांडघटना कोणापासून संभवली ? ती इतक्या नियंत्रितपणें कशी चालली आहे ? तिला आधार कोणाचा आहे ? ह्याचीं उत्तरें काय यावीं ? कर्त्यावांचून कृति, नियंत्यावांचून नियंत्रता, आधारावांचून आधेय मानणें म्हणजे निव्वळ दुराग्रह होय !

## कुतर्क.

अनंतकालापासून होऊन गेलेल्या परम पूज्य तत्ववेत्त्यांनीं, साधुसंतांनीं व शहाण्या पुरुषांनीं मागें मिथ्या ठरलेल्या सर्व गोष्टी मिथ्याच मानिल्या आहेत, तरी चार्वाकांचें किंवा पाखांड्याचें मत कधींही सत्य मानिलें नाहीं. तें सर्वदा उपेक्षणीय व तिरस्करणीय ठरवून तसल्या लोकांशीं वाद किंवा भाषण करून व्यर्थ शीण करून घेऊं नये, व मन भ्रष्ट करून घेऊं नये, असेंच सांगितलें आहे. धर्मांनींही तसेंच प्रतिपादन केलें आहे. श्रद्धा आणि भाव हाच धर्माचा आधार आहे. वर लिहिलेला कुतर्क एखादे वेळ मनांत येऊन मनाचा मोठा गोंधळ होतो, म्हणून तो काढून टाकिला पाहिजे; नाहीं तर या लेखानें भलतीच समजूत होण्याचा संभव आहे.

## कारण खोटें, पण कार्य खरें.

रात्रीच्या समयीं घरांत कांहीं खडखड वाजलें किंवा कोणी दिसल्याचा भास झाला तर खरोखर चोर नसतां चोर घरांत शिरला असें वाटून मनुष्य घाबरून जाऊन धडकी भरते. पिशाचाचा भास झाल्याबरोबर कांहीं माणसें बेशुद्ध होतात, कोणी कोणी कांहीं महिने सुद्धां आंथरूण धरून पडतात, एखादें तर मृत्युहि पावतें. वस्तुत: चोर किंवा पिशाच नसतां इतका दारुण प्रसंग ( परिणाम ) घडतो तो मात्र सत्य होतो. वास्तविक शत्रूचाच जय झाला असून शत्रूची धुळधाणी करून आमच्या सैन्यानें मोठा जय मिळविला अशी चुकीची बातमी आल्याबरोबर सगळें राष्ट्र आनंदानें नाचूं लागतें. आपल्या चालीप्रमाणें मद्यमांसाची गर्दी करून देऊन नाचतमाशे करूं लागतें, अथवा साखरा वाटूं लागून परमेश्वरास आभारपूर्वक शरण जाऊन मोठा दानधर्म करून हर्षांत निमग्न होतें. इतक्यांत ती बातमी खोटी ठरते. वर लिहिलेली भीति आणि जय दोन्ही खोटीं, पण त्यापासून झालेले परिणाम खरे. बागूल खोटा पण त्याच्या भयानें मुलानें रडणें सोडलें हें खरें. खाऊ देईन ही आईची थाप खोटी, पण खाऊच्या आशेनें मुलानें केलेलें काम खरें. तद्वत् जन्म, मृत्यु, देह व विषय हे सर्व मिथ्या; पण हें सर्व सत्य मानून केलेलीं सुकृतें व दुष्कृतें खोटीं नव्हेत. कोणी कोणाचा गळा कापला तर तें मिथ्या नव्हे, त्याबद्दल त्याला राजदंड व

पाप चुकणार नाहीं. आपला जीव धोक्यांत घालून अनाथाचें रक्षण केलें तर तें मिथ्या नव्हे, व त्यापासून घडणारे परिणाम मिथ्या नव्हेत.

## प्रारब्ध.

पुण्यपापात्मक कर्म मिथ्या नव्हे. तें भोगल्यावांचून सुटकाच नाहीं. याविषयीं प्रत्यक्ष प्रमाण आपल्या डोळ्यांपुढें सदासर्वकाळ आहे; पण त्याविषयीं आपण विचार मात्र करीत नाहीं. आपण नेहमीं पाहतों कीं, कोणी मनुष्य अल्पायु होतो, तर कोणी शंभर वर्षेंही वांचतो; कोणी राजभोग भोगितो, तर कोणी अन्न अन्न करीत फिरतो; कोणी एकपाठी तर कोणी निवळ पाषाण; कोणी मोठी विद्या संपादन केल्यामुळें द्रव्याचा पाऊस पाडण्याजोगें सामर्थ्य अंगीं असतां विद्येचा विनियोग द्रव्यार्जनाकडे न केल्यामुळें सदा हलाखींत, तर कोणी नुसता सह्याजी महाराज ( सहीपुरतें लिहिणारा ) लाखों रुपये मिळवितो; कोणी बाळदरिद्री दत्तक होऊन राजा बनतो, तर कोणी राजपदावरून घसरून बंदिवासांत पडतो; कोणास आयतेंच ठेवणें सांपडतें, तर कोणा लक्षाधिशाच्या घरीं दरोडा पडून सर्वस्व जातें. निर्जीव वस्तुस सुद्धां दैवयोगानें बरीवाईट स्थिति प्राप्त होते. एका दगडाची भगवंताची प्रतिमा होऊन राजे, संत व महंत तिच्या पायां पडतात. कांहीं दगड त्याच देवळांत फरशीस लागतात. त्यांस राजापासून रंकापर्यंत व पुण्यश्लोकापासून पतितापर्यंत सर्वांचेच पाय लागतात. दुसरे कांहीं दगड अगदींच नीच ठिकाणीं लागतात. दगडास ज्ञान नसतें तेव्हां त्याच्या न्यूनाधिक स्थितीचें महत्व किंवा सुखदुःख त्यास कशाचें ? हा आपला वेडा भ्रम आहे. ह्यांत कशाचें दैव असें म्हणतां येईल. पण अश्ववृषभादिक ह्यांस तर सुखदुःखाचा भोग आहेना ? त्यांचा प्रकार असा नाहीं काय ? ते माडेकऱ्याच्या घरीं पडले तर आमरण काबाडकष्ट करितात, पोटास आहे आहे नाहीं नाहीं. राजाच्या पदरीं पडले तर सामान्य माणसापेक्षांही जास्ती बरदास्त राहून कामही थोडेंच करावें लागतें. तस्मात् हें फळ कोणच्या कारणाचें ? उद्योगवादी दैवास मिथ्या म्हणून सर्व भिस्त कार्यकारणावर ठेवितात, पण अशा कांहीं चमत्कारिक गोष्टी पाहण्यांत येतात कीं, तेथें कार्यकारणभाव मुळींच जुळत नाहीं. सुशील, सुस्वरूप, सेवातत्पर पत्नी असतां तिचा कांहीं एक अपराध नाहीं असें स्वमुखें कबूल करीत असूनही

नवरा तिचा वारा सुद्धां पडूं देत नाहीं. तिच्याकडून उद्योगांत काय कमी पडलें म्हणावें ? सुशील पिता आणि सुशिक्षित लेक असतां उभयतांमध्यें बारावा बृहस्पति कां दिसून येतो ? पत्नीचे मोठमोठे अपराध माफ करूनही तिजवर प्रेम करणारा पति दिसून येतो. दुर्गुणी मुलावर प्रेम आणि सद्गुणी मुलावर पित्याची अवकृपा क्वचित् स्थळीं येते. कांहीं म्हणण्यासारखें कारण नसतां एकादा परकी मनुष्य एखाद्याचें मोठें कल्याण करितो. नाहीं तर बापच लेकीच्या सर्वस्वाचा अपहार करतो ! तेव्हां "कैचें आपुलें परावें अवघें ऋणानुबंधें घ्यावें" हेंच खरें.

## दैवोद्योग वाद.

दैव आणि उद्योग ह्याविषयींचा वाद अनादिकालापासून चाललाच आहे. तो पुढेंही अनंत काळ चालणार. ह्यासंबंधानें इतकेंच खरें कीं, मनुष्याच्या उत्कर्षास रथचक्राप्रमाणें दोन्हीं कारण आहेत. आणि त्या दोहोंचा अन्योन्याश्रय आहे. उद्योगानें संचलें तें संचित म्हणजे दैव झालें. त्याच योगानें पुन्हां उद्योग करण्याची बुद्धि होते, आणि यशापयश येतें. चांगल्या उद्योगाचें फळ सुकृत आणि नीच उद्योगाचें फळ दुष्कृत. सुकृतानें सद्बुद्धि, सद्बुद्धीनें ज्ञान व ज्ञानद्वारें मोक्ष आणि दुष्कृतानें दुर्बुद्धि, तिच्यायोगें दुर्गति होते. तस्मात् पुण्य व पाप मिथ्या म्हणतां येत नाहीं.

## दैवसाधन.

दैव जें असेल तें असेल तें आपल्यास बनवितां येण्यासारखें नाहीं. असेल त्याचा भोग भोगणें भाग असें मनांत येऊन निराशा होऊन उमेद खचूं देण्याचें कांहीं कारण नाहीं. दैवाचे प्रकार तीन आहेत. जन्मजन्मांतरीं केलेलीं सुकृतें-दुष्कृतें संचलेलीं असतात. तो संचय संचित. त्यांपैकीं या जन्मीं भोगण्याचा जो भाग तें प्रारब्ध. आणि या जन्मीं होणारें कर्म क्रियमाण. संचित आणि प्रारब्ध याप्रमाणें क्रियमाण बनलेलें नाहीं. तें आपण जितकें चांगलें बनवूं तितकी चांगली भर संचितांत पडून तें चांगलें होईल. तितकें चांगलें कर्म आपण केलें तर सगळें संचितही नष्ट होऊन जन्ममरणापासून मुक्तही होतां येईल.

## देवदरबारीं अन्याय.

शिवाय पुण्यपाप नाहीं म्हणणें सयुक्तिकही नाहीं. ज्याच्या अगाध शक्तीनें आणि योजनेनें ब्रह्मांड नियंत्रितपणें चाललें आहे. त्याच्या दरबारांत न्याय मुळींच नसेल काय ? सुकृत करणारांस चांगलें फळ व दुष्कृत करणारांस शासन होणें वाजवी असतां ईश्वराच्या दरबारीं अंदाधुंदी असण्याचा मुळींच संभव नाहीं. सुकृत करणारांस चांगलें फळ आणि दुष्कृत करणारांस शासन त्या श्रेष्ठ दरबारांत न होईल तर सर्वज्ञ प्रभूस सुकृत आणि दुष्कृत ह्यांमधील अगदीं भोळ्या मनुष्यास सुद्धां कळणारा भेद कळत नाहीं असें म्हणावें लागेल. अतर्क्य ज्ञाननिधि, सर्व न्यायाचा उगम, ज्याच्या सत्तेपासून सर्व राजनीति, ज्याच्या कृपाकटाक्षानें महर्षींस प्राप्त झाली त्याच्याच दरबारांत झोटिंगबादशाही आहे, ' टक्का शेर भाज्या और टक्का शेर खाज्या ' असा न्याय आहे असें म्हणावें लागेल. पण असें म्हणणें म्हणजे आपण आपल्याच पदरीं मूर्खपणा घेणें नव्हे काय ?

ह्याप्रमाणें जीवास क्लेश व दुर्गती प्राप्त करून देणारे विषय, मोहजाल, वैभव व सुखें हीं सारीं लचांडें खरीं तरी आहेत, किंवा भासमान असून आपला छल करीत आहेत ह्याचें विवेचन पुढील खंडांत केलें आहे.

---

# भाग ११

# तृतीय खंड—भवभ्रांति.

## पंचविषय—भ्रांति.

### श्लोक.

दधाति तावदमी विषयाः सुखं । स्फुरति यावदियं हृदि मूढता ॥
मनसि तत्व-विदां तु विवेचके क विषयाः क सुखं क परिग्रहः १(सु.भा.)

## शब्द.

### नाद व अर्थ हे दोन प्रकार.

दुःख देणारे विषय तरी खरे आहेत काय ह्याचा विचार करूं. मागें लिहि-

त्याप्रमाणें शब्द विषयांत नाद आणि अर्थ असे दोन भाग आहेत. गायनकला नादात्मक आहे, आणि काव्य अर्थात्मक आहे; सा, री, ग, म, प, ध, नी हे सात सूर गायनाचा पाया होत. ध्रुपदें, तराणे, ख्याल, टप्पा, ताल, अंतरे, राग, रागिण्या, आलाप, कंप वगैरे हे प्रकार सुरात्मक आहेत. वाजयंत्रें, तंतुवाद्यें, हरएक प्रकारचे बाजे, अलगुजीं, नलिका, सनया, मृदंग, पखवाज, ढोल, नगारे वगैरे वाद्यें नादात्मक होत. वृत्तें, छंद, साक्या, पदें, लावण्या, कटाव, चंपू, संगितें वगैरे सर्व पद्यलेख ह्यांत नाद आणि अर्थ या दोहोंचाही समावेश झालेला असतो. गद्यलेख अर्थात्मक असतात. ह्या सर्वांचा समावेश काव्यांत होतो. काव्याला शोभा आणण्य करितां अलंकार, रस, कोट्या, कूटें, अंतर, लापिका, बहिर्लापिका, दृष्टांत, द्राष्टांत, प्रास, यमकें, शब्दलालित्य, अर्थगांभीर्य, द्विरुक्त्या, वगैरे नानाप्रकार योजिलेले आहेत. सामान्यतः गायन म्हटलें म्हणजे त्यांत नाद आणि अर्थ ह्या दोन्ही भागांचा समावेश होतो.

## गायनाची स्वयंरमणीयता.

गायनाच्या योगानें नादलुब्ध आणि अर्थ-मर्मज्ञ लोक सुप्रसन्न होतात. मृगनागादिक ज्याप्रमाणें गायनाच्या आणि नागसुराच्या नादानें डोलूं लागतात तशीं माणसेंही गायनानें मोहून डोलूं लागतात. गायन स्वयमेव रमणीय असल्याविषयी बालकें व मृगनागादिक यांपेक्षां आणखी प्रत्यक्ष प्रमाण काय पाहिजे ? "कला सीमा काव्यं" असें प्रत्यक्ष ह्मटलेंच आहे असें वाटतें खरें. पण ज्ञानसंपन्न मनुष्यानें पशूंचें प्रमाण घेऊन कां त्यांच्या पंक्तीस बसावयाचें आहे ? बुद्धि आणि विवेक ह्या अमोलिक देणग्या प्रभूंनीं मनुष्यास मात्र दिल्या आहेत. त्यांच्या कसोटीस लावून प्रत्येक गोष्ट तपासली पाहिजे. गायन स्वयमेव रमणीय असतें, तर कोणच्याही भाषेतील कोणचेही सूर, मग त्यांच्याशीं विशेष समाजाचा परिचय असो वा नसो, सर्व निरनिराळ्या समाजांतील माणसांस सारखेंच आवडले पाहिजेत. तसें होतें कोठें ? आमच्या साम गायनाची प्राचीन ग्रंथांतून केवढी मोठी प्रौढी गाईली आहे ! तें आज उपलब्ध कां नाहीं ? गायन स्वयमेव रमणीय असतें तर तें कां लुप्त झालें असतें ? आमचीं शिवडमरु वगैरे वाद्यें कोठें गेलीं ? मुसलमानी राज्य प्रस्थापित झाली; म्हणून आमचें सामगायन आणि वाद्यें नष्ट झालीं कीं

नाहीं ? सध्यां ह्या देशांत शास्त्रसंमत गाणें म्हटलें म्हणजे हिंदुस्थानी. दुंदुभी, भेरी जाऊन चौघडे ताशे कां आले ? सुस्वर वाजयंत्रें मार्गे सारून कर्णकटु डोकें उठविणारे ताशे अग्रस्थान कां पावले ? ताशे नसले कीं मिरवणूक फिक्की कां वाटूं लागली ? त्यांसही मार्गे सारून आमच्या अकलेचें बंड जगास दाखविणारा ब्यांड आज कां पुढें झाला आहे ? हळूं हळूं शेष वाद्यें अस्तास चाललीं ? सारमंडळ बाळोबा आणि तुळाराम ह्यांजबरोबर गेलें ! बीन, जलतरंग नामशेष झाले. करताळ क्वचितच दिसतात. तेही लवकरच लय पावतील. सारंग्या, सतारी गटांगळ्या खात आहेत; लवकरच रुद्राविण्यास भेटण्यास जातील ! इंग्रजी बाजे, पेट्या पुढें सरकत आहेत. हरिदास उभे, बडेबडे वैदिक, शास्त्री, पुराणीक, पंडित, अधिकारी आणि सभ्य गृहस्थ खालीं बसलेले, आणि आपल्या अन्नदात्या बाजास लाथा देत पेटीवाला खुर्चीवर ! ! नित्य नवीं तंतुवाद्यें आणि बाजे येतच आहेत. गायनाच्या कलेचें मर्म समजून गायनानें सुप्रसन्न मन होऊन गायन-लोलुप होणारे फारच क्वचित्. " गतानुगतिका लोकाः " ह्या न्यायानें पुढची पुढची मंडळी गाण्यानें संतोषित किंवा असंतोषित झाली हें धोरण त्यांच्या चर्येकडे पाहून राखून बाकीची मंडळी त्यांस अनुसरून तारीफ किंवा फजीती करीत असते ! गायनाची प्रवृत्ति अंधपरंपरेनेंच झाली आहे व चालली आहे. कारागीर, सोनार सोन्यारुप्याचे दागिने करून त्यांस श्री (सरी) गळश्री (गळेश्री, गळसुरी नव्हे) वगैरे नानाप्रकारचीं नांवें देतो, आणि त्यांच्या पोटभागास निरनिराळीं नांवें देतो. नरनारी ह्या नांवांवर दंग होऊन त्या दागिन्यांनीं सुशोभित होऊन धन्यता मानितात. पण ते विकण्याचा प्रसंग येऊन ते सराफाच्या हातीं गेले म्हणजे तो त्यांस सोनें रुपें म्हणून मात्र पाहतो. त्याच्या पलीकडे दृष्टि पोंचलेल्याच्या हातीं गेले, तर तो त्या धातूस मृत्तिका म्हणतो, पार्थिवांश म्हणतो, त्याहीपलीकडे ज्याची दृष्टि ब्रह्मापर्यंत जाऊन पोंचली तो दागिने, सोनार आणि आपण पहाणार सगळें ब्रम्ह आहों, भेद नुसता भ्रामक आहे, असें म्हणतो. सराफ त्या दागिन्यांची किंमत करूं लागला म्हणजे सोनारानें लावलेला डाक, आणि त्या मोहित झालेल्या नरनारींच्या डोळ्यांत धूळ टाकून केलेला गचागुचा ह्यांचा विचार करून त्या मानानें त्यांची किंमत कमी करतो. तोच प्रकार ह्या गायनाचा आहे.

## तात्त्विक दृष्टि.

खरें म्हटलें तर गायनांत आहे काय ? बावन वर्णांतलेच वर्ण. ते स्पष्ट अर्थ-बोध होण्याजोगे न म्हणतां बळेंच हेल ओढून, कंप देऊन, आलाप लांबवून, शब्दछल करून म्हणावयाचे ! त्या हेलास, आलापांस आणि कंपास कांहीं नियमबद्ध करून ते नियम हेंच गायनाचें मर्म असें ठरवून शास्त्र बनविलें. एक खरी गोष्ट सिद्धांत म्हणून सांगून तिला अनेक प्रकार लावून दाखवून ती खोटी असती, तर असें झालें असतें, तसें झालें असतें, अशा अनेक गोष्टी प्रमाण म्हणून दाखवून तसें कांहीं होत नाहीं. तस्मात् हा सिद्धांत सत्य आहे, हें सिद्ध झालें असें भूमितीमध्यें सांगतात. त्याप्रमाणें गायनाचे मनःकल्पित नियम बांधून बळेंच अवघड करून ठेवून तो अवघडपणा ज्या नियमांनीं आणिला, ते नियम ओळखील तो दर्दी म्हणावयाचा. पूर्वोक्त दागिने सराफ ज्या नजरेनें पाहतो त्या नजरेनें तात्त्विक विचार करणारा गायनाची चिकित्सा करूं लागला, म्हणजे त्यास बावन वर्णांशिवाय आणि सरळ अर्थांशिवाय कांहींच दिसत नाहीं. नादलुब्धांकरितां किंवा रसिकांकरितां केलेले अनेक खटाटोप, कोट्या, अलंकार, रस, गुंता–गुंती, वगैरे ह्यांस तोंडाळ किंवा गावागुंवा ह्याप्रमाणें हिणकस समजतो, आणि त्यामुळें अर्थबोधाला कमीपणा येऊन " अर्थ लोपले पुराणीं, अनर्थ केला शब्दज्ञानीं " असा त्याच्या मनाचा सिद्धांत होतो.

## ऐकणारांची कां गर्दी ?

नुसतें नादात्मक गायन जर रमणीय असतें, तर सशास्त्र गायन करणाऱ्या गवयाला वायु झाला, असें समजून गांवढेकरी त्याला डाग देण्यास निघाल्याची गोष्ट सांगतात; तसा प्रकार न होतां, हिंदुस्थानी गाणें सुरू होतांच " आम्हांस त्यांत कांहीं कळत नाहीं " असें म्हणून गतानुगतिक नसणारीं माणसें उठून जातात तशीं न जातीं. लावण्या, छकडी वगैरे ग्राम्य गाणीं ऐकण्यास गर्दी होते तशी गवयाच्या गाण्याला कां होत नाहीं ? लावण्या, छकडी ह्यांच्या गाण्याच्या म्हणजे सुराच्या रमणीयतेस्तवच लोक जमत नाहींत. त्यांतील शब्दांच्या अर्थांनें त्यांचें मनरंजन होतें, किंवा हावभाव व नट पाहून जे लुब्ध होतात, त्याच लोकांची गर्दी असते.

सारांश, हा विषय स्वयमेव रमणीय आहे म्हणून आपण ह्यास लुब्ध झालों आहों असें नसून आपणच आपला घोटाळा उत्पन्न करून, भ्रम उत्पन्न करून घेतला आहे. गतानुगतिक बनून बळेंच नसतें महत्व शब्दविषयास देतों. आपण निवडलेल्या अध्यक्षांचा अधिकार मानून त्याच्यापुढें आपण मान वाकवितों, तद्वत् आपण बनविलेल्या गायनांत रमणीयता मानून आपण डोलूं लागतों.

## मिजास.

स्पर्श–सुख म्हणजे शरीराची मिजास येवढीच समजूत झालेली असल्या-कारणानें त्याच्या विपरीत सवयांनें व लोभानें माणसें कशीं दुबळी होतात, संततीवर कसे दुष्परिणाम होतात ह्याचें वर्णन मागें केलेंच आहे. स्पर्श-सुखाचें मुख्य स्थान काय तें कळत्र; पण स्पर्शसुखाच्या ( मिजासीच्या ) नादानें उभयतांही अशक्त होऊन खऱ्या विषयसुखास असमर्थ होतात. स्पर्शसुख मिथ्या व अनावश्यक आहे इतकेंच नव्हे, पण घातकही आहे असें नुकतेंच सिद्ध झालें आहे. ह्या सुखामागें गतानुगतिकता साधनसमृद्धि बळेंच लावून खऱ्या सुखास बाध आणलेला आहे.

## स्त्री–शरीर.

आतां स्त्री म्हणजे आहे तरी काय तें पाहूं. मांस, शिरा, मज्जा, धातु, श्लेष्मा, लाळ, थुंकी, रक्त, घर्म, मळ, मूत्र, अस्थि, केंस, नखें आणि ह्या सर्वांमधील कृमि ह्याशिवाय शरीरांत आहे काय ? ह्यांतील एक तरी पदार्थ पाहतांच किळस न येणारा मनुष्य आहे काय ? हें शुद्ध, पवित्र, किंवा सौगंधिक आहे काय ? शौचकुपांतील घाण नजरे आड करण्याकरितां त्याला चोहोंकडून भिंती घालून त्यास चुना वगैरे देऊन सुशोभित करितात, त्याप्रमाणें ह्या शरिरांतील घाण झांकण्याकरितां वरून काळी, पांढरी, पिवळी किंवा तांबूस अशा त्वचेनें हें शरीर मढवून काढिलें आहे. ती त्वचा तरी दुर्गंधीनें सोडिली आहे काय ? केंस, नखें किंवा कांतडें ह्यांस अग्निस्पर्श होतो, तेव्हां तीं सर्व किती दुर्गंधियुक्त आहेत, हें कळून येतें. रोज हें शरीर धुऊन घांसून साफ ठेविलें नाहीं तर ह्याच्या नऊही मोऱ्या वाहूं लागून जिकडे तिकडे

दुर्गंधि करून सोडितात ! दर एका रोमरंध्रांतून घामाचे पाझर चालतात. मुळीं विटाळापासूनच ह्याची उत्पत्ति ! ह्याचें आगमीं आणि निर्गमीं दहा दिवसांचें अशौच सर्व भावाबंदांस सुद्धां पाळावें लागतें ! आदि आणि अंत दोन्ही अशुचि, तर मध्यें शुचित्व असणार कोठून ? ह्याच्यापासून कोणता तरी चांगला पदार्थ उत्पन्न होतो काय ? सर्वोत्कृष्ट सुगंधिक पदार्थांस ह्याचा समागम घडला तर त्याचें रूपांतर अत्यंत दुर्गंधीचें होतें, कमालीच्या घाणी उत्पन्न होतात।

## दोन्ही प्रकार.

राम राम ! असल्या कुश्चळ सचेतन सांगाड्याला रंभेची आणि साकार मन्मथाची उपमा देण्यास कविश्रेष्ठांस शंका कशी नाहीं आली ? घाणेरडी थुंकी ती काय ? तिला अमृताची उपमा ! ढॉबडाचें बोळकें काय, आणि त्यास चंद्राची उपमा काय! मांसाचे गोळे काय आणि त्यांस कनककलश म्हणावें काय ! पण त्यांच्याकडे काय दोष आहे ? लोकांच्या अभिरुचीप्रमाणें शृंगाराची कमाल करण्याच्या नादांत निमग्न असतां त्यांची नजर इकडे कशाला जाईल ? गिऱ्हाइकाच्या इच्छेप्रमाणें बरें आणि वाईट दोन्ही माल बाजारांत येतात. घेणाऱ्याच्या दैवयोगाप्रमाणें बरा किंवा वाईट माल घेण्याची त्याला इच्छा होते. कोणी तुळशी फुलें घेऊन भगवंताची पूजा करून कृतार्थ होतो. कोणी मोतीयाचे गजरे, पाच, मरवा घेऊन पाहिजे त्या लोकांकरितां असलेल्या बाजारांतील चालत्या बोलत्या दुर्गंधी कुपाची पूजा करून यमपुरींतील रौरव नरकांत जाण्याचा मार्ग चोखळून ठेवतो ! कविवरांनीं वैराग्यप्रतिपादनाच्या वेळीं ह्या शृंगाराचें, रंभेचें आणि साकार मन्मथाचें खरें स्वरूप विदारून दाखविलेंच आहे. असले दुर्गंधी कूप एकमेकांस भेटविले म्हणजे जन्माचें सार्थक झालें, त्यांपासून आणखी तेच उत्पन्न केले म्हणजे स्वर्गद्वार खुलें होतें, असें मानणाऱ्या आम्हां नरांस, पशु ज्ञानवान असते तर ते सुद्धां हंसले असते !

## छीःथु

स्पर्शसुखार्थ पशु बनणारांची येवढ्यानेंच शिकस्त झाली असें नाहीं. धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे चारी पुरुषार्थ साधितां यावे आणि त्यांतल्या त्यांत निर्मळ स्पर्शसुखही प्राप्त व्हावें ह्मणून वडिलांनीं देवब्राह्मणांसमक्ष " धर्मेच अर्थेच कामेच नातिचरामि " अशी शपथ घेववून धर्मपत्नि पुरुषाच्या देहास

अर्धांगी जोडून दिलेली सुंदर, सुशील, सेवातत्पर असतां तिचा अव्हेर करून तिच्या खेटराची सर न येणारी, तिची बटीकही न साजणारी, दुर्व्यसनी, इलकट, गलिच्छ अशा लोकांची ही पीकदाणी बनलेल्या तोंडाची, अनेकांनीं उपभोगिलेली उष्टी पत्रावळ चाटीत बसून तिची व आपली चरणसेवा करण्यास सुद्धां आपल्या धर्मपत्नीस लावणारे पुच्छहीन द्विपद पशु कैक आहेत! कैक ह्याच्याही पलीकडे गेले आहेत. तमाशांतील नट आपल्याप्रमाणेंच पुरुष आहे, हें माहित असून त्याच्या बीभत्स शब्दांनीं व ग्राम्य चेष्टांनीं मोहित होऊन त्याच्या संगतीनें स्वर्गसुखतुल्य आनंद मानितात. लाथा खाऊन का होईना, पण रतिसुख पावणाऱ्या लंबकर्णांस कळत असतें, तर तो सुद्धां ह्यांची छीः थू करता! ह्यांस पशू ह्मणावें तर गवत खात नाहींत. पण बिचाऱ्या खऱ्या पशुवर्गाची करुणा आली, ह्मणूनच नारायणांनीं ह्या पशूंना गवत खाण्याची वासना ठेविली नसेल! ठेविली असती तर खऱ्या पशुवर्गास गवत मिळालेंच नसतें.

## आत्मसंयमन.

पोटाच्या लकड्याप्रमाणेंच कामविकार नैसर्गिक असल्याकारणानें संभोगसुख वर्ज करणें जवळ जवळ अशक्यच आहे, असें कधीं कधीं मनांत येतें. संभोगसुख वर्ज करणें फार कठिण आहे ह्यांत संशय नाहीं; पण अशक्य मात्र खचित नाहीं. चांगल्या गोष्टीचें साधन आत्मसंयमन केल्यावांचून होतच नाहीं. चांगल्या गोष्टी साध्य केल्यावांचून त्यापासून होणारे महत् लाभ होत नाहींत. टांकीचे घाव सोसावे तेव्हांच देवपण प्राप्त होतें. तद्वत् आत्मसंयमन करून भासमान विषयसुखाच्या कचाट्यांतून मोकळें व्हावें, तेव्हांच देहाचें सार्थक होतें. ब्रह्मचारी, विद्याव्यसनी, तरुणबांड तरणेताठे प्रवासी, मल्लविद्येचे शौकी, गुजराथ-मारवाड वगैरे दूरदेशीं बायका ठेवून येऊन वर्षानुवर्षे गुमस्तेगिरी करणारे, बालविधवा वगैरे मानवी प्राणी संभोगसुखवर्जित वर्षानुवर्षे राहतात! कोणी कोणी तर सगळा जन्म तशा स्थितींत काढतात! एकदां ह्या सुखाची आशा सोडिली आणि बरेच दिवस संवय झाली, म्हणजे कांहीं अवघड वाटत नाहीं. वरील लोकांविषयीं कुतर्क काढणारे काढितात, त्यांसही कांहीं उदाहरणें मिळतात. तरी येवढें मात्र पुरें लक्षांत ठेवावें कीं, कलीचा जाज्वल्य अंमल इतका

माजला आहे, तरी दुर्वृत्त माणसांचें प्रमाण अद्याप अल्पच आहे. ज्यास मलतीकडे तोंड घालण्याचीच गोडी, त्यास कलत्र असून तरी कोठें समाधान आहे ? यांच्या धुमाकुळाचें मागें वर्णन झालेंच आहे ! कोणत्याही धर्मशास्त्राचें असें म्हणणेंच नाहीं कीं, तुम्ही धर्मपत्नि करूंच नका. तीं इतकेंच सांगतात कीं, तुम्ही शास्त्रसंमत मार्गानें वागून धर्मपत्नीबरोबर आनंदानें विहित गृहस्थाश्रम करा; म्हणजे गृहस्थाश्रमही धन्य आहे. कलत्रसुखाचें खरें स्वरूप व खरी योग्यता लक्षांत ठेवा.

## खुलासा.

स्पर्शविषय-विवेचनांत विषयप्रतिपादनाच्या ओघानें स्त्रीनिंदा फार झाली आहे. खरें म्हटलें असतां एका हातानें टाळी वाजत नाहीं. एकटी स्त्री काय दुर्वर्तन करील ? तिला दुर्वृत्त नरपशुच दुर्वर्तनास लावतो. स्त्री बोलून चालून अज्ञान, अबला, पराधीन. पुरुषानेंच तिला शृंगारून नटवून मनोहारिणी बनविलें आहे; अर्थात् विचारहीन पुरुष भ्रमराप्रमाणें तिच्या मागें लागून तिला द्रव्यादिक अनेक मोहपाशांत गुंतवितो. कदाचित् सत्तेच्या बळानें किंवा कुटुंब-नायकीच्या वजनानें तिच्या पतीस किंवा पालकास राजी करून किंवा अडचणींत घालून त्याला नाइलाजामुळें गप्प बसण्यास लावून विचाऱ्या अबलेस सर्वथा चिखलांत रुतलेल्या गायीप्रमाणें करून तिला पापांत पाडतो, आणि आपल्यास नरकमार्ग खुला करून ठेवितो. तस्मात् दोषास पात्र पुरुष किंवा स्त्री ह्याचा निर्णय पुरुषांनींच आपल्या मनाशीं करावा. पुरुषास दुर्मार्गांत आपण होऊन प्रथमच लावणाऱ्या स्त्रिया फारच क्वचित् असतील. शरीरविक्रयाचीं दुकानें स्त्रियांचींच असतात ही गोष्ट प्रथमदर्शनीं वरील विधानांस बाध आणणारी दिसते, पण अर्थशास्त्राच्या नियमांकडे लक्ष दिलें म्हणजे ह्या गोष्टीनेंही वरील विधानास बळकटीच येते. मागणी फार आणि पुरवठा कमी असला म्हणजे त्या वस्तूस भाव येतो. बाष्कळ नरपशु सर्वत्र भरलेले, आणि त्यांच्याच यत्नांनीं बनलेल्या वारांगना थोड्या, यामुळें " सतीच्या दारीं ना बत्ती आणि शिंदळीच्या दारीं हत्ती. " असा प्रकार श्रीमंतांच्या मदांधपणानें होतो तोच चटावलेल्या निर्लज्ज

स्त्रियांस दुकार्नें घालण्यास प्रवृत्त करितो. इतक्या अनर्थांतूनही खऱ्या स्त्रीरत्नांना आपल्या तेजानें, अक्कलेनें आणि समयसूचकतेनें पार पडण्यास भगवान् कसें सामर्थ्य देनात याविषयीं प्रत्यक्ष घडलेल्या कांहीं गोष्टी दाखल करितों.

## गोष्ट १. सति-प्रभाव.

पुण्यपत्तनांत ब्रह्म-पातशाहीच्या पवित्र व नीतिप्रचुर अमलांत दप्तर कचेरींतील एका सामान्य कारकुनाची स्त्री केवळ विद्युल्लता होती. तिच्या लावण्यानें एक राजपुरुष वेडा झाला आपण कोण, रयतेशीं आपलें नातें काय हें कांहीं मनांत न आणतां त्यानें कांहीं समारंभाच्या निमित्तानें त्या पतिव्रतेस आपल्या घरीं आणून एका खोलींत आपण छपून बसून, वाडा दाखवीत दाखवीत त्या खोलींत तिला आणविलें, आणि ते राजेश्री कडी कावूं लागले. तें पाहून ती विद्युल्लता प्रलयकालाप्रमाणें सद्गुणतेजानें कडाडून म्हणाली, " ब्रह्म-पातशाहीचे दिवस भरले काय ? आम्ही रयत आपल्या मुली. आमचें लालनपालन पितृवात्सल्यानें करावें, हा धर्म सोडून सत्यनाश करून घेण्याची आकाबाई कां आठवली ? ध्यानांत ठेवा, हातांतील चांगडी फोडून त्या काचेनें आपला प्राण घेतें, पतिव्रतेचें बल जगास दाखवितें, " असें म्हणून हात आपटणार, तों सद्गुणाच्या प्रखर तापानें राजश्रीच्या मनांतील दुष्ट कामराज मरून गेले ! आणि जो मस्तक छत्रपतीवांचून किंवा देवब्राह्मणांवांचून दिल्लीपतीपुढें सुद्धां नम्र होणारा नव्हता तो मस्तक मातोश्री म्हणून त्या सतीच्या पायांवर ठेवून झाला प्रकार कोणास सांगूं नये अशी विनंती त्या राजपुरुषानें केली. " या देशाच्या मालकापाशीं चोरी होणें नाहीं, त्यांजवांचून कोणास कळविणार नाहीं. " असें वचन देऊन, आपलें सत्व राखलें, आणि राजा आपला पिता म्हणून त्यास कन्याभावानें नमस्कार करून ती पतिव्रता आपल्या पवित्र घरीं आली.

आल्याबरोबर आपल्या देवास ( पतीस ) नमस्कार करून झालेला प्रकार चरणीं निवेदन केला. तो ऐकून त्या दैवशाली गृहस्थाच्या मनोवृत्तींत आनंद आणि भय ह्यांस राहण्यास जागा पुरेनाशी झाली, यामुळें ते मनोधर्म त्याच्या चर्येवर वाहूं लागले. " मनुष्यासच काय, देवादिकांस दुर्लभ असें हें स्त्रीरत्न, भगवंता, मज दुर्बळास आपण दिलें ह्याचें रक्षण माझ्यानें कसें होईल ! ह्या

प्रसंगीं आपण रक्षण केलें असेंच जन्मभर करा. " असें म्हणून तो चिंताक्रांत झाला. अशी दुर्वासना ज्या राजास झाली त्याच्या छत्राखालीं त्याच्याच ताबेदारींत राहणें निर्भय नाहीं. काशीयात्रेस जावें असा त्या उभयतांनीं विचार ठरविला. दुसऱ्या दिवशीं तो कारकून दप्तरदाराकडे जाऊन आपल्यास नोकरी सोडून काशीवासास जाण्यास परवानगी व्हावी अशी त्यानें विनंती केली असतां पुढें लिहिल्याप्रमाणें संवाद झाला.

**दप्तरदार**—बाबारे काशीवासाचे दिवस अजून फार लांब आहेत. श्रमसाहस करून नांवारूपास येऊन आनंदानें प्रपंच करण्याचे हे दिवस. तुला मोठें भय उत्पन्न झालें आहे, कोणी तरी जबर शत्रु तुला उत्पन्न झाला असें तुझी चर्या सांगत आहे. तुझा शत्रु मला सांग, मी त्याचा प्रतिकार करून तुला भयापासून मुक्त करीन. तुझें भय मजकडून दूर न होईल तर लेखणी गणपतीस वाहून मीही तुजबरोबर काशीवासास येईन. हीच माझी प्रतिज्ञा.

**कारकून**—( डोळ्यांस पाणी आणून हुंबरडा फोडून ) रावसाहेब, माझ्या शत्रूचा प्रतिकार करण्याचें सामर्थ्य परमेश्वरावांचून कोणासही नाहीं.

**दप्तरदार**—हं समजलों. श्रीमंतांवांचून इतका सामर्थ्यवान कोण ? त्याजपासून तुला भय उत्पन्न झालें आहे. पण फिकीर नाहीं. त्यांस सुद्धां शिक्षा लावण्यास आम्हीं पुरातन नोकर समर्थ आहों. खरा प्रकार बेलाशक सांग. माझ्या प्राणास धक्का लागेल तेव्हां तुझ्या केंसास भय हें लक्षांत ठेव.

**कारकून**–रावसाहेब, असें किहो झालें !

**दप्तरदार**–( संतापानें लाल होऊन ) अशा आकाबाईचे डोहाळे होऊं लागले काय ! आह्मांस लेकी सुना आहेत. उद्यां आमच्यावर प्रसंग कां न येईल ? उपेक्षा होत गेली, कीं परवां फडणिसांवरही गुजरेल. धन्य ती साध्वी आणि धन्य तूं. अशीं पवित्र माणसें असतील तेथें उणें काय पडेल ? तूं आतां स्वस्थपणें घरीं रहा. मी आपल्या मार्गास लागतों, आणि त्या श्रीमंतास वठणीस आणतों.

याप्रमाणें कारकुनास घरीं लावून दप्तरदारानें दप्तर बंद करून टाकलें. दाखले पुरावे कोणास मिळेनासे होऊन बोभाट श्रीमंतांकडे जातांच त्यांनीं मनांत

ओळखून दप्तरदारास एकांतीं बोलावून झालेल्या गोष्टीबद्दल क्षमा मागून घेतली, व पुनश्च कुळवधूवर कन्यावात्सल्य ठेवण्याविषयीं शपथ घेतली. दप्तरदारानें यथास्थित कान टोचून दप्तर खुलें केलें.

## गोष्ट २.–चातुर्यखाणी.

पुण्यपत्तनांत एका गरीब साध्या भोळ्या कारकुनाची स्त्री केवळ रंभा होती. तिला पाहून दिवाणजी दिवाणे झाले. त्यांनीं त्या कारकुनाशीं विनाकारण धुसफूस चालविली. बिचारा कंटाळला. कारण तें त्याच्या भोळ्या मनास कळेना. एके दिवशीं तो खिन्न होऊन बसला. दिवाणजीकडून अंतस्थ खटपट चालली होती व यजमान धुसफुशीबद्दल नेहमीं बोलत होतेच. तेव्हां सुतानें स्वर्गास जाणाऱ्या त्याच्या स्त्रीनें सर्व कवटाळ ओळखून यजमानांस विनंति केली कीं, माझ्या सांगण्याप्रमाणें चालाल तर ही कटकट मी नाहींशी करून टाकतें. तिच्या चातुर्यावर व करतबगारीवर यजमानांचा पूर्ण भरंवसा होता, व धुसफुशीमुळें त्रस्त झाले होते म्हणून त्यांनीं ती सांगेल तसें वागण्याचें कबूल केलें.

दिवाणजीस आपल्या घरीं जेवण्यास बोलवा असें तिनें सांगितलें. आपण पामर, आपल्या येथें ते कसे येतील, अशी शंका पतीनें घेतली. तिनें सांगितलें तुम्ही बोलावण्याचा उशीर, ते एका पायावर येतील. कारकुनानें जाऊन विनंति करतांच स्वारीनें अमक्या वेळीं सडाच येतों असें कबूल केलें. कारकुनास मोठें आश्चर्य वाटलें. भोळा बिचारा! विधि, हरि, हर सुद्धां स्त्रियांचे दास झाले हें त्याचे लक्षांत येईना. कीचक ज्याप्रमाणें दिवस केव्हां मावळेल म्हणून वाट पाहत होता, त्याप्रमाणें दिवाणे दिवाणजी वेळेची वाट पाहून वेळ होतांच बोलावण्याची सुद्धां गरज न ठेवतां हजर झाले.

स्त्रीनें लागलेंच एक पान वाढून पतीस त्या पानावर जेवण्यास बसण्यास सांगितलें. दिवाणाच्या समक्ष तो कारकून एकटा जेवण्यास बसला. प्राणाहुति घेऊन दोन घांस घेतांच उठण्याविषयीं बायकोनें सांगून दिवाणास पाठविण्यास सांगितलें. दिवाणजी येतांच उष्ट्या पात्रावर बसण्याविषयीं खूण केली. दिवाण खजील होऊन चकित उभे राहिल्यावर ती चातुर्यखाणी म्हणाली, "हें उष्टें

एक वेळचें असून किळस कां ?–मी उष्टें निरंतरचें असून ह्याच्याविषयीं इतका प्रयत्न कां वरें ! आम्ही प्रजा, आमचें लालनपालन कन्यावात्सल्यानें करण्याचा अधिकार विसरून विपरीत इच्छा करावी काय ? ह्या दुष्ट वासनेनें रावण दुर्योधनादिक ऐश्वर्यांस, प्राणास आणि कुळास मुकले हें नाहीं का ठाऊक ?" हा बोध कानीं पडतांच दिवाणजीची अक्कल जाग्यावर आली. त्यांनीं त्या चातुर्यखाणीस साष्टांग नमस्कार घातला, आणि मातोश्री, झालेला अपराध क्षमा करा असें ह्मटलें. तेव्हां हेंच खरें, तर आतां जेवण करून जावें असें ह्मणून तिनें निराळ्या जागीं मांडलेल्या पानांवर उभयतांस बसवून जेवण्यास घालून संतुष्ट करून दिवाणजींची बोळवण केली.

## गोष्ट ३.–प्रसंगावधान.

एक सद्गुण स्त्री एका खिंडींतून जात असतां एक हत्यारबंद चांडाळ तिला मोहित होऊन तिच्यावर बलात्कार करण्यास सिद्ध झाला. कोणी त्राता तर नाहीं, प्रसंग तर बाका, असें पाहून तिनें लागलीच त्यास अनुकूलता दाखविली, आणि त्यास विश्वास येण्याकरितां वस्त्रादि त्याग करून जागा साफ करण्यास सूचना केली. कामातुर मनुष्यास विचार थोडाच, त्यानें समशेर खालीं ठेवली, आणि वांकून जागा साफ करूं लागला. इतक्यांत त्या पटाईत स्त्रीनें त्याचीच तरवार घेऊन त्याचीं खांडोळीं करून टाकिलीं !

## सूचना.

सद्गुणी कुलवधूनों, वर लिहिलेलीं व तशाच प्रकारचीं दुसरीं स्त्रीचरित्रें जीं जीं तुमच्या कानीं पडतील तीं तुम्ही आपल्या हृत्पटिकेवर कोरून ठेवून वारंवार तीं आठवीत असा. भगिनींनों, उभयकुलोद्धार करण्याचा अधिकार तुम्हांस आहे, तसा पुरुषांस नाहीं; म्हणून तुमची योग्यता कांकणभर जबरच आहे. पुरुषांनीं कितीही दिमाख केला तरी मातोश्री म्हणून त्यांनीं तुम्हांसच वंदन केलें पाहिजे. योग्यतेबरोबर जबाबदारी वाढत असते. तुम्ही दुर्वृत्त झाला तर उभय कुळांस नरकांत ढकलाल हें लक्षांत ठेवा. परमेश्वरानें तुमच्या ठिकाणीं मोहकपणा ठेविला आहे. तेवढ्यावर तृप्त न होऊन अविचारें पुरुषांनीं नानाव-आभरणें व अलंकारभूषणें आपली कमाई सचून तुम्हांवर चढविलीं आहेत, तेणें-

करून तर तुमच्या लावण्याचा प्रभाव सर्वांस दुर्जय होतो. विचारी नर आत्मसंयमनानें शुद्धीवर असतात. श्रीमत्त, सत्तामत्त, अधिकारमत्त आणि कुसुमचापाच्या पंचशरांनीं विद्ध झालेले नर ह्यांची झडप केव्हां कोठें आणि कशी तुमच्यावर पडेल ह्याचा नेम नाहीं. दैवदुर्विलासानें सध्या आपला समाज अत्यंत विपत्तींत सांपडला आहे. धर्म व नीति अस्तास चालली आहे. सर्वश्रेष्ठता द्रव्यास प्राप्त झाली आहे. ह्यामुळें, किंवा अविचाराचा जिकडे तिकडे पर्वकाळ झाला आहे यामुळें, नव्या समजुतीचें म्हणवून घेण्याकरितां, किंवा रोजगार, अधिकार, सन्मान मिळविण्याकरितां कोणी कुलवधूचे पति किंवा पालक दुर्वासना नसून ही कुलमर्यादा सोडून स्त्रीजनास यजमान संस्थानिकांकडे किंवा साहेबलोकांकडे मुलाखतीस समारंभास पाठवितील. दुसरेही प्रसंग कदाचित् येतील. अशा वेळीं तुम्ही वरील सच्चरित्रें आठवून गंभीरपणानें प्रसंगावधान राखून वागून आपलें सत्व राखा.

बांधवहो, आर्य म्हणून सर्व दुनिया ज्यांस वंदन करीत असे, त्यांचे आपण वंशज आहों. किती हीन दीन अवस्था आपल्यास प्राप्त झाली, तरी सद्गुण हेंच आपलें खरें वंशपरंपरेचें ऐश्वर्य आहे हें लक्षांत ठेवून ह्यास जिवापलीकडे मानून जपा. धनदौलत दुपारची सांवली आहे, ती गेल्याचा खेद मानूं नका. सद्गुणसंपत्ति जसजशी वाढेल तसतशी दौलत मिळेल हें ध्यानांत ठेवा. केवळ धनासाठीं किंवा पोकळ सन्मानाकरितां नीच कर्म तुम्हीं कधीं करूं नका. सिंहाचा छावा उपाशीं मरेल पण गवत खाणार नाहीं. वेळ पडली तर भीक मागून पोट भरण्यांत कांहीं लाज नाहीं, परंतु आपल्या कुलवधूस जपा. वरील चरित्रांतील कारकून व दप्तरदार ह्यांचा बाणा सर्वकाळ लक्षांत ठेवा. तशा योग्यतेचीं माणसें होतीं तोंपर्यंत पुणें शहरांत ऐश्वर्य भरलेलीं होतीं. " राजा कालस्य कारणं " होऊन पुणें शहरामध्यें कुंकुंशाही माजल्याबरोबर कसा अनर्थ झाला पहा ! दुर्वृत्त स्त्रियांच्या पलटणी तयार झाल्या. कनक, वस्त्रें व अलंकार बक्षीस मिळविण्याकरितां टाकीं लावतां येत नाहींत असे प्रकार होऊं लागले. कात्यायनीव्रताच्या चित्रापेक्षां शंभर पटीच्या निर्लज्ज प्रकारच्या चित्रांच्या तसबिरी पुणें शहरांत घडत असलेल्या प्रकारांच्या खुलाशाकरितां विलायतेंत गेल्या. याचा परिणाम आपण प्रत्यक्ष

भोगीत असून आणखी किती दिवसांच्या नशिबीं हें प्रायश्चित्त भोगावयाचें असेल तें असो. " विपत् कालीं धैर्य " हें वाक्य ध्यानांत ठेवून धैर्यानें सत्व राखून दिवस काढा. उपासाअंतीं पारणें आहेच.

## रूप.

रूपासारखा घोटाळा तर कोठेंच नाहीं. ह्याला खऱ्याहून खोटेंच प्रिय आहे. गुलाब, शेवती, कमळें, पारिजात इत्यादि फुलें आणि नानाविध वेली किती सुंदर, मोहक, सुवासिक, आणि स्वाभाविक आर्द्र-तेज परिप्लुत असतात! त्याचा आपण विचार करतों काय? त्याच्या सौंदर्याची खुबी, गंधाचा मोहकपणा, तेजाची नवाळी, ते निर्माण करण्यांत निसर्गाची खर्च झालेली करामत आणि कारागिरी, त्यांच्या अंगीं नुसत्या करमणुकीशिवाय प्राण्याच्या शरीरप्रकृतीवर इष्टानिष्ट परिणाम घडविणारे असलेले अनेक धर्म, ह्यांचा विचार आपण कधीं तरी केला आहे काय? ते सर्व विचार त्या त्या शास्त्रांच्या वेत्यांकडे सोंपवून आपण मोकळे. ते पदार्थ निर्माणकर्त्यांची अगाध करणी लक्षांत येऊन त्याच्याकडे आपलें मन कधीं तरी वेधलें आहे काय? पण लांकडाचे तुकडे, धातूचे पत्रे, मातीचे गोळे, दगड, धोंडे, कागद, रांगोळ्या, कपडे, नळे व फुलबाज्या, त्यांमधील कृतीचीं फुलें आणि वेली पाहून मात्र आपण वेडे होतों. हजारों तोळे सोनें, रुपें, हजारों शेर रेशीम, लोंकर, रंगाचें सामान व कलाबतु; सालोसाल खर्ची पडून शेवटीं नाहींशीं होऊन जात आहेत, त्या सर्व पदार्थांच्या पायीं निढळाच्या घामानें मिळविलेलें द्रव्य व्यर्थ जात आहे. खऱ्या पत्रपुष्पांच्या सहस्रांश तरी रमणीयता, तेज किंवा सुगंध त्यांत आहे काय? बाजारांत दर रोज नानाप्रकारच्या फळांचे ढीग पडलेले असतात, त्यांतील एखादें फळ हातीं घेऊन सूक्ष्म निरीक्षण करून त्यांतील अजब कारागिरी लक्षांत आणून आनंदानें मन थक्क होऊन तें निर्माण करणाऱ्याला अनन्यभावें कोणी तरी शरण गेला आहे काय? पण फळाकृति विलायती, किंवा गोकाकचे मातीचे गोळे किंवा लांकडाचे तुकडे पाहून दिलखुष होणारांची गर्दी त्या तुकड्यांभोंवतीं मोहळाच्या माशांप्रमाणें जमते. येवल्याच्या शिकारखानी खणाच्या कांठांतील लुटुपुटीचा शिकारखाना

पाहून त्यावर मरून पडणाऱ्या शेंकडों स्त्रिया आणि त्यांच्या लाडाकरितां आपण सर्वघातक ऋणाच्या पाशांत सांपडून त्यांचे सोहळे पुरविणारे दादुले असतात. इंड्या, झुंबरें वगैरेचे आकार दिलेलीं नानारंगी मडकीं यांत तेल, कापूस अथवा मेणबत्त्या ह्यांस अग्निस्पर्श करून त्यांची स्थापना करून जिकडे तिकडे लखलखाट केला म्हणजे शेंकडों नरनारी मौज पाहण्यास धांवतात ! काय पाहतात कोण जाणे ! रोज आपल्या घरीं दिवे लागतात त्यांत व ह्या दीपसमारंभांत फरक काय ?

## नक्षी.

या विषयाची अशी कांहीं गंमत आहे कीं, ह्याला सरळ साधें म्हणून आवडतच नाहीं. चांगल्या रंधून तुळया साध्या घातल्या तर नाहीं का चालत ? पण तें नाहीं उपयोगी. त्यांस गोलची पाहिजे, आणखी नक्षी असेल तर " अहं विशेषः, अधिकस्य अधिकं फलं. " दोहों खांबामध्यें असलेला अवकाश नुसता चौकोनी उपयोगी नाहीं, तेथें वांकडी तिकडी कमान पाहिजे. पण तो वांकडेपणा मात्र ठरलेल्या नमुन्याचा पाहिजे. तीही साधी कमान नको. तिजमध्यें आणखी फुलें, राघू, वेल, कमळें, चित्रें पाहिजेत. सरळ गजांची किंवा लांकडांची जाळी उपयोगी नाहीं, तींच लांकडें तिरपीं ठेवून केलेली जाळी गोड. जितकी जितकी कारागिरी म्हणजे ठरलेल्या नमुन्याचा वांकडेतिकडेपणा व अवघडपणा असेल, तितकें मन पाघळूं लागतें !

## रुचिवैचित्र्य.

ह्या विषयांत रुचि-वैचित्र्य आहेच. इकडचे लोक गर्द रंग चाहतात, साहेब लोकांस फिक्कट रंग आवडतात. इकडील लोकांस घोटाळ्याची गिचमीड नक्षी आवडते. साहेब लोकांस साधी नक्षी व सफाई पाहिजे. युवति-सौंदर्य व युवति-लीला पाहण्याकरितां मरून पडणारे हजारों लोक आहेत ( या युवतिस्वरूपाचा मर्मभेद नुकता झालाच आहे ). युवति-स्वरूप व युवति-चेष्टितें हीं निरनिराळ्या जातींत निरनिराळ्या प्रकारचीं आवडतात.

## नित्य नव्या तऱ्हा.

पंचविषय मिथ्या मानीव आहेत ह्याविषयीं स्पष्ट खात्री होण्यास या रूप-

विषयाचा एक प्रकार फारच मोठें प्रमाण आहे. मनुष्याची रहाणी व पोषाख ह्यांच्या पद्धति हमेशा बदलत असतात. यूरोपांत " फयाशन " म्हणून एक मोठेंच बंड आहे. आपलेंच आपण पाहूं. या छत्रपति, पाटीलबुवा आणि हल्लींचा साहेबी पोषाख करणारा एखादा राजा, ह्यांच्या तसबिरी शेजारीं ठेवून पाहिलें असतां छत्रपति केवळ मुसलमानासारखे दिसतात. पाटीलबुवा शुद्ध मराठी बाण्याचे दिसतात. हल्लींचे महाराज कसेसेच दिसतात. पूर्वींच्या तसबिरी पाहिल्या आणि हल्लींच्या पाहिल्या तर विलक्षण फरक दिसतो. त्या वेळच्या छेलछबेल्या वारांगनेच्या तसबिरीपेक्षांही हल्लींच्या कुलवधूंच्या तसबिरी नखरेबाज दिसतात. " राजा कालस्य कारणं " म्हणतात तें खोटें नाहीं. पेशवाईतील ब्राह्मणांच्या तसबिरी पाहिल्या असतां द्विजत्व व शुचित्व दाखविणारीं दुबोटीं आडवीं, उभीं गंधें स्पष्ट दिसतात. लांबून पाहिलें तरी पूर्वीं ब्राह्मणांचीं व सुवासिनींचीं शुचित्व-चिन्हें स्पष्ट दिसत असत. हल्लीं समोर जर कोणी स्त्री आली तर सुशकुन होतो आहे कीं अपशकुन होतो आहे, हें पाहण्याकरितां ती जवळ येईपर्यंत थांबून ' परस्त्रीमुखावलोन करूं नये ' असें इच्छिणारास सुद्धां तिच्या मुखाकडे पाहावें लागतें ! एखाद्या गृहस्थास नमस्कार करावा किंवा नाहीं, हें ठरविण्यास गंध नसल्यामुळें अन्य स्थितीचा विचार करावा लागतो. 'गंध लावून अंगास रंगविणें हा रानटीपणा आहे,' असें एका टोंकावरचे लोक ह्मणूं लागले आहेत,तर दुसऱ्या टोंकावरील तो अलंकार म्हणतात. मधली मंडळी लावलें लावलें, नाहीं नाहीं करते. पोषाखांत तर नित्य नवे प्रकार होत आहेत शरीराचा स्वाभाविक भव्यपणा गेला, तेज गेलें, सामर्थ्य गेलें; तेव्हां बालसंतोषाप्रमाणें एकावर एक बंड्या, जाकिटें, कुडत्या चढवून पोकळ अंगरखे घालुन अंधळा डोळा काजळानें साजरा करितात ! किरीट कुंडलें रत्नहारादि अलंकार पूर्वींच गेले; भिकबाळ्या, शिरपेच, तुरे गेले; म्हणून डोक्यावर केंस किंवा पागोट्याबाहेर लोंबणारे संजाब ठेवून दुधाची तहान ताकानें भागविली जाते! कांहीं दिवस पागोट्याचें जें बंड माजलें, तें शेवटीं २०० हातांचें चाका एवढें पागोटें करून 'वर्तकानें' संपविलें. पुढें लहान लहान पागोटीं होतां होतां भार सोसण्यास असमर्थ डोकीं झालीं!

तेव्हां " इष्टं धर्मेण योजयेत् " असें होऊन शेणाचीं टोपलीं ( पगड्या ) डोक्यावर घेतल्या ! लवकरच त्याही जाऊन नुसत्या टोप्याच सर्वत्र होणार! ( टोपी बसण्याची वेळच आहे. ) तुम्ही आमचें अनुकरण करूं नका असें लाट-साहेबांनीं सांगण्यापर्यंत मजल आली ! तात्पर्य, रूपविषय केवळ गतानुगतिक आहे, यांत तत्त्व कांहीं नाहीं. " एका शितावरून सगळ्या भाताची परीक्षा " या न्यायानें बाकीचे विषयही तसेच असावे व आहेत हें पूर्वीं सिद्ध झालेंच आहे.

## रसरुचिवैचित्र्य.

गोड, कडु, तिखट, आंबट, खारट आणि तुरट हे षड्रस तरी स्वयमेव रमणीय आहेत काय ? असते तर ते सर्वांस सारखेच प्रिय असते. " पिंडे पिंडे रुचिर्भिन्ना " असा प्रकार होऊन कोणास गोड, तर कोणास तिखट, तर तिसऱ्यास आंबट आवडतें. तिखट पदार्थ सर्वांसच तिखट लागावा,पण राघू मिर्ची गुळाच्या चवीनें खातो. तो पक्षी; पण माणसांत सुद्धां एक प्रकार कोठें आहे! शुद्रांस तिखट फार लागतें, यजुर्वेद्यांस त्याच्याहून कमी, देशस्थांस त्यांच्याहून कमी,त्यांच्याहूनही कोंकणस्थांस कमी, गुजराथ्यांस तर सर्वांत कमी.यजुर्वेदी व देशस्थ यांस आंबट वर्ज पण द्राविड तेलंग ह्यांस तेंच कुलदैवत.कडु सर्वांस अप्रिय, तरी बाजारांत कारलीं नेहमीं खपतात. अफू, कुचला वगैरे कडु पदार्थांचा अंमल करणारास ते पदार्थ प्राणापलीकडे आवडतात; तथापि तेच लोक इतर कडू पदार्थांस शिवत नाहींत. गोड साधारणतः सर्वांसच प्रिय, पण तैलंग लाडू, जिलब्या टाकून वडे, चकल्याच चाहतात. फोडणीचें ताक इतरांस आवडतें, पण तैलंगांस फोडणी नको, नुसतें आंबट ढसाण असेल तितकें पाहिजे. सारांश, रस स्वयमेव रमणीय नसून संवयीनें ते आपण रमणीय मानतों. एकेका वर्गास एक एक रस प्यारा आहे, त्यावरून तर ही गोष्ट ढळढळीत दिसते. समाजांत पहिल्यापासून जो रस आवडता मानला जातो त्याचेंच सेवन बाळपणापासून होऊन तो अंगवळणीं पडून आवडूं लागतो.

## गंध

गंधविषयही सर्वांस सारखा प्रिय नाहीं. लव्हेंडर वाटर ह्यानें सध्यां गुलाबपाण्याची जागा बळकाविली आहे. " मोर नाचतें म्हणून लांडोर नाचतें."

असल्या लोकांस मात्र त्याचा दर्प काय आवडत असेल कोण जाणें ! इतरांस तो मुळीच आवडत नाहीं. त्रासदायक होतो. मांसाहारी लोकांचे पदार्थ पाहूनच इतरांस ओकारी येते. तसल्या पदार्थांच्या बाजारावरून जातांना नाकास पदर लावावा लागतो. सुरेचा दर्पही सुरापान न करणाराच्या नाकांत सुऱ्याप्रमाणें मोसकीत जातो. तोच दर्प सुरापान्यास प्राणप्रिय वाटून उलट जादा त्यांचें चलकेलें असतें.

# भाग बारावा.

## मोहजालही मिथ्या.

वृक्षं क्षीणं फलं त्यजन्ति विहगाः शुष्कं सरः सारसाः ॥
निर्द्रव्यं पुरुषं त्यजन्ति गणिकाः भ्रष्टं नृपं मन्त्रिणः ॥
पुष्पं पर्युषितं त्यजन्ति मधुपा दग्धं वनांतं मृगाः ॥
सर्वः कार्यवशाज्जनोऽभिरमते तत्कस्य को वल्लभाः ॥ १ ॥

( सु. मा. )

## प्रेमबंधन.

पंचविषयांपासून भासणारें सुख मिथ्या आहे असें मागील भागांत सिद्ध झालें. आतां सर्व सुखें गोळा करून मालकाकडे पावतें करणारें व मोहजाल उत्पन्न करून आणखी अनेक सुखें व दुःखें उत्पन्न करणारें सहावें इंद्रिय ह्याजपासून भासणाऱ्या सुखाच्या व दुःखाच्या सत्यत्वाविषयीं विचार करूं. मायाजाळ हा विषय करून मोह आणि अभिमान ह्यांत मन गुंतून पडलें आहे. ह्या विषयापासून ज्ञानेंद्रियांस प्रत्यक्ष लाभ मुळींच नाहीं. तथापि जगाची सगळी रहाटी या मायाजालावरच चालली आहे. ह्याचें प्रेमबंधन अत्यंत नाजूक

असतां परम दुर्जेय आहे. भ्रमराचें सामर्थ्य मोठमोठीं बाहलेंही पोखरून टाकणारें आहे. त्याला अति सुकुमार रमाविलासस्थान चुरगळून टाकण्यास काय उशीर? पण तो मकरंदसेवनाच्या नादांत असतां कमल मिटलें म्हणजे तेथें बंदिवास आनंदानें पत्करून राहतो, पण त्यास धक्का लावीत नाहीं. निदान प्रस्तुत कालीं तरी मनुष्य प्राणी पूर्ण आपस्वार्थी आहे त्यापुढें परदुःख त्याच्या मनांत सुद्धां येत नाहीं. पण त्याला एकदां ममत्वानें पछाडिलें म्हणजे त्या भ्रमराप्रमाणें भ्रम पावून कोणाचें कोण, ओळख ना देख, असलें माणूस किंबहुना तें त्याच्या वैऱ्याच्या घरचें असलें तरी, एकदा त्याच्या ठिकाणीं कलत्राचें नातें स्थापन झालें, कीं त्याचें कंठमणी होऊन बसतें! त्याला ठेंच लागली कीं ह्याच्या डोळ्यांस पाणी येतें.

## मोबदला.

मायापाश खऱ्या हेतूचा आणि ज्याच्या ठिकाणीं असतो त्याच्याच मात्र हितासाठीं असतो काय, मुळींच नसतो. इतर सर्व व्यवहाराप्रमाणेंच हाही आपमतलबाकरितां आहे. आपल्यास मिळणाऱ्या मोबदल्याकरितां आहे. प्रपंच हा केवळ मायेचा बाजार आहे. "माया यावी तर माया द्यावी" हा येथील दस्तुर आहे. कलत्राची एकमेकांवर प्रीति असते ती केवळ ज्याच्या त्याच्या मतलबाकरितां व सुखाकरितां असते. बायको पंगु अथवा निरुपयोगी झाली कीं नवरा दुसरी पटकाविण्यास तयार. नवरा सामर्थ्यानें व द्रव्यानें कमी पडून पुत्राचा उत्कर्ष झाला कीं त्याची देवपूजा! आणि त्याच्या पुढें पुढें करून, बसा उगीच तुम्हांला कांहीं कळत नाहीं, उगीच मेली कटकट लावावी. लेंकरूं दमून मागून आलें तरी उगीच बसूं द्यावयाचें नाहीं. कोण मेला त्रास हा! असा नवऱ्याचा उपमर्द करण्यास बायको तयार!

## जीव प्यारा.

जगांत लाभाविणें प्रीतीचा आणि खऱ्या ममतेचा जर कोठें लेश असेल तर तो जननीच्याच ठायीं असणार. मानवेतर योनींतील जननीचे ममतेस मोबदला कोठें कोठें असतो, पण त्या परमपूज्य पवित्रस्थळीं तरी बेटा प्याग कोठवर, स्वतः

च्या जीवावर बेतली नाहीं तोंपर्यंतच. तसा का प्रसंग आला कीं जीव त्यारा ठर-केलाच. या गोष्टीची बालोबाल खातरी दुष्काळ आणि ग्रंथिक सन्निपात ह्यांनीं करून दिली आहे व अद्यापि करीतच आहेत. कालियाच्या डोहांत भगवान् निमग्न झाले तेव्हां माय यशोदा खेरीजकरून बाकीचे मायेचे गोंधळी यांविषयीं खातरी होतीच कीं, हे सर्व डोहाच्या बाहेर रडत बसतील. त्या विषकुंडांत उडी कोणीही मायेचा पूत घालणार नाहीं. न जाणो माय यशोदा दुःखभरांत उडी घालील असें वाटून तिला वरच्यावर झेलून घेण्यास नारायण उभे राहिले होते. तिनें उडी घातली असती तर मायेच्या पूर्वी बाळ मरूंच नये असा निर्बंध प्रभु करणार होते. पूर्वीच्या अनेक पराक्रमावरून कर्तुं अकर्तुं अन्यथा कर्तुं समर्थ भगवान् आहेत अशी खातरी वाटण्यास भरपूर कारणही होतें. तथापि मायापटलानें घेण्यास कृष्णमातेलाही सोडलें नाहीं. ती डोहाच्या भोंवतीं धाय धाय रडत फिरली.पण तिची उडी घालण्याची छाती झाली नाहीं. कशी होणार! ती उडी घालती तर जगाचें नष्टचर्य जातें ना !

## आस का बाप.

पुत्राला आत्मा म्हणविलें आहे. जगांत ह्यापेक्षां प्रीतीचा ठाव दुसरा नाहीं. पण तोच का मिळविता नसला म्हणजे बापास भारावह होतो. त्याच्यावर ममत्व असेपर्यंतच त्याच्यावर प्राण असतो. तोच मुलगा दुसऱ्यास दत्तक दिला आणि त्याच्याशीं अर्थार्थी संबंध नाहींसा झाला कीं ममता नाहींशी होते; निदान कमी तरी पडते. गळ्यांतल्या ताइताप्रमाणें किंवा तळहातावरील फोडाप्रमाणें बाळगलेला मुलगा दुसऱ्या भावास दत्तक देऊन विभक्तपणा झाल्यावर कांहीं क्षुल्लक कारणावरून तंटा उत्पन्न झाल्यावर तोच पुत्रस्नेह पार अस्तास जाऊन, प्रखर शत्रुत्व उत्पन्न होतें. त्याच्या मरणाची सुद्धां इच्छा शत्रु बनलेला बाप करूं लागतो. कैक दुर्दैवी बापलेक तर संबंधांत बदल झालेला नसताही एकमेकांचे शत्रु बनतात. दिवसानुदिवस इतका विपरीत काल येऊं लागला आहे कीं, प्रत्यक्ष पिता, किंवा बालपणीं नष्ट झालेल्या पित्याचीं पोरकें निराश्रित लेंकरूं यांचा पितामहच एका लेकाचे मुठींत वागून त्या निराश्रितांचा चुराडा करण्यास पाहतो.हरहर! परमेश्वरा, अशी विकाळ निर्द-

यता माणसाच्या ठिकाणीं वाढली तर जगाचें संगोपन तरी कसें होईल ? अन्यपक्षीं दुसऱ्याचें पोर दत्तविधानानें आपलें झालें अशी समजूत झाली कीं, आपल्या पोटच्या लेकी, दौहित्र यांस हालांत ठेवून त्याची मरती तो मर्जी-प्रमाणें वागत असला म्हणजे बाप करीत असतो. ह्यावरून हा सर्व मायेचा गोंधळ निव्वळ आपमतलबी आहे, ह्यांत खरें कांहींच नाहीं. " आसका बाप " म्हटलें आहे तेंच खरें. पंत म्हणतातः—

## श्लोक.

॥ सुविद्य धन मेळवी वचन आयके आवरी ॥
॥ प्रपंचभर घे शिरीं करि कृपा पिता त्यावरी ॥
॥ असा जरि नसे रुचे तरि न तो अभद्र क्षण ॥
॥ तसा तुजचि आवडे करिसि तूंच तद्रक्षण ॥ १ ॥

## अन्वर्थक संज्ञा.

वनस्पतींच्या मुळाप्रमाणेंच हीं मुलेंही प्रपंचाचीं व तत्संबंधीं सुखदुःखाचीं आणि इहपर सुदुर्गतींचीं मुळेंच आहेत. पुत्राची ममता आईबापांवर कितपत असते, आणि कितपत असण्याचा संभव आहे ह्याचा आतां विचार करूं. प्रपंच हा केवळ व्यवहार आहे हें आपल्यास कळून चुकलेंच आहे. व्यवहारांत जों-पर्यंत गरज असते तोंपर्यंतच गरजवंत गरज करणाऱ्याच्या मजनीं असतो. "जबलक सेत मे दोरी तबलक दिवाण दिवाण" हा प्रकार स्वाभाविकच आहे. गरज सरल्यावर केवळ पूर्वकृत उपकारांकरितां कृतज्ञता स्मरून उपकार करणारांशीं उपकार करून घेणारा कितीसा इमानानें वागतो हें दिसतच आहे. खरा इमानी, लौकिकास भिणारा आणि पापभीरू पुत्र असेल तर इमानानें वागतो. पुत्रानें मातापितरांची सेवा करण्याचें आणि त्यांच्या आज्ञेंत वागण्याचें तें मागें होऊन गेलेल्या मोबदल्याकरितां असतें. चालू सुख त्याला निराळ्या स्त्रीकडून व तिच्या परिवाराकडून मिळावयाचें असतें. तेव्हां अर्थात् त्याचा सगळा भर पुढेंच असणार, तो साधून त्यांतल्यात्यांत आईबापांच्या वाट्यास त्यांच्या व पुत्राच्या नशिबानें येईल तें येईल.

## धर्मसंतान.

कन्या बोलूनचालून धर्मसंतान. तिचें सर्व जीवित पराधीन. तेव्हां तिजपासून मातापितरांस काय सुख होणार ? तिलाच त्याची जन्मभर आशा असणार. तिची एक कवडीसुद्धां मातापितरांस शिवनिर्माल्य मानिली पाहिजे. ती काळजीचें मूळ होय. कन्येच्या उदाहरणावरून माया केवळ मोबदल्याकरितां आहे, हें तंतोतंत ठरतें. कन्या आणि पुत्र ह्यांच्यांत तत्वतः पाहतां तिळमात्र तरी फरक आहे काय ? तनय काय आणि तनया काय दोन्ही तनूद्भवच. असें असतां कन्या झाल्याचें ऐकिल्याबरोबर तीर्थरूपांचा मुखचंद्र म्लान कां बरें व्हावा ? घरांतील सर्व माणसें खट्टू कां व्हावीं ? परक्यांनीं सुद्धां नाकें कां मुरडावीं ? तन मन धन सर्व तनयाला अर्पण करून मरेपर्यंत देह झिजवून आणि पापताप जोडून आणखी त्याची भरती करण्यांत मोठा आनंद मानतात; पण तनयेच्याकरितां तिच्या विवाहकालीं एक वेळ आपल्या शक्तीप्रमाणें खर्च करण्यास मात्र प्राणसंकट वाटतें. खरें पाहिलें तर एकदां खर्च करून तिला भरल्या गव्हाणींत लोटलें तर त्या घराण्याच्या मोठ्या संपत्तीची ती मालकीण होते. हा मोबदला लहान आहे काय ?

## वेडी समजूत.

हातचें पदरचें सर्व खर्चून पुत्राला वाढविलें, वर्तविलें, विद्यालयांत पाठविलें, म्हणजे तो भाग्यवान होईल असा, आणि झालाच तर आपल्याला सौख्य देईलच असा तरी नियम आहे काय ? पुत्र सुशील निघाला तरी म्हातारपणीं गोळाभर अन्न, साधें वस्त्र, आणि सुखाचा शब्द ह्यापेक्षां कशाची अपेक्षा मातापितरांस असते ? मुलाच्या उत्कर्षामुळें त्यास होणाऱ्या सुखानेंच आईबापांस सुखी व्हावयाचें असतें; तसेंच मुलीच्या सुखानेंही सुखी होतां येत नाहीं काय ? आणि ती सुखी होत नाहींत काय ? मुलीच्या अनेक अडचणींची जबाबदारी तर तिच्या घराण्याकडे असते. तेव्हां मुलापेक्षां सुद्धां मुलगीच बरी. पण अनादिकालापासून हाडीं खिळलेल्या वेड्या समजुतीमुळें मुलाचें सुख व भाग्य तें मात्र आपलें, आणि मुलीचें तें परक्याचें. मुलगी परधन, असा ग्रह बनून गेला आहे, ह्यामुळें केवढा अनर्थ झाला आहे पहा. तनय चतुर्भुज ( लग्न ) करण्याकरितां किंवा त्याचा तळिराम गार करण्याकरितां तनया

विकणारे किंवा मोबदला देणारे आणि तिच्या जन्माचें मातेरें करून धन गोळा करणारे मार्जारवृत्तीचे ( पोरें-खाऊ ) लोकही आढळतात. तात्पर्य, ममत्व ( आपलेपणा ) तिच्या ठिकाणीं न मानल्याकारणानें असा प्रकार होतो.

## प्रत्यक्ष प्रमाणें.

माया केवळ आपल्या मतलबाकरितां आहे ह्याविषयीं आणखी प्रत्यक्ष प्रमाणें पहा. निर्मळ प्रेम करणारीं कलत्रें यांचा केवळ तादात्म्य झाल्याप्रमाणें संबंध असतो. त्यांच्या प्रीतींत बिघाड होईल असें त्यांच्या स्वप्नांत सुद्धां वाटत नाहीं. उभयतांही सद्वर्तनी व सुशील असतात. दैवयोगानें संततीचा भाव किंवा दुसरें एखादें कारण यानिमित्त संसारांत न्यूनता भासूं लागली म्हणजे ती सुशील पत्निच प्रपंचाची पूर्णता संपादन करण्याकरितां नवऱ्याच्या गळ्यांत द्वितीयसंबंध मोठ्या हौसेनें बांधिते. सवतीचा व आपला बेबनाव न व्हावा म्हणून मोठ्या चातुर्यानें सावधगिरी ठेवून आपली सहोदरी किंवा दुसरी एखादी जिव्हाळ्याची मुलगीच तिनें सवत केलेली असते. इकडचा सूर्य तिकडे उगवेल, पण आपल्यास जीव कीं प्राण मानणारे यजमान आपल्यावरील प्रेम कमी करणार नाहींत. कार्याकारण दुसरी बायको केली म्हणजे प्रीतीचा विभाग होईल खरा, परंतु आपल्या मनास खेद होण्याजोगी वागणूक खचितच त्यांजकडून होण्याची शंकाही मनांत आणण्याचें कारण तिला वाटत नाहीं आपल्या सुनेप्रमाणें, निदान मुलीप्रमाणें किंवा बहिणीप्रमाणें मी तिला वागवीन असें तिला वाटत असतें. मानवी स्वभावांत आणि विशेषकरून स्त्रीजातींत अहंभाव व असूया ओतप्रोत भरलेली आहे. जें असावें तें मला असावें, सत्ता, मान काय तो मला असावा, नवऱ्यानें माझ्या मुठींत राहून माझ्याच ओंजळीनें पाणी प्यावें असें स्त्रियांस वाटत असतें. ज्येष्ठ पत्नीचे मनोरथ बरेच पूर्ण झालेले असतात. तिनेंच कारणाकरितां दुसरी करून दिलेली असते, म्हणून ती आपल्याकडून धाकटीच्या मर्जीस दुखवीत नसते. पहिल्यापासून ज्येष्ठेच्या हातीं असलेली सत्ता त्या नव्या पोरीच्या हातीं एकदम साहजिकच येत नाहीं आणि त्याबद्दलची कल्पनाही थोरलीच्या मनांत फारशी येत नाहीं. धाकटीचा प्रवेश झाल्याबरोबर तिचा प्रयत्न सर्व सत्तासाहेबीण होण्याचा चालू होतो. तिला वडिलांचें

महत्त्व दुःसह होऊन ती तिची सत्ता कमी करण्याविषयीं अनुदिन झटूं लागते. आघात झाला कीं प्रत्याघात व्हावयाचाच. आपणच आणलेली चिमुरडी आपलाच हेवा करूं लागलेली पाहिली म्हणजे पहिले बेत अस्तास जाऊन त्या ऋद्धिसिद्धीमध्यें मत्सर सुरूं होतो. रूपयौवनादिक कारणें, संततीची आशा, अशीं पुष्कळ कारणें जमून तो नवरा द्वितीयसंबंधाच्या बाधेनें पूर्ण भासला म्हणजे पहिलीचें प्रेम, पहिले बायकोचे सद्गुण, पहिलीनें सदिच्छेनें दुसरी कशाकरितां आणिली हें सर्व विसरून जाऊन दुसरीच्या हातांतील कळसूत्री बाहुलें बनतो. नावडतीचें मीठ सुद्धां त्यास अळणी वाटूं लागतें. जिच्यावांचून क्षणभर सुद्धां करमत नव्हतें, जिच्यावांचून कोणचा भोग गोड वाटत नव्हता, जिला आधीं विभाग दिल्यावांचून एखाद्या फळाची फोड सुद्धां तोंडांत जात नव्हती, जी केवळ गुणरत्नाची खाणी वाटत होती तीच सर्व प्रकारें उलट वाटूं लागते, तिचा शब्द कानीं नको, ती दृष्टीस नको. असो, पुढें काय होतें हें सर्वांस माहीतच आहे. सर्व मत्सरांपेक्षां हा सवतीमत्सर दारुण आहे. ह्याच्याच पायीं श्रीरामास वनवास प्राप्त झाला, श्रीकृष्णास विकून घ्यावें लागलें, फार काय सांगावें, पार्वति आणि गंगा यांच्या कलहास कंटाळूनच शंकरांनीं हालाहल प्राशन केलें, असा कवीनें लाघवानें विनोद केला आहे. सारांश, आपल्याला सुख होत होतें म्हणून वडील स्त्री प्राणापलीकडे प्यारी होती. त्या सुखाची लहर दुसरीकडे गेल्याबरोबर तीच वैऱ्यासारखी वाटूं लागली. तेव्हां माया आपल्या मतलबाचीच नव्हे काय ?

## वशीला.

संततीपेक्षां प्रियतम प्रपंचांत काय आहे ? गृहरत्नानि बालकाः अशी संततीची योग्यता आहे. मुलाला आत्मा म्हटलें आहे त्याप्रमाणेंच मुलावर बापाची ममता असते. पण मागें लिहिल्याप्रमाणें द्वितीय समंधाची बाधा बापास झाली म्हणजे पहिल्या बायकोची संतति शत्रूसारखी वाटूं लागते. दोघे पुत्र, दोघेही तनुज; पण धाकटीच्या पुत्रास सर्वस्व मिळावें आणि नावडतीच्या मुलास कांहीं मिळूं नये ह्यास काय करावें, ह्याच्या विवंचनेस तीर्थरूप लागतात. लोकाचार, रीतरिवाज, कायदा ह्यांच्यापुढें बापाचें कांहीं चालत नाहीं, म्हणून जुलमास्तव कसें तरी नावडतीच्या मुलाचें पोषण धाकट्या आईचें व सावत्र भवाचें

दास्य करण्यास त्यास लावून बापास करावें लागतें. त्या मुलाचा भार भावावर किंवा बापावर टाकण्याची सवड असली तर ती साधून तो शत्रुसमान वाटणारा मुलगा तो डोळ्यापुढें सुद्धां येऊं देत नाहीं. त्याच्यावर गैरमर्जी म्हणून त्याचा तिरस्कार. हा वशिल्यांचा प्रभाव आहे. नावडतीच्या कन्यांची तर पित्यास ओळख सुद्धां नाहींशी होते. सुसंपन्न पित्याच्या नावडत्या मुलींची अन्नानगत असून तिला मुलाबाळांसुद्धां दद्रातींत दिवस काढावे लागत असले, तरी पाषाणहृदयी पित्यास तिची करुणा येत नाहीं, असे केक बाप पाहण्यांत येतात. द्वितीय संबंध झाला नसतां पहिली बायको मेल्याबरोबर मुलीवरील ममता कमी आणि मुलगी मेल्यावर तिच्या मुलांची ओळख विसरणारे केक आहेत. इतकेंच नव्हे तीं डोळ्यांपुढें नकोत म्हणणारेही केक असतात. ह्यापेक्षां आपमतलब तो काय दाखवावा !

## बायको.

कोणी कोणास म्हटलें कीं तूं माझ्या प्राप्तीसाठीं बालपणापासून इच्छा करून विद्या कर, धन मिळव, लोकांचे आर्जव कर, कर्जवाम कर म्हणजे माझी प्राप्ति झाली तर होईल. प्राप्ती झाली म्हणजे तुझ्याजवळ जें जें कांहीं असेल तें तें अर्पण करून जन्मांत जें कांहीं मिळविशील तेंही माझेच हवालीं कर. तन, मन, धन ह्यांची पराकाष्टा करून, अब्रूकडे, पापपुण्याकडे, मानाकडे पाहूं नको. अहर्निशीं माझ्याकरितां व माझ्या परिवाराकरितां, हाडांचे मणी आणि रक्ताचें पाणी कर. पोटाला सुद्धां पुरतें खाऊं नको. मग कोठली ख्यालीखुशाली, कशाचा दानधर्म आणि परोपकार, स्नानसंध्या, भजनपूजन करण्यांत वायफट वेळ घालवून माझे उपयोगीं पडणारें धन मिळविण्यास अंतराय आणूं नको. असें करून मिळविशील तें माझ्या ख्यालीखुशालीकडे, वस्त्रभूषणाकडे आणि घोडे-घाडीकडे लाव. कदाचित् तूं मरशील, याकरितां तुझ्या मागें माझी व माझे परिवाराची व्यवस्था राहण्याकरितां तूं आपल्याकडून विमे उतरून ठेव; पण आम्ही शहाणपणानें व व्यवस्थेनें वागून त्या विम्यांच्या द्रव्यानें आपला निर्वाह आनंदांत करून, तुझें नांव राखूंच असें मनांत सुद्धां आणूं नको. ती गोष्ट आम्हास आमच्या भवितव्यतेप्रमाणें होईल त्या बुद्धीप्रमाणें घडेल. घरदार, मळे तळें सर्व मला दे. मला कंठमणी समजून रात्रंदिवस माझ्याच भजनीं रह

म्हणजे मी तुझें सहचर्य पतकरीन. हें मात्र लक्षांत असूं दे कीं, मी आपले आईबाप, त्यांचा परिवार, इष्टमित्र सोडून ज्याप्रमाणें तुझ्या एकट्याच्या अंकित होईन त्याप्रमाणें माझें साहचर्य झाल्यावर हळूं हळूं तुला करायाला लावीन. मी तुला कांहीं काल इच्छित सुख देईन, पण मी आपलें मन सर्वस्वी तुझ्या स्वाधीन करीन असें मात्र समजूं नको हो; नाइलाजास्तव तुझ्या छंदानें जितकें वागणें भागच पडेल तितकें मी वागेन. पण मी आपला छंद कधीं सोडणार नाहींच. माझें सुख मला जितकें साधतां येईल तितकें साधण्यास मी कधीं कसूर करणार नाहीं. तुझा हात तंगीं असला तरी माझे चाळे कमी जास्ती मानानें चाललेच पाहिजेत. तूं उघडपणें न चालूं दिलेस तर मी लपून छपून चालवीनच. तूं पैसा न खर्चून पाहिजे तर लोकांशीं वाईट हो, पण तुझ्याच पैशावर मी भलेपणा भोगीन. तुला कर्ज होवो, तुझी फजिती होवो, कीं कांहीं होवो, मी हाल भोगणार नाहीं, मी आपला दिमाख कमी होऊं देणार नाहीं. तुझ्या दैवानें मला चांगली बुद्धि दिली तर चांगलें वर्तन करीन, नाहीं तर पाहिजे तें दुष्कर्म करून शेवटीं तुला अफू सुद्धां खाण्यास लावीन. इतकेंही पतकरलेंस तरी मी तुझ्या सुखाचीच सोबती. तूं म्हणशील पुराणांतील महा साध्वी स्त्रियांप्रमाणें मी आपल्या सुखाकडे यत्किंचित् लक्ष न देतां तुझी सेवा अनन्यभावें करावी, मी केवळ तुझ्या सुखाकरितां आहें, तर ते दिवस गेले. ती भ्रांति आतां ठेवूं नको. मी आपल्याच सुखाकरितां तुझें साहचर्य पतकरलें आहे. त्यापेक्षां तुझ्या सहवासानें मला सुख मिळेनासें झालें तर मी तुला टाकून जाईन. अथवा दुसरें कांहीं कारण झालें तर मला जावेंच लागेल. तेथें तुझें अगर माझें कांहींच चालणार नाहीं. माझे इतके सोलवाड पुरविण्याकरितां तुला पाप लागलें तर त्याचा लेशही मी घेणार नाहीं. तुझ्या सुकृतांतील निम्मे वाटा मात्र मी चोपून घेईन इतकेंच नाहीं, माझे सुकृतांतील रेसभर सुकृत मी तुला देणार नाहीं. तुझेंच खर्चून मी सुकृत केलें तरी तें माझेंच, पण मी आपल्या पापाचा निम्मे वांटा तुझ्या बोकांडीं बसवीन. इतक्या शर्ती पतकरून कोणी तरी कोणाचें साहचर्य पतकरील काय ? एखाद्यानें पतकरलेंच तर त्यास आपण वेडापीर नाहीं का म्हणणार ? पण जरा विचार करून पाहिलें तर सगळें लफडें आपल्याच गळ्यांत येतें. आणि सगळे संसारीकही आपल्याप्रमाणेंच लफड्यांत

अडकले आहेत. साहचर्य पतकरणारे आपण पुरुषच आणि " हीं हाडें उगाळून देशील जीस पैसा; ती मानिते तुज निज सेवक जैसा " ती बायको साहचर्य देणारी वरें ! " सुखासाठीं बाइल केली जिवा काचणी लाविली " ही संतशिरोमणीची उक्ती खोटी आहे काय ?

## पति.

जर कोणी कोणास म्हटलें कीं सगळ्या जन्मांत सुखाचे दिवस काय ते प गंडावस्थेंत असतात. तशा अवस्थेंत असतां आईबाप, त्यांचा परिवार, इष्ट, मित्र, आप्त, सोयरे ह्यांचा त्याग कर आणि माझे घरीं ये. कांहीं दिवस त्यांच्या घरीं जाण्यायेण्यास मी चांगल्या स्वभावाचा साधारण मनुष्य असेन तर तुला मुभा ठेवीन, पण तें जाणें येणें पाहुण्याप्रमाणें असेल. मी को जहागीरदार असलों, कीं आईबापांच्या भेटीची सुद्धां सुराणी होईल. मी साधारण स्थितींतील असून संशयखोर, एककल्ली, नादिष्ट, हेकड असलों तर ही कदाचित् तुला आईबापांचा उंबरा दिसूं देणार नाहीं. मी कदाचित् दुर्व्यसनी आणि दुर्वृत्त निघेन. बाजारांतील नीच, अमंगळ, दुर्वृत्त अखंडसौभाग्यवती गळ्यांत बांधून घेऊन सगळा जन्म तिचा गुलाम होऊन राहीन. सर्वस्वाच्या किल्ल्या तिच्या कमरेस लावून घरांतील सत्तासाहेबीण तिला करून ठेवीन. तुला रोजचा शिधा सुद्धां तिच्यापासून ती देईल तो मागून घ्यावा लागेल. तिच्या हुकुमांत वागावें लागेल. ती आणि मी सुखशय्येवर असतां उभयतांची चरण. सेवाही करावी लागेल. मग स्वयंपाक करून तिला वाढावें लागेल ह्यांत काय नवल आहे. इतकेंही करून तुझ्यावर माझी मर्जी राहीलच असें समजूं नको. तिनें लटकें लांडें कांहीं जरी सांगितलें तरी तेंच सत्य मानून मी तुझ्या पोराबाळांदेखत, लेकीसुनांदेखत, चाकरमाणसांदेखत तुझी शिव्यांनीं पूजा करीन. कदाचित् अंगावर हात टाकण्यास कमी कर णार नाहीं. तुला घरांतून हाकून देईन. माझे आप्तसोयरे, इष्टमित्र, ह्यांनीं तुझ्या कुलीनपणाकडे, थोरपणाकडे आणि निर्मळ पवित्र वर्तनाकडे नजर देऊन आपलें कर्तव्य म्हणून तुला आश्रय दिलाच तर मी त्यांच्याशीं वांकडें धरीन. कदाचित् त्यांच्यावर व तुझ्यावर उच्चार करूं नये, असा भलताच आळ घेऊन, तुला त्यांचा आश्रय नाहींसा करीन. तूं अन्नवस्त्राची फिर्याद

केलीस तर भर कोर्टांत निर्लज्जपणें तुजवर भलताच आरोप करून तुला वेडे-वांकडे प्रश्न करून मी आपलेंच जगांत हंसूं करून घेईन. परंतु कदाचित् मी सुशील तुझ्या प्रारब्धानें निघालों तर वदान्य निघून घरादारावर तुळसीपत्र ठेवीन. मध्यान्हरात्रीं अतिथी-अभ्यागत आले असतां तुला उठवून स्वयं-पाक करून वाढण्यास लावीन. तुझ्या कष्टाकडे माझें लक्ष स्वाभाविकच फारसें जाणार नाहीं. तें तुझें कामच आहे असें मला वाटेल. कांहीं कारणा-निमित्त मला जेवण्यास माध्यान्हकाळ झाला किंवा सायंकाळ झाला तरी माझ्या आधीं तूं जेवतां कामा नये. सगळे जेवून गेल्यावर शिळें वाळलेलें असेल तें तूं खावेंस. माझ्या व माझ्या परिवाराची सर्व प्रकारची शुश्रूषा तूं केली पाहिजेस, खस्ता खाल्ली पाहिजेस, आपलें जिवाचें रान क-रून आमचें हित केलें पाहिजे. मी आपली सर्व संपत्ति तुझे स्वाधीन करीन, पण त्यांतील तनसडीसुद्धां हलविण्याचा तुला हक्क नाहीं. बैलाच्या पाठीवर साखरेची गोणी तशांतलाच प्रकार. मला सदोदित तूं मान दिला पाहिजे. माझे आज्ञेंत वागलें पाहिजे. तिळभर इकडचें तिकडे झालें, किंवा दुसऱ्या कांहीं कारणानें किंचित उशीर लागला तरी मला खप-णार नाहीं, मी बेताल होईन. घरांतील काम दासीप्रमाणें तूं केलें पाहिजे. तुझा अन्याय नसतांही मी रागावून, मी आपल्याच चुकीचें दूषण तुजवर ठेवून, तुला अपशब्द बोललों किंवा ताडण केलें, तरी तूं उलटून बोलतां कामा नये. माझा राग निष्कारण आहे असें दाखविण्याकरितां सुद्धां समजूत करून दे-ण्याचा प्रयत्न करितां कामा नये. मी पाहिजे तो अत्याचार करीन, तूं आजारी, पंगू किंवा निकामी झालीस कीं लागलींच दुसरी बायको पटकावीन. मग मेलीस तर करीन हें निराळें काय सांगूं ? कदाचित् तुला कांहीं खोड ठेवण्यास जागा नसली तरी माझ्या लहरीस आलें तर मी दुसरी बायको करीन, तिच्या माझ्या विनोदांत, आतां आम्ही दोघी असतां तिसरी कोण यावयास बसलें आहे असें तिनें म्हटलें तर चढीस लागून द्रव्यबळाच्या सहाय्यानें तिसरी सुद्धां कुऱ्हाड गळ्यांत बांधून घेईन. पण तूं मात्र वर मान सुद्धां करितां कामा नये. तूं सहज चांगल्या बुद्धीनें जरी कोणाकडे पाहिलेंस, कोणाशीं बोललीस, हंसलीस, तरी आपल्या द्वाड रुशयी स्वभावामुळें नानाप्रकारचे कुतर्क काढून तुला गांजीन;

तथापि तूं नाखुषी दाखविती कामा नये. माझी मनधरणी केली पाहिजे. मी मेलों असतां तुझें वय कितीही लहान असो किंवा प्रौढ असो, तरी दुसरें लग्न करितां कामा नये. कडकडीत संन्यासव्रतानें वागलें पाहिजे. असे किती म्हणून सांगूं. मान, सत्ता, सुख, दुःख काय तें मला आहे, तूं म्हणजे माझ्या सुखाखातर व सोयीखातर एक चालतें बोलतें यंत्र मात्र परमेश्वरानें निर्माण केलें आहे; त्याला मान, सत्ता, मनोविकार कांहींच नसल्याप्रमाणें मी ठेवीन त्या स्थितींत तूं आनंदानें राहिलें पाहिजे. मला वाटलें तर मी तुझा भक्त बनून तुझी पूजा करीत जाईन, नाहींतर पोतेऱ्याप्रमाणें वागवीन. इतक्या शर्ती जर तुला, किंबहुना तुझ्या मातापितरांस किंवा पालकांस आवडतील आणि ते मला माझ्या घरच्या दासीबटकींसुद्धां आणि कुतऱ्यांसुद्धां बहुमान देण्यास कबूल असतील तर त्यांनीं माझ्याशीं तुझा संबंध करावा. तर कोणी तरी इतकी पीडा पतकरील असें वाटतें काय ? पण सगळें जग ही पीडा पतकरूनच आपल्या पोटच्या गोळ्याच्या जन्माचें सार्थक झालें असें मानून चालत आहे.

## मुलगा.

कोणी कोणास म्हणेल कीं, एकदां फटफजीती होऊन [ मुलगा मरून ] घाण्याच्या बैलाप्रमाणें फेरे तूं घालीत आहेस, तथापि जर तुला माझ्या आगमनाची इच्छा असेल तर तूं रात्रंदिवस मजकरितां आशा करीत बैस, देवास नवस कर, पिंपळाचे पार शिंपीव, सायास कर, व्रतें, दानें, उपास कर; पण येवढें पक्कें लक्षांत ठेव कीं, मी येण्याचा संभव झाला पुरे, कीं तुझ्या आणि तुझ्या कलत्राच्या प्रेमसुखांत मी बिघाड करीन. कांहीं दिवस तर वियोग घडवीनच घडवीन. तुझ्या कलत्रास अन्न गोड लागूं देणार नाहीं. अनंत यातना सोसण्यास लावून, तुमच्या लाडक्या लेंकराची दुर्दशा करीन. मरतें कीं जगतें अशी त्याची स्थिति करीन. माझ्या प्रत्यक्ष दर्शनाचा समय तर इतका भयंकर होईल, कीं ते दिवशीं तुझ्या कलत्राचे प्राण अत्यंत धोक्यांत राहतील. निभलें तर पुढें कांहीं महिने त्या दुखण्यांतून नीट होण्यास लागूनही पहिल्याप्रमाणें शरीर होणार नाहीं, व ताकद रहाणार नाहीं. तुम्हा उभयतांच्या खाण्यापिण्याच्या उत्तम उत्तम पदार्थांवर लवकरच नजर ठेवीन. त्यांतूनही कांहीं तुम्ही तोंडांत घातलें तर त्यांतूनही विभाग घेण्यास सोडणार नाहीं.

जें जें म्हणून तुम्हांजवळ असेल, त्यावर मालकी सांगेन. तुमचें मागें तर सर्वत्र आटोपून बसेन. तुमच्या लेकी व तुम्हांवर अवलंबून असणारीं आईबापें वगैरे माणसें ह्यांस कांहीं मालकी करूं देणार नाहीं. त्यांची सत्ता जाऊन तीं माझे दयेवर अवलंबून रहातील. माझ्या सुखाकरितां व हिताकरितां तुम्हीं रात्रंदिवस हाडांचीं काडें केलीं पाहिजेत. माझ्या दुखण्याबाहण्याकरितां, लग्नाकरितां व विद्याभ्यासाकरितां तुम्हीं आपलें घरदार सुद्धां गाहाण ठेवून ऋणाच्या यमयातनांतही पडलें पाहिजे. इतकें करूनही मी विद्वान् होईनच असें समजूं नको तुमच्या इच्छेप्रमाणें वर्तन असेंही मनांत आणूं नको. कदाचित् मी दुर्वृत्त, दुर्व्यसनी निघेन. नाना अनर्थ करून, जगांत तोंड दाखवूं नये अशी स्थिति तुम्हांस आणीन. न जाणो मी मोठा लौकिकवान व विद्वान निघून विपुल द्रव्य मिळवीन, पण त्या धनाचा विनियोग, मी आपल्या भोंवतीं व आपल्या परिवाराभोंवतीं दिवे ओवाळण्यांतच करीन. त्या सुखानेंच तुम्हीं सुखी झालें पाहिजे. तुमच्या अखेरीपावेतों मी तुम्हांस सोबत देईनच अशी खातरी मी देत नाहीं. कदाचित् मला वाटेल तेव्हां मध्येंच मी निघून जाऊन तुम्हांस आमरण शोकानलांत लोटीन! शिवाय मी आपली बायको आणि परिवार पोसण्यास तुमच्या गळ्यांत बांधून जाईनच. त्यांतच मुलगे तरी आहेत म्हणून तुम्ही समाधान मानून पुनः म्हातारपणीं माझ्याप्रमाणेंच त्यांचें दास्य करण्यास कंबरा बांधून पुनरावृत्ति सुरू केली पाहिजे. तर असला मनुष्य पतकरून बळेंच गळ्यांत घोरपड कोणी अडकवून घेईल काय ? पण आपणच नव्हे हो सगळें प्रवृत्तिमार्गांतील जग ह्या घोरपडीकरितां जिवप्राण वेंचीत आहे. ही घोरपड ज्याच्या गळ्यांत न पडेल त्याच्या घरीं अन्न सुद्धां घेऊं नये, त्यास उत्तम लोकींचे दरवाजे खुले नाहींत, अशी समजूत आहे. हे गृहस्थ कोण हें लक्षांत आलेंच असेल. "आत्मा वै पुत्र नामासि" ह्मणतात तेच हे गृहस्थ. आतां विचार करा कीं, पुत्र हा मित्र समजावा किंवा शत्रु समजावा, किंवा आदल्या जन्मींचा धनको का ऋणको समजावा ?

## मायेचे गोंधळी.

प्रपंच नाटकांतील प्रमुख प्रमुख पात्रांची ही वाट. इतर तर बोलून चालून

शिरें तोंवर भुतें जमलेलीं. जरा सुखाला का अंतर पडलें कीं चाळलीं निघून; पण ह्यांचा मानभावी कावा उर्णाच लक्षांत घ्या. कोणी गृहस्थ आसन्न मरण झाला म्हणजे मायेचे गोंधळी ( भाऊबंद, आप्तसोयरे, इष्टमित्र ) त्याच्या अंथरुणाभोंवतालीं जमतात, आणि मोठमोठाले दुःखोद्गार काढून म्हणूं लागतात कीं 'काय करावें बुवा ओझें असतें तर वांटून तरी घेतां येतें! पण येथें कोणाचा काय इलाज आहे!' हे उद्गार ऐकून व्यवहारांतील बतावण्या माहीत नसणाऱ्या शुद्ध आणि कोवळ्या मनाच्या माणसाला मोठा चमत्कार वाटतो. संकटसिंधु पार पाडण्यास हे गोंधळी नौकाच होतील असा मोठा भरंवसा वाटतो. पण तो आसन्नमरण मनुष्य वाटेस लागून त्याचीं पोरकीं पोरें, नवी तरणी बायको, आणि जराग्रस्त मातापितरें उघडीं पडून त्यांस मरण पावलेल्या मनुष्याच्या कर्जाची बर्ची लागूं लागल्याकारणानें घरदार जाण्याची वेळ आली ह्मणजे हे गोंधळी सुसंपन्न असले तरी त्या निराश्रितांकडे ढुंकूनही पहात नाहींत, कोरडा दिलदिलासा देखील करीत नाहींत, किंवा सल्लामसलत सुद्धां देत नाहींत. सल्लामसलत देण्यास जावें तर एखादें आपल्याच गळ्यांत पडेल असें वाटून दूरदूरच रहातात. "ह्या बोटाची कळ त्या बोटास नाहीं" हेंच खरें. कांहीं नीच तर मढ्यावरील लोणी खाण्याचीहि वाट पहात असतात.

## सर्व सुखाचे संगति.

लग्न कार्यें वगैरे सुखाचे आणि थाटमाटाचे, व मिष्टान्नाचे समारंभ असले ह्मणजे ह्या गोंधळ्यांच्या गर्दीस पूर येतो. बादरायणसंबंधाचें नातेवाईक आणि "राजगजपालकः तस्य शालकस्य शालकस्य शालकस्य शालकः" या मासल्याचे बडे लोक सुखाखातर आपोआप जमतात. किंबहुना आपला डामडौल दाखविण्याकरितां व आपली फुशारकी मिरविण्याकरितां कार्य करणारा बळेंच हा गोतावळा जमा करितो; पण "वऱ्हाड नोहे वर हाड आलें" हें त्यास लवकर कळत नाहीं. विघ्नाच्या प्रसंगीं मात्र ज्याचा तो. "कठिण समय येतां कोण कामास येतो" ह्या ह्मणण्याचा प्रत्यय येतो. सारांश सर्व मोबदल्याच्या गोष्टी आहेत. "दाम करी काम" या न्यायानें सुर्तीच्या भिडेनें जमविलेले नोकरचाकर, इष्टमित्र, चाहते, प्रियकर ह्यांत आणि ह्या मायेच्या गोंधळानें

आपलें म्हणून मानिलेल्या दारापुत्रांसुद्धां सर्व मायेचे गोंधळी यांत काहीं फरक नाहीं. सर्व लबाडीचा बाजार आहे. "रांडा पोरें वंचक चोरें" हेंच खरें. मोलाचीं माणसेंच स्वहितार्थ यजमानाचे सेवेस जास्ती जपतात.

## शोकाचें तारतम्य.

### पतिशोक.

खोल पाण्यांत तरी कशाला शिरावयास पाहिजे ! हातच्या कांकणास आरसा नको. मायाजाल निवळ बाजारी व्यवहार असल्याचें प्रत्यक्ष प्रमाण, मानवाच्या मागें लागलेला शोकरूप प्रचंड वणवा, त्याच्या परिमाणाचें तारतम्य हेंच आहे. बाजारांतील व्यवहाराशीं शोकाचें सादृश्य कसें आहे पहा.

स्त्री–शरीराचें सर्वस्वाचे धनी पतिशरीर होय. एक मेलें आणि एक वाया गेलें, इतकें महत्व त्याला आहे. सतीच्या प्रघाताच्या प्रादुर्भावास हें महत्वच कारण आहे; तथापि पतिशोक सर्व प्रसंगीं समान आहे काय ! कुंकुमविवर्जित बालामुख पाहतांच तिऱ्हाइताचें सुद्धां अंतःकरण विव्हल होतें. प्रौढ स्त्रीला मुलें बाळें असून चारितार्थाची वाण नसतां सौभाग्यहानि झाली म्हणजे फार वाईट झालें, पण बोलून चालून मृत्युलोकची वस्ती, मुलांबाळांकडे पाहून समाधान करून घ्या अशी समजूत करतात. वृद्ध स्त्रीवर प्रसंग आला म्हणजे आजीबाई, ऋणानुबंध सरला, आपण सुज्ञच आहां, आपल्यापुढें आम्हीं काय सांगावें ! इतकेंच म्हणतात. शिवाय पतीचे गुणावगुण, सधनता, निर्धनता, प्रीति, अप्रीति, सुस्वभाव, दुःस्वभाव, इत्यादि पुष्कळ गोष्टींच्या अनुकूलप्रतिकूलतेच्या मानावर पतिशोकाचें तारतम्य असतें. पुनर्विवाह प्रतिबंध नसणाऱ्या गरिबाच्या बायकोस तर पतिशोक एखादी नोकरी गेल्याइतकाच होतो; कदाचित् दुसरा यजमान पहिल्यापेक्षां चांगलाही मिळतो आणि जास्तीच लाभ होतो !

## " भार्या शोकं पुनर्भार्या. "

" गरीबाची मरूं नये बायको, आणि श्रीमंताचें जळूं नये घर. " ही म्हण तर सर्वश्रुतच आहे. श्रीमंताची एक मेली तर तिच्या दुखण्यांतच दुसरी डोकावीत असते, घोंगडी जाऊन शाल मिळाली असेंही कदाचित् होतें. जहागीरदारांच्या घरीं तर पागेंतील घोड्यांप्रमाणें एक कमी झाली काय आणि

एक वाढली काय ? " मार्या शोकं पुनर्भार्या. " वर पतिगुणाविषयीं सांगितलें आहे तें स्त्रीलाही लागूं आहे.

## पुत्रशोकं निरंतरं.

" पुत्रशोकं निरंतरं " म्हणतात, पण रोगी, पंगु, न मिळविते, असे पुत्र यांच्या आणि कर्ते, पराक्रमी, धन-कनकसंपन्न, लौकिकवान् पुत्र ह्याच्या शोकांत तारतम्य नाहीं काय ? " कुसंतानापेक्षां निःसंतान बरें " असें पुण्यश्लोकामणी अहल्यामातेनें स्वहस्तें पुत्रनाश करून सिद्ध करून दिलें आहे.

## कन्याशोक.

कन्या ती कन्याच. अगदीं दुःखप्रद वाटून परिणामीं सुखप्रद वाटणाऱ्या गोष्टींत कवीनें कन्यामरण दाखल केलें आहे. पण हें कविवाक्य सर्वसाधारण प्रचारापुरतें आहे. नियमास अपवाद असतोच. एखाद्या घराण्याच्या अभ्युदयास आणि ख्यालीखुशाली चालण्यास धन्या कन्याच आधार असली, म्हणजे तिच्या मरणानें पुत्रशोकाप्रमाणेंच शोक होत नाहीं काय ? बाजारांत निरनिराळ्या मालाला कमजास्ती मोल पडतें आणि त्या जातींत आणखी प्रती असतात, त्याप्रमाणें त्याच्या किंमतींत चढ उतार असतो. तोच प्रकार सुहृदाच्या शोकाचा नाहीं काय ? पति, पत्नी, सुत, सुता ह्या शोकाच्या मालाच्या जाती नव्हेत काय ? आणि सुगुण, दुर्गुण, महत्त्व, नीचत्व, उपयोग, निरुपयोग ह्या सदरहु मालाच्या प्रती नव्हेत काय ? शोक खरोखर मृताकरितां असता तर इतके तारतम्याचे परिमाण त्यांत असतें काय ? तात्पर्य, शोक करणारा आपल्या हानीकरितां तिच्या मानानें रडत असतो. मायाजालाचें खरें स्वरूप लक्षांत येत नाहीं म्हणून कोळ्याच्या किंवा धिवराच्या जाळ्यांत सांपडलेल्या माशीप्रमाणें किंवा माशाप्रमाणें माणसें विनाश पावून चौऱ्याशीं लक्ष योनींमध्यें जीव सर्वदा धक्के खात आहेत.

# भाग १३ वा.

## जगन्मिथ्यात्व.

### श्लोक.

पृथिवी दहते यत्र ॥ मेरुश्चापि विशीर्यते ॥
सुशोषेत्सागरजलं ॥ शरीरे तत्र का कथा ॥ १ ॥
( सुभाषित. )

### ज्ञानचक्षुर्वै सत्यं.

विषय मिथ्या, मायाजाळ मिथ्या, पण आपला देह आपल्याला प्रत्यक्ष दिसत आहे; धन, द्रव्य, ऐश्वर्य आपल्या डोळ्यांनीं पाहत आहों; ही सृष्टि आणि ब्रह्मांड धादांत दिसत आहे. ' चक्षुर्वै सत्यं ' असें वचन आहे, तेव्हां ह्या गोष्टी तर खऱ्याना ? एकदां ह्या खऱ्या म्हटल्या कीं, पूर्वी खोट्या ठरविलेल्याही खऱ्या म्हणणें मागच. " चक्षुर्वै सत्यं " हें म्हणणें सर्वदां व सर्वत्र खरें आहे असें नाहीं. पुष्कळ गोष्टी आपल्याला दिसतात एका प्रकारच्या; पण असतात निराळ्या प्रकारच्या. पृथ्वी अचल असल्याचें आपण पाहतों, पण तिला दैनंदिन आणि वार्षिक अशा दोन गति असल्याविषयीं अर्वाचिन जोतिर्विदांनीं ठरविलें आहे, व प्रमाणांनीं अनुभवास आणून दिलें आहे. अलीकडे तर तिच्या सहवर्तमान व ग्रहमालेंतील इतर ग्रहांसहवर्तमान सूर्यनारायण मोठ्या वेगानें कोणीकडे तरी चालला आहे, असें कळून आलें आहे. तेव्हां ती तिसरी गति तिला ठरली आहे! पांढरा रंग म्हणजे अगदीं स्वच्छ, निर्मळ व निर्मळ असा आपण मानतो, पण तो सर्व वर्णांनीं मिश्रित आहे, असें शास्त्रवेत्त्यांच्या अनुभवास आलें आहे. हे दाखले शास्त्रीय गहन विषयांचे असल्याकारणानें साध्या माणसांस समजणार नाहींत व कदाचित् खरेंही वाटणार नाहींत. पण सर्वांस अनुभव आहे कीं, आगगाडींत बसलें असतां आपली गाडी स्थीर असून शेजारून दुसरी चालली असतां आपलीच गाडी निघाल्यासारखें वाटतें, आपली भरवेगानें

चालली म्हणजे समोरून वृक्षादिक आपल्याकडे धांवत येऊन आपल्या मागें जात आहेत असें दिसतें. " गाड्या गाड्या भिंगोऱ्या " खेळणाराला आपल्या भोंवतालची सर्व जागा फिरत आहे असें दिसतें. कांच, उजळा दिलेलीं भांडीं व प्रवाही पदार्थ इत्यादिकांत प्रतिबिंब दिसतें. मृगजल व गंधर्वनगर दिसतें. क्षितिजास आकाश टेंकलेलें दिसतें. सूर्यचंद्र क्षितिजाखालीं गेलेले दिसतात. पण प्रथम ज्या स्थलीं क्षितिजमर्यादा दिसली तेथें जावें तर तें सारें खटलें पुन्हां पुढें सरतें. पर्वतशिखरें गगनास लागलेलीं दिसतात, पण तेथें जावें तर आकाश उंच तें उंचच. आपल्या व क्षितिजामध्यें असलेल्या झाडाच्या आडून आकाशाकडे पाहिलें तर झाडापेक्षां आकाश ठेंगणें होत होत क्षितिजास टेंकलेलें दिसतें. पण हे सर्व प्रकार मिथ्या होत. तस्मात् ' ज्ञानचक्षुर्वै सत्यं ' हेंच खरें.

## द्रव्य–क्षणभंगुरता.

" चक्षुर्वै सत्यं " म्हणण्यापेक्षां विचाराच्या आणि अनुभवाच्या कसोटीस उतरेल तेंच सत्य म्हटलें पाहिजे. आपल्या समजाप्रमाणें धन, द्रव्य व ऐश्वर्य, जें आपल्यास प्रिय वाटतें, तें स्वयमेव, सुखकर व प्रियकर आहे असें नाहीं; तर त्यावर असणारी आपली सत्ताच प्रियकर व सुखकर आहे. दुसऱ्याच्या द्रव्यानें आणि ऐश्वर्यानें कधीं कोणी सुखी होतो काय ? ती सत्ता मिळविण्यास व राखण्यास आपल्यास किती श्रम करावे लागतात ? केवढी काळजी वहावी लागते ? किती अपमान सोसावा लागतो ? किती न्यायनीतीची हिंसा करून पाप पदरीं बांधावें लागतें. ह्याचा कधीं कोणी विचार करतें काय ? बरें इतकेंही करून आपल्या अंतकाळीं ह्यांतील छदाम तरी आपल्याबरोबर येणार काय ? न येवो. आम्हीं तोंवर भोगलें आणि सोडून दिलें. दादा राम राम, बाबा राम राम, म्हणून मोकळे होऊं, असें म्हणून तरी चालणार काय ? तें आपल्याबरोबर येत नाहीं खरें, पण त्याच्याप्रीत्यर्थ झालेलें पापपुण्य बरोबर येऊन पुढल्या जन्मीं भोगावें लागणार. पुण्याचा संभव कमी, पण पाप मात्र पर्वतप्राय वाढणार. यामुळें पुढल्या जन्मीं प्रायश्चित्त भोगावें लागून शिवाय कृतांताचा घोर दंड सोसावा लागणार. असो. ह्यांची कमाई वस्तुतः विघातक मात्र आहे.

## सत्ताभ्रम.

वरील प्रकार तरी मोठ्या भाग्यवानाचा. कारण मरणकालपर्यंत ह्या गोष्टी अनुकूल राहणें ही गोष्ट मोठें भाग्य असल्यावांचून नाहीं. बहुतकरून फार लोकांचें द्रव्य आणि ऐश्वर्य त्यांच्या देखत भरतीओहटीप्रमाणें येतें आणि जातें. त्यांचे हाल ह्याच देहीं होऊन ह्याच डोळयांना दिसतात. नारळांत पाणी कसें येतें, आणि हत्तीनें खाल्लेलीं सबंध कवठें आंतील गीर नाहींसा होऊन कशीं बाहेर पडतात, हें जसें कोणास कळत नाहीं; त्याप्रमाणें वरील गोष्टी कळत नाहींत. सत्ता किती क्षणभंगुर आहे, हें रावसाहेबांचें प्रकरण गेलें आहे त्यावरून कळण्यासारखें आहे. धन, द्रव्य व ऐश्वर्य संपादन करणें म्हणजे भूमंडळरूप जामदारखान्यांतील माल ह्या जाग्यावरून उचलून त्या जाग्यावर ठेवण्याप्रमाणें आहे; त्यावरील कुबेराची सत्ता कधीं जात नाहीं. राजभांडारांतील खजिन्याच्या पेट्या इकडून तिकडे उचलून ठेवण्यास लागलेला मजूर आपल्यास भाग्यशाली म्हणवूं लागला तर त्यास मूर्ख म्हणून आपण हंसूं. ओझें वाहण्याचा मात्र बेटा मालक, काय हा फुशारला आहे, असें म्हणूं. बडयासाहेबांचे पट्टेवाले, शिरस्तेदार " आमची स्वारी, " " आम्ही असा हुकूम दिला, आम्ही असा ठराव करूं, खटला करूं" अशा दिमाखाच्या गोष्टी अडाणी रयतेपुढें सांगतांना ऐकिलें म्हणजे आपल्याला हंसूं येतें; पण आपण काय जास्ती करतों आहों! धन, द्रव्य व ऐश्वर्य काय नवनिधींच्या बाहेरचे आणीत आहों! पृथ्वीवर असलेल्या किंवा होणाऱ्या पदार्थांचीच सांडी मांडी करून पराक्रम केल्याचा वृथाभिमान वाहून एकत्र जमा केलेल्या धनद्रव्यावर आपली सत्ता आहे असें कल्पून फुगून जात आहों. आपली सत्ता खरोखर आहे कीं नाहीं ह्याचा विचार स्वप्नांत तरी येतो काय? मजूर, शिपाई आणि शिरस्तेदार वेतन तरी घेतो, पण आपल्यास देवानें अल्पस्वल्प धनावर सत्ता दिली असतां दुराशेमुळें आपण त्याचा सदुपभोग सुद्धां घेत नाहीं. मग सद्व्य तो कोठला? सुवर्णभूमि म्हणून अनादिकालापासून गाजत असलेल्या आर्यमातेचीं लेकरें भाग्यशाली असावीं ना? पण त्यांना ज्या दिवशींचा त्या दिवशीं तितक्यापुरता शिधा मिळवून पक्ष्याप्रमाणें रहावें लागत आहे. एक साल पाऊ-

स पडला नाहीं कीं लाखों आर्य म्हणविणारे लोक मरणाच्या पारीं बसून राजाच्या व परदेशांतील लोकांच्या अनुकंपेवर आपले जीव ठेवून त्यांच्या पायधरण्या करीत आहेत. एका क्षणापूर्वी सुखाच्या शिखरावर विहार करणारीं माणसें दुसऱ्या क्षणीं रंकाहून रंक बनत आहेत ! राज्येंचीं राज्यें उलथीं पालथीं होत आहेत हें आपण रोज पहात आहों ! रावणापेक्षां जास्त दौलतदार कोण ? पण त्याला दग्ध करतेवेळीं त्याच्या दांतांवर सोन्याच्या मेखा मारण्यास सोनें सर्वों घालण्यास रामराजाची परवानगी मागावी लागली ! सगळी लंका ज्याची सुवर्णाची त्याची ही दशा ! असें ऐश्वर्य अशाश्वत म्हणजे मिथ्या आहे. तें मिळविण्याकरितां इतकी यातायात करून करावयाचें तें काय ? तथापि सात पिढ्या पुरण्याजोगी बेगमी असली तरी आणखी आणखी धनदौलत मिळविण्याकरितां अन्यायाचरण करून सदोदित माणसें हाडें झिजवीतच आहेत.

## ज्याचें प्रारब्ध त्याच्याबरोबर.

ज्याचें प्रारब्ध त्याच्याबरोबर असतें. स्वतःस सुद्धां नाहीं, मग दुसऱ्यास सुखी किंवा दुःखी करण्याचें कोणाच्या स्वाधीन आहे ? यःकश्चित् सरदाराच्या पोटीं येऊन छत्रपती केवढ्या योग्यतेस चढले आणि केवढें ऐश्वर्य गोळा करून व धनाच्या राशी सांठवून ठेवून गेले ! खंडोगणती सोनें, विस्तीर्ण मुलूख, कर्दनकाळ वीरमणी सरदार आणि हिंदुस्थानभर गाजलेलें विकाळ सैन्य छत्रपतींनीं ठेवलेलें असून संभाजीचा परिणाम काय झाला ? एकसारखे एक पराक्रमी आणि भाग्यशाली पुरुष निर्माण होऊन दिल्ली अटकेपर्यंत मुलुखावर अंमल करून सर्व हिंदुस्थानांतील द्रव्याचा ओघ पुण्यांत आणून सोडणाऱ्या ब्रह्मपातशाहीचा व भटवंशाचा पत्ताही कोठें नाहीं ! मग यःकश्चित् सांप्रतचे कपाळकरंटे आपण मिळविणार तें काय ? त्यांतून ठेवणार तें काय ? आणि त्यानें पुढील पिढीस होणार तें काय ! कितीही असलें तरी आपल्याच डोळ्यांदेखत काय होईल त्याचा नियम नाहीं, असें असतां पुढल्या पिढीची विवंचना करीत बसून आपल्या पोटास चिमटे घ्यावयाचे, विहित आचरणास फांटा द्यावयाचा, एका पैशानें दुसऱ्याचें मोठें हित होत असलें, तरी तो पैसा साता वेष्टणांनीं बांधून ठेवून त्याचें नुकसान होऊं द्यावयाचें, ह्या आपल्या मागें लागलेल्या वेड्या

समजुतीस म्हणावें तरी काय ! सारांश, धन, दौलत आणि ऐश्वर्य ह्या गोष्टी केवळ दुपारच्या सावलीप्रमाणें अनित्य आहेत. तिला तरी दूर होण्यास नियमित वेळ लागतो, पण ह्याचा वेळ मुळींच कोणास ठाऊक नाहीं.

## आब मरे तब डुब गई दुनिया.

सुखदुःख, धनदौलत, पंचविषय व मायाजाळ ह्या सर्वांच्या ठिकाणीं असलेली परमावधीची आसक्ति तरी शरीराकरितांच; पण तें तरी शाश्वत आहे काय ! आपण रोज पाहत आहों, कीं जोंपर्यंत अविद्या प्रकृतीमध्यें परमात्म्याचा प्रकाश स्थित आहे, तोंपर्यंतच शरीर चालत आहे. शरीर किती कुश्चळ आहे, हें मागें आलेंच आहे. प्रकाशांची आणि प्रकृतीची ताडातोड केव्हां होईल ह्याचा नेमच नाहीं. एकदां शरीर पडलें, कीं त्याच्याशीं जीवलग म्हणविणारीं सर्व माणसें परकीं झालींच. धन, दौलत व राज्य संपदा ह्यांच्याशीं असलेला संबंध सुटलाच. फार काय सांगावें, जन्मापासून त्याचा आश्रय करून राहणारे उवा वगैरे जंतु, जे त्यास आपलें घर म्हणतात ते सुद्धां त्याला सोडून देतात. प्राण गेल्याबरोबर आवडत्या मनुष्यांस सुद्धां त्या देहाची अडचण होऊन तो केव्हां दग्ध होईल किंवा मातीआड होईल असें सर्वांस होऊन जातें. सर्पाचें अंगावर कात असते तोंपर्यंत तिला तो आपलें आंगच समजत असतो, पण ती एकदां टाकून तो मोकळा झाला, म्हणजे त्याच्या वारुळाशेजारीं ती लोळत पडलेली असतां तो तिच्या जवळून रोज जातो येतो, पण तिजकडे पहात सुद्धां नाहीं. तद्वत् शरिराशीं तादात्म्य पावलेला जीवात्मा त्याजवरील अहंकार सोडून एकदां निघाला म्हणजे पुन्हां त्या शरीराकडे पहात नाहीं. शरिरांतील आपलें अंश पंचमहाभूतें घेतात मग खालीं कांहींच राहत नाहीं. शेतांत पेरणी केली म्हणजे लाखों तांटें उत्पन्न होतात, आपल्या स्वाभाविक धर्माप्रमाणें वाढत जातात, फुलोरा धरतात, धान्य धरतात, दिवस भरले म्हणजे वाळून जाऊन शेवटीं कालें. करून नष्ट होतात, तद्वतच शरीर मातेचें उदरीं संभव पावतें, वाढतां वाढतां प्रसव पावतें, वाढूं लागतें, शैशव, पौगंडच, तारुण्य आणि वार्धक्य पावून, अथवा मध्येंच केव्हां तरी आपोआप पतन पावतें; ह्या वेळीं पंचतत्वें जिकडील तिकडे जाऊन शरीर नाहींसें होतें. भूईनळयास अग्निस्पर्श झाल्याबरोबर त्यांत दारू अ.

सेल, त्या मानानें तो उंच वाढत जातो, नानाप्रकारें झाडाचें फुलाचें स्वरूप प्रकट करितो, तारे दाखवितो, आणि पाहतां पाहतां तें झाड अदृश्य होतें. त्याप्रमाणेंच प्रारब्धाचें मान असेल, त्याप्रमाणें देहवृक्ष मृत्युलोकच्या रंगभूमीवर दिसूं लागतो, नितक्यांतल्या तितक्यांत नानाविध बरेंवाईट चमत्कार करून दाखवितो, पूर्वऋणानुबंधानुरोधानें कैकांस सुखदुःख दाखवून संचिताचा पुरवठा संपतांच आदृश्य होतो. तस्मात् हें शरीर केवळ भ्रांतिरूप अनित्य नव्हे काय ? शरीर अनित्य ठरल्यावर काय नित्य राहिलें ? देहाच्याच संबंधानें सर्व कांहीं आपलें म्हणविलें आहे, त्यापेक्षां देह गेला म्हणजे सगळें त्या प्राण्याला गेलेंच.

## नामरूपात्मक सृष्टि.

वरील सर्व अनित्य असो, पण ही अपार सृष्टि तर अनादिकालापासून चालत आली आहेना ? हिला तरी नित्य म्हटल्यावाचून गत्यंतर नाहींना ? छे छे, "यदृष्टं तन्नष्टं" हा सिद्धांतच आहे. सृष्टी पंचमहाभूतघटित आहे. पंचमहाभूतें वेगळालीं काढून टाकतां आलीं तर सृष्टी म्हणून कांहींच राहणार नाहीं. आपल्याला एवढा पसारा आणि ही नानाविधता दिसते, ही सर्व नामरूपात्मक आहे. कोणताही पदार्थ म्हटला, तरी त्याला नाम आहे म्हणूनच तो समजतो आणि इतर पदार्थांपासून वेगळा ओळखावयास येतो. तसें त्याला कांहीं तरी रूप दिलेलें आहे, म्हणून त्याला नांव देतां आलें. कुंभाराच्या कारागिरीनें तयार झालेलें सर्व पदार्थ म्हटलें असतां माती. सोनाराच्या कौशल्यानें बनविलेले पदार्थ सोनें, चांदी, मोतीं, जवाहीर वगैरे. साळ्याच्या करामतीनें तयार झालेले पदार्थ कापूस, रेशीम, रंग, कलाबतु इत्यादि. त्या सर्वांचें वस्तुवार निरनिराळें ज्ञान होण्याकरितां व ते उपयुक्त होण्याकरितां व शोभेकरितां त्यांस निरनिराळे आकार व रूपें दिलीं आहेत, त्या त्या प्रकारांचा बोध होण्याकरितां निरनिराळीं नांवें दिलीं आहेत. एकाच नांवाचे अनेक पदार्थ किंवा व्यक्ति असल्या तर त्या परस्परांपासून वेगळाल्या कळण्याकरितां त्यांस सुद्धां आणखी विशेष नांवें ठेवावीं लागतात. पागेंतील घोड्यांस झेंडी, महीताप, मनप्यारी, अशीं निरनिराळीं नांवें ठेवतात.

## विवर्त.

पृथ्वीवरील सर्व पदार्थांचा व प्राण्यांचा उभ्दिज, खनिज आणि प्राणि ह्या तीन कोटींत ( वर्गांत ) समावेश होतो; पण विचारानें पाहिलें असतां तिन्ही कोटी पृथ्वीच्याच अंशानें बनलेल्या आहेत. जेवढें जड तेवढी पृथ्वी, ती जळापासून उत्पन्न झाली. जल अग्नीपासून उत्पन्न झालें. अग्नी वायूपासून उत्पन्न झाला आहे. वायू आकाशापासून उत्पन्न झाला. आकाश मायेपासून भासमान झालें. आकाशाशीं सलग्न नसतां मध्येंच वायू संभवला. त्याप्रमाणें ब्रम्हाशीं साक्षात् संबंध नसतां माया उत्पन्न झाली. तिची लीला हेंच ब्रम्हांड होय. ही माया आपल्या गुणमयरूपानें सर्व खेळ करीत आहे. गंधर्व नगर किंवा मृगजल ज्याप्रमाणें दिसतें पण नसतें, त्याप्रमाणें हें ब्रम्हांड भारूढ अज्ञान विवर्त अतएव मिथ्या आहे. कल्पांतीं सर्व सृष्टी लय पावून सर्व तत्वें मायेच्या उदरीं लीन होतात. माया ब्रह्माच्या ठायीं लीन होते. सारांश, कल्पाच्या अंतीं ब्रह्मावेगीज कांहीं रहावयाचें नाहीं. असा प्राचीन महाऋषींचा सिद्धांत आहे. अर्वाचीन तत्ववेत्ते ही सृष्टी चिरस्थाई समजत नाहींत, त्यांच्या मताप्रमाणें आपल्या सूर्यासारखे कैक सूर्य आपल्या अंगची उष्णता सोडून थंड झाले आहेत. अर्थात् त्यांच्या ग्रहमाला नष्ट झाल्या आहेत. तशीच ही सृष्टीही कालेंकरून नाश पावणार आहे. तात्पर्य दोन्ही काळांतील तत्ववेत्यांच्या मतें ही सृष्टि अनित्य आहे.

## ऐहिक सुखें भासमान म्हणजे खोटीं.

### श्लोक.

**इंद्रस्या शुचि शूकरस्य च सुखे दुःखे च नास्त्यंतरं ॥**
**स्वेच्छा कामनया तयोः खलु सुधा विष्टा च काम्याशनं ॥**
**रंभा चाशुचि शूकरीच परमप्रेमास्पदं मृत्युतः ॥**
**संत्रासोऽपिसमः स्वकर्मगतिभिश्चान्योन्य भावः समः ॥१॥ [सुभा.]**

## मूळच खोटें.

अनंत जन्मापासून ऐहिकसुखाच्या कासेंत गुरफटून गेलेलें मन त्या सुखाचें

मिथ्यात्व समजल्यावांचून त्यांच्या मोहांतून मुक्त कसें होईल ! यास्तव तीं सुखें वस्तुतः सत्य आहेत किंवा भासमान मात्र आहेत, याचा शोध केला पाहिजे. पंचविषय आणि मायाजाल मिथ्या असें मागें सिद्धच झालें आहे. सुखांचीं पाळें मुळें काय तीं तींच. अर्थात् मूळच खोटें तर विस्तार खरा कोठून असणार ? कारणच नाहीं तर कार्य कसलें ?

## भावनावैचित्र्य.

वंध्या पुत्राप्रमाणें सुख भ्रांतिरूप असें उघडच झालें; तथापि सुख व दुःख या नांवाच्या कल्पना मनांत राहतात, म्हणून आपल्यास वाटणारीं सुखदुःखें ह्यांचा विचार करूं जातां असें दिसतें कीं, सत्य पदार्थ जो असतो तो सर्वांस सारखाच अनुभवास येतो, अग्नीचा स्पर्श झाला असतां सर्वांसच दाह होतो. पण सुखदुःखांचा प्रकार तसा नाहीं. ज्ञानी आणि मूर्ख यांस सुखदुःख बाधा होत नाहीं. सामान्य माणसास ती होते. त्यापेक्षां रसिक, दरदी, नादी वगैरे त्यांस फारच होते. सुखदुःखाच्या वेदनांचें प्रमाण सामान्यजनांत सुद्धां स्वभावपरत्वें फारच कमीजास्ती दिसून येतें कांहीं माणसें थोडें कर्ज झाल्याबरोबर घाबरीं होतात तर कांहींचा प्रकार "अति ऋण त्याला लाज नाहीं" असा होतो. कर्जामुळें रोज जप्त्या लिलाव होत असतां तुरुंगांत जावें लागलें, तरी ते बिलकूल डगत नाहींत. आपल्या थाटांत व चैनींत कमी करीत नाहींत. सहा लक्ष रुपयांची रोकड उधळून एक आपकमाइकांचा जोडा दिवाणी तुरुंगांत गेल्याबरोबर तेथें गंजिफांची पेटी त्यांनीं मागून नेल्याचें मला माहीत आहे. भावाचा मुलगा मेला म्हणून सणवार सुद्धां गोड लागेनातसे झाल्याचीं उदाहरणें आहेत. एकुलता एक पुत्र मरून वंशच्छेद झाला असतांही त्याच्या मरणानंतर महिना पंधरादिवसांत तमाशा करविणारे, जांवई मेला असतां दहा बारा दिवसांतच वृद्धपणीं आपल्या जोडप्याचा फोटोग्राफ पैसे खर्च करण्यास ऐपत नसतांही पैसे खर्चून काढविणारे " हालमे ख्याल और ख्यालमे खुशाली " करणारेही पाहिले आहेत. पुतण्याच्या दुर्वर्तनावरून सोयरे उणें उत्तर बोलल्याबरोबर पश्चात्तापाच्या योगानें अंथरुणास खिळून लवकरच परलोकीं गेलेला एक इसम पाहिला आहे. परमेश्वरानें दिलेली सामान्य किंवा थोडीशी कष्टप्रद स्थितीही गोड करून मोठ्या समा-

धानांत वेदांत्याप्रमाणें वेदांताचा गंधही नसतां वागणारीं सुशील, सद्वृत्तनी, मितव्ययी माणसें कोंड्याचा मांडा करून वागतांना क्वचित दृष्टीस पडतात. घरांत पुष्कळ संपत्ति असतांही हाय हाय करणारे थोडे नाहींत. दैवदयेनें संतति, संपत्ति, सुशील भार्या, घरदार वगैरे सर्व कांहीं थोड्याबहुतांत अनुकूल असतां त्यांचें चोज न करितां त्यांच्यांतील व्यंगें शोधीत बसून तीं नसलीं तरी बळेंच संशय घेऊन, आणि हें सध्यां आहे खरें, पण हें निरंतर कसें निभेल? खर्चाचें मान वाढत चाललें हा खर्च कसा भागेल? वगैरे अनंत तर्क करीत बसून मांड्याचा कोंडा करून, दैवानें दिलेल्या सुखानें सुखी न होतां बळेंच दुःखाचा ध्यास करणारे अभागीही क्वचित आढळतात, जणो काय चाललेला थाट ह्यांच्याच सत्तेनें चालला आहे. सारांश स्वभावपरत्वें सुखदुःखांच्या वेदना कमी जास्ती भासतात. यावरूनच सुखदुःखें मानलेलीं म्हणजे खोटीं आहेत.

## स्वप्नांतील भोग.

जागृतींत पंचविषयांचा भोग होतो. तसा स्वप्नींही होतो. जागृतींतील भोग खरा वाटतो, आणि स्वप्नांतील मात्र खोटा वाटतो. विचार करून पाहिलें असतां त्यांत आणि ह्यांत कांहीं फरक नाहीं. जागेपणीं एखादें प्रदर्शन पाहून पाठमोरे झालें कीं प्रदर्शन नाहींसें होतें; पण स्मृति नाहींशी होत नाहीं. स्वप्नाबरोबर स्वप्नांतील प्रदर्शन गेलें, तसें जागृतींतील गेलें नाहीं खरें, पण पाहणाराच्या दृष्टीआड झालें; तेव्हांच त्याला तें गेलें. शिवाय तें चिरस्थायी नाहींच. केव्हां तरी जावयाचेंच. मग दोहोंत फरक तो काय! गायन जागृतींत ऐकूत संतोष होतो, तसाच स्वप्नांतही होतो. गायन गवयाच्या तोंडांतून किंवा वाद्यांतून बाहेर पडलें कीं गेलेंच. सुगंध जागृतींत मिळाला काय आणि स्वप्नांत भासला काय, संतोष सारखाच. स्पर्शसुखाच्या योगानें जागृतींत होणारा परिणाम स्वप्नावस्थेंत प्रत्यक्षच घडतो. रससुखाचा भोगही दोहोंकडे सारखाच होतो.

## अनुकूल वेदना.

सुख म्हणजे अनुकूल वेदना रसादिक मूर्त पदार्थांपासून होणाऱ्या अनुकूल वेदना या मात्र सुख होत. रसादित मूर्त पदार्थांचा परिणाम शरीरावर होतो तो सुखापासून

निराळा आहे, हें नीट लक्षांत घेतलें पाहिजे. मूर्त पदार्थ सेवन झाल्याबरोबर ज्या अनुकूल वेदना होतात; तें सुख त्या पदार्थांचा परिणाम शरीरावर होतांना पुनः जर कांहीं वेदना होतील तर त्याही अनुकूल किंवा प्रतिकूल असतील त्याप्रमाणें सुख किंवा दुःख. ह्यांतून पहिलें सुख स्वप्नांत होतें. मूर्त पदार्थ स्वप्नामध्यें शरिरांत प्रविष्ट होत नाहींत, तेव्हां अर्थातच त्यांचा परिणाम शरिरावर होत नाहीं. तो होत नाहीं म्हणून त्यापासून कोणत्याच वेदना होता नाहींत. तस्मात् स्वप्नांतल्या सुखाच्या प्रकारचेंच जें सुख जागृतींत होतें त्यांत आणि स्वप्नांतील सुखांत कांहींच फरक नाहीं. रसापासून होणाऱ्या वेदना दोहोंकडे सारख्याच. सहाव्या इंद्रियानें मोहाधीन होऊन अभिमानाच्या योगानें जीं सुखदुःखें बळेंच डोक्यावर घेतलीं आहेत तींही दोहींकडे सारखींच. स्वप्नांत द्रव्य मिळालेलें पाहिलें किंवा राज्यपद मिळालेलें पाहिलें तर आनंद होतो; आणि जागृतींतही होतो. दोहोंकडील आनंदांत फरक नाहींच. स्वप्नांत सुहृद् वियोगानें शोक होतोच. सहावें इंद्रियाचीं सुखदुःखें मुळींच काल्पनिक होत. तेव्हां तीं दोहोंकडे सारखीं ह्यांत काय नवल आहे !

## मुक्त किंवा वेडे.

सगळें आयुष्य हा एक महास्वप्न आहे. ह्या महास्वप्नांत नेहमींचे अल्प स्वप्न वारंवार होतात त्यांच्या अंतीं जागृति होते म्हणून स्वप्न मिथ्या असल्याचें अनुभवास येतें. महास्वप्न जन्माच्या शेवटापर्यंत चालतो, ह्मणून त्याचें मिथ्यात्व आपल्यास कळत नाहीं. दोहोंकडील सुखें सारखीं तर स्वप्नांतील सुखाविषयीं बेपर्वाई, आणि जागृतींतील सुखाविषयीं इतका हव्यास कां असावा ? मन कल होईल किंवा ग्रह होईल त्याप्रमाणें वागणारें आहे; आणि माणसें मनाच्या प्रेरणेप्रमाणें वागणारीं आहेत. स्वप्नांतील सुखाचा खोटेपणा जागृतीबरोबर कळून येतो. जागृतींतील सुखाचें मिथ्यात्व आमरणही समजून येत नाहीं. जागृतींतील सुखें सत्य वाटून त्याच्याविषयीं मनाला हाव उत्पन्न होते. जागृती हा एक महास्वप्न आहे हें ज्यास पूर्वपुण्याईनें कळून येतें, आणि जागृतींतील सुखदुःखें मिथ्या आहेत असें कळून ती समजूत मनाला पक्की बाणून जाते तो विषय-सुखाच्या नादीं लागत नाहीं. बळें बळें जरी तीं त्याच्या गळां पडलीं तरी त्यास तो भीक

घालीत नाहीं. ज्यास सुखदुःख, बरें किंवा वाईट हेंच कळत नाहीं. त्यालाही सुखदुःखापासून कांहीं विकार होत नाहीं.

## श्लोक.

सुभाषितेन गीतेन । युवतीनां च लीलया ॥
यस्य न द्रवते चित्तं । स वै मुक्तोऽथवा पशुः ॥ १ ॥

श्रीशुकाचार्यांपुढें रंभेनें होती तितकी पराकाष्ठा केली पण पंचविषयांचें मिथ्यात्व आणि त्यांपासून होणारे अनर्थ त्यांस पक्कें समजलें असल्याकारणानें त्यांचें मन बिलकुल द्रवलें नाहीं. प्रत्यक्ष स्वर्गांतील पंचविषयांचें भांडार, ती रंभा, पण त्यांनीं ती तृणतुच्छ मानिली. तिनें आपलें शरीर विदारण करून ती मृत्युलोकींच्या स्त्रियांप्रमाणें हाडामांसानें बनलेली नसून सौगंधिक द्रव्याचा कोश आहे असें सुद्धां दाखविलें. पण त्या महाविरक्तानें उत्तर दिलें कीं, मला ही गोष्ट पूर्वीं कळती तर मातुश्री ह्या तुझ्या सुंदर उदरींच जन्म घेतला असता ! राज्यैश्वर्य भोगीत असतां राजा विदेही विषयसुखाच्या मर्माचा पूर्ण ज्ञाता असल्याकारणानें त्यानें सुखाचें पूर्ण विलास आणि अग्नीचा प्रखर ताप ह्यांत कांहींच भेद मानला नाहीं ! आपण विषयसुखानें अंध झालेले लोक विषयसुख न समजणारांस ( वेड्यास ) पशु म्हणतों, पण श्रीवसिष्ट, श्री विदेही प्रभृति ज्ञाते त्यांस मूर्ख आणि आपल्यास शतमूर्ख म्हणतात ! ठीकच आहे. आपण मानलेले ते पशु ( वेडे ) विषयांत सुख आहे किंवा नाहीं ह्याच्या विचाराच्या भानगडींतच पडत नाहींत, म्हणजे विषयांत सुख नसतां सुख आहे असें तरी मानीत नाहींत, पण विषयांत सुख नसतां दुःखप्रचुरविषयांसच आपण सुखाचें आगर ह्मणतों ! तस्मात् आपण शतमूर्ख का सहस्रमूर्ख ह्याचा विचार आपला आपणच करावा ! !

## भोगाविषयीं बेपर्वाई.

इतक्या दूरचीं जुनीं उदाहरणें तरी कशाला शोधावयास पाहिजेत ! आपण आपलाच अनुभव पाहूं या. कोणी गारोडी हडकाच्या कांडया, कढी वगैरे नानाप्रकारचीं उपकरणें जमवून सोंगेंढोंगें करून आपल्या बाळपणीं खेळाचे चमत्कार

करूं लागे तेव्हां केवढा चमत्कार वाटे! त्याच्या मंत्रसामर्थ्यानें आपली नजर बंद झाली असें वाटून मन थक्क होऊन जाई, ते त्याचें सर्व थोतांड होतें, तो हातचलाखी करून लोकांस फसवितो असें समजलें, तेव्हां आतां त्यांत कांहीं तरी नवल वाटतें काय? सारांश, जागृतींतील सुख सत्य आहे असा मनाचा दृढ ग्रह झालेला आहे म्हणून त्याचा हव्यास आहे. त्याचें मिथ्यत्व व अनर्थकारक परिणाम एकदां मनाला बाणून द्यावे, म्हणजे स्वप्नांतील सुखांप्रमाणेंच जागृतींतील सुखें मिथ्या कळून त्यांविषयीं बेपर्वाई होईल.

## सुख पुढें तें पुढेंच.

आकाशास हात लावावा असें एखाद्याच्या मनांत येऊन आकाश कोठें सांपडेल, म्हणून तो पाहूं लागल्यास त्याच्यापासून कांहीं कोसावर तें भूमीस टेकलेलें दिसेल. ती दीड कोसाची मर्यादा आक्रमून तो गेला तर पुन्हां तितकेंच लांब तें त्याला दिसेल. मिशनरी लोकांप्रमाणें दृढानुसरण करून हात लावीन तेव्हांच राहीन, असा संकल्प करून तो जन्मभर तसा प्रवास करीत राहिला तर कालांतरानें पुन्हां पूर्वस्थळीं येईल. पुन्हां आकाश कांहीं कोसावर त्याला दिसेल. तसाच प्रकार सुखाचा आहे. मनुष्यास प्राप्त स्थितींतील सुखानें तृप्ति होत नाहीं. आपल्यापेक्षां वरिष्ट प्रतीच्या माणसाची स्थिति पाहून त्या पायरीवर आपण पोहोंचलों म्हणजे आपण सुखी होऊं असें मानून तें सदा सर्व काळ वरच्या पायरीवर चढण्यासाठीं धडपडत असतें. त्या धडपडींत त्याला जी मेहनत पडते व त्रास होतो, त्याच्याकडे त्याचें लक्ष मुळींच जात नाहीं. भावी सुखाच्या आशेच्या धुंदींत त्याला मेहनत व त्रास वाटतच नाहीं. आकाशास शिवण्यास निघणाऱ्या मनुष्याच्या ठिकाणीं सगळ्यापेक्षां हलक्या कमाईचा मजूर समजा; त्याला वाटतें कीं, आपल्या पुढल्या टप्प्यावर म्हणजे शेतकऱ्याजवळ सुखाचें निवासस्थान आहे. पक्षी तरी आपली कांहीं दिवसांची बेगमी करून ठेवीत असतील, क्षुद्र मुंग्या देखील दूर दृष्टीनें कांहीं दिवसापुरता साठा करून ठेवतात. पण आपल्यास नित्य नवा धनी पाहून रोज नवा शिधा मिळवावा लागतो. एक जमीन जर ईश्वर कृपेनें मिळेल तर आपण खचीत सुखी होऊं. कोणाचे चाकर ना नोकर. जितके

श्रम तितकें पीक धरणी माय देईल. शेतकरी आपल्या पलीकडील व्यापारी, कारागीर, ह्यांजकडे पाहून झुरत असतो. सावलीमध्यें गादीवर बसून आपल्यापेक्षां जास्त कमाई करून आपल्यावर हे लोक अंमल करितात. धन्य त्यांची पुण्याई, व्यर्थ आपळें जिणें, सुख त्याच्याचपाशीं आहे, असें तो मानून व्यापार धंदा करण्याविषयीं धडपड करितो. व्यापाऱ्याची नजर सरकारी नोकराकडे, जाते. त्यांस वाटतें रात्रंदिवस " उणें दे पुरे दे करावें, शंभर लटपटी कराव्या लोकांच्या डोळ्यांत धूळ टाकावी, आपल्या डोळ्यांत तेल घालून जपावें, " कण त्यागीन भगवान " हें सूत्र हृत्पटिकेवर खोदून ठेवून कवडीची सुद्धां कसर पाहून कवडी कवडी जोडावी, एक राम लंकेवर गेला तर राक्षस कुलाची राख रांगोळी झाली; दररोज लाखो राम ( कच्चे ) आपल्यावर चढवून घ्यावें. दैवदुर्विपाकास्तव किंवा कांहीं चूक होऊन होणारे तोटे व ठोकरा बसतात त्या सोसाव्या, आणि बाहेर शेटजी म्हणून मिरवावें, असलें हें आपलें जिणें कोण्या देवानें आपल्या मागें लावलें आहे कोण जाणें. लक्षाधीश व्यापाऱ्याला सुद्धां हलक्या सरकारी नोकरापुढें लवून जयगोपाळ करावा लागतो. " रावशाब, रावशाब, आपली दुकान आहे. काय हुकूम, म्हणून खुशामत करून हळूच रावसाहेबांचा कान कापावा लागतो. महिना आखेर होण्याचा अवकाश कीं रोकडा पगार बीनसूट बीनतक्रार पदरीं पडतो, खेरीज सरबराई, पानसुपारी, नजरनजराणे निराळेच. नाच, तमाशे मेजवान्या, चहा, काफी, हिशेबांतच नाहीं. मोठ्या अंमलदारांचें तर विचारावयासच नको. शेंकड्याच्या मापांचे पगार व सर्व हद्दींत अंमल करतील ती पूर्व दिशा. तशा अंमलदारास व लहान सहान सरकारी लोकांस सुख आहे असें व्यापाऱ्यांस वाटतें. नोकर लोकांस वाटतें कीं, दिवसानुदिवस पोटिस्तें बुडालीं. अंमलदारांच्या स्वाधीन कांहींच राहिलें नाहीं. फार तर लोकांस त्रास देण्यास मात्र सवड आहे. कोणाचें पैचें हित करण्याचें स्वाधीन नाहीं. अर्थातच काम करणें स्वाधीन नाहीं तर पैसा कोठून कोण देणार. अन्याय करावे जुलम करावे, लोकांस बळेंच अडचणींत घालावें, तर मात्र पैसे मिळणार. पण तसें करून निभावत नाहीं. दुष्कर्मांचा बोभाटा होतो. ज्यावर जुलूम होतो त्यांजकडून ओरड होतां होतां पायली मरली म्हणजे पुढले शिपाई मागे होतात, तुरंगाच्या, व सजीन्याच्या किल्ल्या

हुकुमांतून जाऊन सदा तुरुंगातच वास होतो. जो पगाराच्या बाहेर इच्छा करीत नाहीं तो मात्र सुखी रहातो. पण मोजका पगार दिमाखास पुरत नाहीं. निष्कंटक मुलूख झाल्यामुळें वरिष्ट अंमलदार बेपर्वा झाले, आणि कामगार पोटार्थी झाले, त्यास दुसरा आधार नाहीं; यामुळें अंमलदारास मान मुळींच राहिला नाहीं, वोज नाहीं. रयतेच्या देखत दुरुत्तरें वरिष्ट अंमलदार बोलतात. भलतीं सलतीं कामें धर्माविरुद्ध सुद्धां करण्यास लावतात. यामुळें अंमलदारांस वाटतें कीं, आपल्या वर्षांच्या प्रासिद्दतकी कमाई एका सत्यांत व्यापारी करितात. धिःकार असो ह्या नोकरीला आणि ब्राह्मण जन्माला. सगळें काम करावें आम्ही आणि ओझ्यावरी पगार घ्यावा साहेबांनीं. सुख आजकाल कायतें साहेब लोकांत आहे. सिव्हिलियनाच्या जागा आतां आपल्यास मिळण्याची तर आशा नाहींच, पण कसेंही करून आपले पुत्र नातू ह्यांस विलायत क्षेत्रीं पाठवून मुद्रांकित करून आणूं म्हणजे त्यांस तरी सुख मिळेल. सिव्हिलियन गव्हर्नरापाशीं सुख मानतात राजेही आपल्या स्थितीनें संतृप्त नाहींतच. तें आपल्यापेक्षां जास्ती मुलुखाचें राज्य करणाराकडे पाहून झुरत असतात. यामुळें प्रत्येक राजास आपला शेजारी शत्रु वाटतो. जो तो आपल्या परी धाकांत दिवस काढतो. राज्य गहाण ठेवावें लागलें तरी पुरवलें, सर्व रयत बेदील झाली तरी पुरवलें पण सेना वाढवून आपल्या राज्याची शास्त्रीय सरहद्द आमका मुलुख गट्ट केल्यावाचून मजबूत व्हावयाची नाहीं करितां तो काबीज केल्यावाचून सुख नाहीं. अशा प्रकारचे अनेक ध्यास राजास भोंसकीत असतात. विद्यमान स्थितींत कोणालाच समाधान नसून आभाळास हात लावण्यास जाणारा प्रमाणें सुखाच्यामागें मनुष्य मात्र लागलें आहे. त्यास सुख एक मजल पुढेंच दिसत आहे. सगळ्या लंकेतील वस्त्रें सरलीं तरी मारुतीचें शेंपूट दोन बोटें मोकळें तें मोकळेंच, सगळ्या गोकुळांतील दोर दोऱ्या सरल्या तरी भगवंताची कंबर दोन बोटें मोकळी ती मोकळीच, तसें पृथ्वींवरील सर्व ऐश्वर्य प्राप्त झालें तरी आभाळाप्रमाणें सुख एक मजल पुढें तें पुढेंच.

## फेरतपासणी.

राजास सुख नसतें असें नुकतेंच सांगितलें आहे व पूर्वी अनेक स्थळीं

त्याचें विवेचन झालें आहे. आतां प्रतिनिधीचा विचार करूं. सगळया दुनियेंत मोठ्या पगाराचे व्हाइसराय होत. प्रस्तुतच्या व्हाइसरायांची मुदत वाढविण्याचें प्रधान मंडळाच्या मनांत आलें तेव्हां या अद्वितीय प्राप्तीच्या व अधिकाराच्या हुद्याची मुदत वाढविण्यापूर्वी ज्यास्ती मुदतीपर्यंत काम करण्याची व्हाइसरायांची खुषी आहे कीं नाहीं हे पूर्वी समजून घेण्याचें काय कारण होतें. येवढया पदास कोणी नको म्हणेल काय ? प्रधानांनीं हा नसता उद्योग कां केला. प्रधानमंडळ दुनियेंतील पहिल्या प्रतीच्या शाहण्यापैकीं असतांना, त्यांस इतकें कां कळत नाहीं! नाहीं असें कसें म्हणतां येईल वैभव आणि लक्ष्मी येवढीच काय तीं सुखें; असें आपणा अभागी लोकांस वाटतें तें सत्य नव्हें. स्वदेश, स्वग्राम, आपलें घरदार वतनदाऱ्या, आप्तसोयरे, इष्टमित्र, स्वदेशसंबंधी कर्तव्यें, स्वजातिसंबंधाचीं कर्तव्यें, आणि सर्व ऐश्वर्याचें संपादन ज्या मुलाबाळांसाठीं करावयाचें तीं मुलें-बाळें अशीं अनंत सुखधामें मनुष्यानें मानलेलीं आहेत. विपत्कालीं वरील सुखधामें त्या दरिद्र्याच्या वाऱ्यास सुद्धां चाहत नाहींत, आणि पोटाच्या काळजीमुळें आणि उपहास व अपमान यांच्या भीतीनें दरिद्री त्यांजकडे जात नाहीं. पण जसजशी संपन्नावस्था प्राप्त होते, तसतसा ह्या सुखांस पान्हा फुटूं लागून उभयपक्षीं त्यांच्या अभिलाषास पूर येतो. हा सुखाचा सुकाळ पांच हजार कोसांवर ठेवावा तेव्हां प्रतिनिधी पदाचे विलास भोगण्यास रहावें. वरील सुखें तरी देहाकरितां, तो देह इंग्लंदांतील थंड हवेंत वाढलेला, त्याला हिंदुस्थानांतील कडक हवा किती तरी कष्टप्रद ! कामकाज न करितां नुसत्या सह्या ठोकून चैनींत व ऐषआरामांत दिवस काढावयास सांपडत आहेत असेंही नाहीं. सामान्य कारकुनापेक्षांही जास्त काम व्हाइसराय साहेब करतात. त्यांचें सर्वच काम महत्त्वाचें. तीस कोटि प्रजेच्या संरक्षणाच्या, पाळनपोषणाच्या, सुखदुःखाच्या, जबाबदारीचें तेव्हां मानसिक श्रमाचें अनुमानही करणें कठीण. शिवाय स्वदेशाची राज्यतृष्णा भागविण्याकरितां ह्या संस्थानाची छाटाछाट, त्या संस्थानची अदलाबदल, मोठ्या शिथापीनें सावर पसरून मानमावी कान्यानें सर्व प्रकारें अपल्या फायद्याची करून, पुनः संस्थानिकांची राजीखुषी जगजाहीर करावयाची, आपण गरिबगुरिबांस गिळीत असतां आपल्यास गिळण्यास आ पसरून बसलेल्या रिसास रोखून ठेवावयाचें, अशीं शतशः लचांडें अत्यंत जोखमीचीं इतकीं

भयंकर की चूक झाली तर अतर्क्य अनर्थ ओढवावयाचे. इतक्या काळज्या ठेवून आपल्याप्रमाणें सगळ्या भूगोलावरील मंत्र्यांच्या कारस्थानावर नजर ठेवावयाची, असें कोठवर लिहावें ? पगाराच्या व लौकिकाच्या लालुचेनें हें काम करणाराच्या मनास विश्रांति, संतोष, सुकृतापासून, परोपकारापासून व दानधर्मापासून मिळणारें समाधान किती होत असेल, त्याची मनोदेवता त्याच्यावर किती सुप्रसन्न असेल त्याचा विचार वाचकांनींच करावा.

## ज्याचें अंगीं मोठेपण ॥ तया यातना कठीण ॥ १ ॥

सिव्हिलियन लोकांचे ओझ्यावारी पगार पाहून सामान्य लोकांस वाटतें कीं, एवढ्या पैशाचें हे लोक काय तरी करीत असतील ? लंकेप्रमाणें विलायतेंतल्या लोकांनीं सोन्याचीं घरें बांधिलीं असतील, कां पेवें भरून ठेविलीं असतील कोण जाणे ! लंकेंत एका मनुष्याला एका दिवसाची मजुरी सोन्याच्य सात विटा मिळत असत. पण संध्याकाळपर्यंत सामान्य प्रकारें निर्वाह करण्यास जवळ जवळ खर्च तितकाच येत होता. तसाच प्रकार सिव्हिलियनांचा होतो. त्याचे ह्या देशांतील खर्च, मुलांच्या अभ्यासाचे खर्च वगैरे पाहिले म्हणजे पुष्कळ मुलेंबाळें असलीं म्हणजे खर्चाची तोंडमिळवणी होतां होतांच मारामार पडते. ज्यास परिवार कमी आणि प्राप्ति ज्यास्ती त्याच्यापाशीं माया जमते, ती आपल्या दृष्टीनें फार मोठी दिसते. पण त्यांच्या देशांतील खर्चाचें व पैशाच्या किंमतीचें मान पाहिलें म्हणजे देशी कामगारापेक्षां ते फार सुखी असतात असें नाहीं. व्हाइसराय साहेबांस पगाराच्या लालचीस्तव सुखें सोडावीं लागतात तीं ह्यांसही सोडावीं लागतात. मूल थोडेंसें जाणतें झालें कीं, पांच हजार कोसांवर लावून आईबापांस इकडे रहावें लागतें. प्रपंचांतील सर्व माणसें आनंदानें एका घरांत राहून सणवार करण्यांत किती आनंद आहे तो आपल्यास ठाऊक, त्या बिचाऱ्याच्या नशिबीं तो मुळींच नाहीं. संतति जाणती झाली कीं पशुपक्षी जशी ओळख विसरतात, त्याप्रमाणेंच ह्या लोकांचा मुलाबाळांशीं जन्म देण्यापुरता व पैसे भरून परभारें वाढविण्यापुरता मात्र संबंध राहतो. अर्थात्, प्रेम, ममता इत्यादि आनंदकारक प्रकार त्यांस लाभत नाहींत. पुढें बापलेक ह्यांजमध्यें केवळ तिऱ्हाइतासारखा संबंध राहतो. दोन दिवस लेकाकडे बाप पाहुणा आला तर खाण्याचें बील पुढें येतें. तिऱ्हाईत

पाहुण्यास सुद्धां आपल्याकडील गरीब लोक असे पैसे मागतील काय ! केवढा हलकेपणा !

## इकडील कामदार.

इकडील कामगारांस मुलखावाळांची ताडातोड तितकी करावी लागत नाहीं. तरी आनंददायक आपलें घर, आपलें शहर, आपली जन्मभूमी, आपली वतनदारी, मुलेंबाळें, कधीं कधीं धर्मपत्निसुद्धां, सोडून दूर देशीं रोजगारानिमित्त रहावें लागतें. सरकारची चाकरी म्हणजे सुळावरील पोळी. मशिदींत दिवा लावण्याप्रमाणें वेळ संभाळण्यास जावें लागतें. उन्मत्त अधिकाऱ्याशीं गाठ पडली तर तरवारीच्या धारेवर असल्याप्रमाणें कामकाजांत दक्ष रहावें लागतें. त्यांच्या तोंडाशीं बांधलेल्या कुत्र्याचें भोंकणें खालीं मान घालून सोसावें लागतें. प्रत्यक्ष बापाच्या क्रियेस किंवा मुलाच्या मुंजीसही रजा न मिळाली तरी चुरमुरें खात बसावें लागतें. लाह्या फुटतात त्याप्रमाणें माणसें ग्रंथिक सन्निपातानें मरत असतां परदेशीं एकाकी रहावें लागतें. दोन आण्यांची मजुरी करणारा मजूर' रावसाहेबांची नोकर माणसेंसुद्धां जीवाच्या बचावासाठीं निघून जातात. आपला परिवारसुद्धां निर्भयस्थळीं नेऊन ठेवून सर्वांपेक्षां श्रेष्ठ असा आपला जीव त्या आगींत दैवावर हवाला देऊन ठेवणें भाग पडतें. सारांश, आपली स्वतंत्रता न विकणारे व्यापारी आणि शेतकरी आपल्यापेक्षां पुष्कळ बरे असें त्यावेळेस कळून येतें.

## व्यापारी.

व्यापारी ह्याच्या अडचणी मागें कळल्याच आहेत. त्याखेरीज त्यांनाही व्यापार निमित्त विदेशीं रहावें लागतें. मुलास गुमस्तगिरी करावयास लावावें लागतें. सारांश, ते नोकरापेक्षां स्वतंत्र खरे पण स्वतःच्या हिताकरितां त्यांस परतंत्र नोकरापेक्षांही जास्त दक्ष रहावें लागतें.

## शेतकरी.

खरा स्वतंत्र एक शेतकरी खरा. त्याचा प्रपंच स्वतंत्र राज्यच आहे. तान्ह्या मुलापासून नव्वद वर्षांच्या म्हाताऱ्यापर्यंत सगळीं माणसें एके ठिकाणीं'

लहानपणापासून सगळीं उद्योगी, कटाक्ष, धट्टीकटी, सर्वांपेक्षां सुखाची गोष्ट ही कीं सगळीं अल्प संतोषी, राज्य कोणी करो, कोणी राज्यावर धाड घालो, त्याच्याविषयीं बेफिकीर. मुसलमान गेले, मराठे आले. ते गेले, इंग्रज आले. शनवारचा वाडा गेला, नानाचा वाडा गेला, सगळ्या हिंदुस्थानवर सत्ता करणाऱ्या मटवंशास उभें राहण्यास जागा नाहीं. पण बळी राजाचें घर निर्भय. राज्य निर्भय. जमिनीची खंडणी फेंकून दिली म्हणजे झालें. बळीराजासारखें कुटुंबसुख कोणासच नाहीं. मुलें लहानपणापासून स्वतंत्र स्वगृहीं दूध पिऊन तालीम करून निकोप फोंफावलेलीं. नाहींतर पांढरपेशांची मुलें शाळा, घोकं, पट्टी परीक्षासत्रें ह्या मधून पिळून निघून निःप्राण झालेलीं. आईबाप असत तों बळी राजाच्या मुलांस सजीवास दग्ध करणारी काळजी शिवतसुद्धां नाहीं. ताजे पदार्थ, शुद्ध हवा, साधी रुची, संतोषपूर्ण साधी वागणूक आणि निर्मळ भाविक व समाधान परिपूर्ण मन ह्या नैसर्गिक देणग्यांनीं त्याच्यासारखा सुखी राजा सुद्धां नाहीं. राव रंकाचा तो अन्नाच्छादन दाता. "आठ बैल दोन म्हशी. विहीर पाण्यासरशी; मग भोजराज कः पदार्थ." "ज्याच्या घरीं काळी ( म्हैस ) त्याला नित्य दिवाळी." अशी त्याच्या घरची स्थिति असते. बारा बलुते व बारा आलुते त्याच्या सेवेस तयार असतात. धर्मराजानें अनृणीच अप्रवासीच शाखं पचति स्वगृहे" अशी सुखाची व्याख्या केली आहे, ती बळीराजास बरोबर लागते. इंग्रजी राज्यांत गैर माहिती मुळें व धन तृष्णेमुळें मोठी चूक होऊन जमिनीवरील शेतकऱ्याची सत्ता नाहींशी केली, जमीन जप्तीस पात्र केली. सारा का न भरला कीं जमीन जावी असें ठरविलें, यामुळें शेतकऱ्याच्या सुखाची माती झाली. सरकाराच्या साऱ्याच्या धास्तीस्तव सावकार घरांत शिरवावा लागला. ऋणाच्यापायीं सर्वस्वासुद्धां जमिनी गेल्या. फार काय सांगावें. मनुष्य विकण्यास कायद्यानें प्रतिबंध केला नसता तर शेतकऱ्यांचीं बायको पोरें तर काय बिचाऱ्याचा देह सुद्धां सावकारांनीं विकून कोर्टाच्या परवानगीनें लिलावांत घेतला असता ! एकीकडून सरकार देणें आणि दुसरी कडून सावकार देणें ह्या दोन लाटांत बिचारा शेतकरी सध्या पिळून जात आहे. अर्थातच त्याच्याच शेतांत मजुरी करणाऱ्या

मांणसापेक्षां सुद्धां आपली स्थिति वाईट त्यास वाटते. दोन आणे; मिळवून पोटाची तृप्ती करून रात्रीं निसूर झोंप घेणें बरें, पण ही जमीनदारी नको असें त्यास वाटूं लागतें. म्हणजे आकाशास शिवण्यास जाणारा पूर्वस्थळीं आला त्याप्रमाणें सुखाभिलाषी पूर्वस्थळावर आला. सारांश ह्यानें त्याला व त्यानें ह्याला सुखी म्हणावें. खरा सुखी कोणी नाहा.

## सुखभ्रांति.

पुढें पुढें भासणारें आकाश वस्तुतः सत्य आहे काय? स्पर्श करण्याजोगे मुर्त आहे काय? नाहीं. म्हणावें तर प्रत्यक्ष दिसत आहे. आहे म्हणावें तर हस्तगत होत नाहीं. त्याप्रमाणेंच सुख ही केवळ भ्रांति आहे. सुख नाहीं म्हणावें तर विषय आणि मायाजाल ह्यांनीं सुखाचीच लालूच दाखवून जीवाला अंध करून जन्म मरणाचे फेरे घालण्यास लावलें आहे. आहे म्हणावें तर त्याच्यामागें लागावें तों तों मेहनत, त्रास, हानि, निराशा आणि दुःखपरंपरा मात्र वाढून अपार पाप ताप मात्र गळां पडतात आणि शेवटीं तें हातीं येत नाहीं तें नाहींच. जावत्काळ मनाला अज्ञानानें घेरलें असतें, तोंपर्यंतच ह्या अनुकूल वेदना म्हणजे सुख आहे, असें मन घेऊन बसून त्याच्या प्राप्तीकरितां अनुदीन अष्टौप्रहर तळमळ करून आपल्याला व आपल्या बरोबर देहाका आणि परिवारालाही राबवीत असतें. पण एकदां ज्ञानाचा प्रकाश होऊन ज्ञानदृष्टि मोकळी झाली म्हणजे वर लिहिलेल्या सर्व गोष्टीसुद्धां हें घाणेरडें अनुकुल वेदनात्मक सुख मिथ्या ठरून नाहींसें होतें.

**विस्तारभारानें मू/8 ाचा चुराडा.** अनुकूल प्रतिकूल वेदना ज्ञानेंद्रियांस व्हाव्या, हा त्यांचा नैसर्गिक धर्म असल्यामुळें ज्या त्या इंद्रियाला त्याच्या विषयापासून सुखदुःख वाटणारच. सहजासहजी प्राप्त होणारें विषय मनुष्याला स्वभाविकपणें सुख दुःख देतच असतात. मन अति चंचल. आहे. ह्याची धांव अक्षयी कोणीकडे तरी चालावयाचीच. त्याला विषय हीच काय ती सुखाची जागा आहे, असें वाटतें; ह्मणून त्याविषयीं त्याला वेध लागून जातो, तीच इच्छा होय. हिला अंत नाहीं, तृप्ति नाहीं, कितीही सुख झालें तरी तिला आणखी पाहिजेच. राम ह्या दोन अक्षरांच्या बीजावर वाल्मिकीनें

शतकोटी रामायण रचिलें. न्याय ( सत्य ) ह्या बीजावर न्यायशास्त्राचे गाड्या-गाडी ग्रंथ प्रत्येक राष्ट्रांत असून दरमहाच्या दरमहा किंवा दररोज ह्यांत भर पडतच आहे. न्यायाच्या ग्रंथांत कांहीं धडधडींत अन्याय घुसडला गेला आहे. मुदतीचा कायदा म्हणजे धादांत अन्याय नव्हे काय! एका घटकेपूर्वी हक्क अंमलांत घेण्याजोगा होता; पण त्यावरून एक घटका गेली म्हणून झाला बातल! अन्नावरून ग्रहण गेलें, म्हणून अन्न अग्राह्य. तद्वतच, विषयसेवनाच्या लालसेनें विषयाचें एकमेकांशीं मिश्रण करून त्यांत सहाव्या इंद्रियाच्या कल्पनांची आणखी भर घालून जीव सृष्टीनें; हें जग विषयांनीं भरून काढलें आहे! सगळा जन्म ह्या विषयांच्या भोंवऱ्यांत जाऊन चिंधड्या उडून जात आहेत! खोटें असतां खरें मानलेलें विषयसुख या पर्यायांच्या पर्वताखालीं कोठें चिरडून जातें त्याचा पत्ताही लागत नाहीं. सुख सुख म्हणून नसतें दुःख मात्र न कळत पदरीं पडतें.

## मिजाशीचा परिणाम.

वर लिहिलेलीं विधानें ठसण्याकरितां स्पर्श व रससुखाचा मासला पहा. त्वचेस गरम गरम प्रिय आहे खरें; पण मनुष्यदेह बसून राहण्यास निर्माण केलेला नसून प्रवृत्ति व निवृत्ति मार्गांतील अनेक सत्कृत्यें करण्याकरितां निर्माण केला आहे. " मर्दनं—गुणवर्धनं " हा गुण त्यांत ठेवला आहे. जितके जितके श्रम पडतील, तितका तितका अग्नि प्रदिप्त होतो. तितकें तितकें खाणें-पिणें जास्त होतें, तें ज्या मानानें जास्त त्या मानानें शरीरांत बल, तेज, उत्साह आणि पराक्रम जास्त होतो. जितके हाल आणि अपेष्टा, तितका कंटकपणा वाढून दुखणींबहाणीं दूर पळतात. मोठमोठीं श्रमसाहसाचीं कामें करण्याचें आणि संकटें व धोके धैर्यानें सोसण्याचें मनाला सामर्थ्य येतें. अन्यपर्शी मिजास वाढेल तितके मनुष्य नाजूक म्हणजे अशक्त होतें. भोग-शक्ति व पचनशक्ति क्षीण होतें. खाणेंपिणें कमी पडत जाऊन थोडें होतें, तेंही पचत नाहीं. एका लवंगेनें उष्ण आणि एका वेलदोड्यानें थंडी होते! कमकुवत होऊन मन अगदीं दुर्बळ होतें. असल्या फुसक्या शरीरांत तेज, बल

पराक्रम काय उत्पन्न होणार! धोक्याचीं कामें काय त्यास होणार? विषय-सुखाचा अनुभव घेण्यास शरीर निकोप पाहिजे. असल्या मेषपात्र शरीरानें विषयसुख तरी काय मिळणार?

## राष्ट्रघात.

आपल्या राष्ट्राकडे बारीक नजरेनें पाहिलें म्हणजे असें दिसून येतें कीं, वर्णाचे आणि परिस्थितीचे ज्या मानानें उच्चत्व त्याच मानानें सामर्थ्य, पराक्रम, तेज, आयुष्य आणि शरीर ह्यांचें नीचत्व. हा परिणाम एकाच पिढीस धरून संपत नाहीं. सर्व सुखाचें साधन शरीर तें पिढी दरपिढीस उतरत्या मानाला लागलें आहे. सगळें राष्ट्र नामशेष होणार कीं काय, अशी भीति वाटूं लागली आहे. एवढा दारुण परिणाम स्पर्शसुखाच्या पर्यायाच्या डागरान केला. मिजास मिजास ह्मणतां ह्मणतां राष्ट्रघात होण्याची वेळ आली. स्पर्शसुख पार चुरडून गेलें.

## सापेक्षता.

वासनेच्या हातचें कळसूत्रीं बाहुलें बनून विषयांचे देव्हारे माजवून ते विषय-अतिरेकास नेल्यानें सुख जास्ती होतें कीं काय? साधनसामग्रीच्या मानावर सुखाचें मान आहे काय? साधनसामग्रीनें सुखाला सापेक्षता येऊन सामग्रींत कांहीं कमी पडलें कीं, सुखाची हानी होते. भोजनाचा उद्देश क्षुधा, समाधान, रसना, संतोष आणि शरीरपुष्टि हा आहे. आतां मोठा जहागीरदार आणि गरीबसा शेतकरी ह्यांच्या भोजनसुखाची तुलना करून पाहूं. पहिल्याचें पात्र बहुमोलाचें आणि दुसऱ्याचें अगदीं हलके. पहिला क्षुद्बोध न होतां गोड गोड खाणारा, दुसरा श्रमानीं भुकेचें रान कडकडून जाऊन केव्हां हातातोंडाची गांठ पडेल असें झाल्यावर, असेल तें साखरेच्या चवीनें गोड करून खाणारा. पहिला नेहमींच गोड खाण्याची संवय असल्यामुळें त्याचें कांहीं महत्व वाटेनासें झालेला, थोडे पदार्थ असल्यानें जेवणाची पूर्तता न वाटून सतरा पक्वान्न करून ताट शृंगारून चाखत माखत चिवीचिवी कांहीं तरी खाऊन पोटांत स्वस्थ नाहीं म्हणून ढेकरा, जांभया देत बसून दिवस काढणारा, दुसरा नुसत्या

कांद्याशीं किंवा तिखटाशीं अनेक सूर्यकन्या झोडून तांब्या अर्धा तांब्या पाणी झोंकून देऊन आज भाकर "लई ग्वाड" लागली, म्हणून क्षणभर लोळून लागलाच कामावर जाऊन पुन्हां संध्याकाळीं भाकरी झोडण्याकरितां प्रखर भूक तयार करणारा, नुसत्या कांदाभाकरीनें दुसऱ्याला क्षुधा निवारणाचें रुचीचें आणि पुष्टतेचें जें सुख मिळालें, त्याच्या दशांश तरी त्या मिजासखोरास अर्थात आळशास मिळालें असेल काय ? जास्त पैसे मात्र खर्च होऊन व्यर्थ गेले. जहागीरदार साहेबांच्या पात्राच्या विस्ताराला जरा कांहीं कमी पडलें कीं झाली जेवणाची माती, लागले चुकल्या चुकल्यासारखें वाटूं, गेली तब्बेत, लागले कुत्र्यासारखे ज्यावर त्यावर तोंड टाकण्यास, कोठें गेल्यामुळें जरा जेवणास अवेळ झाली कीं, चढलें कपाळ, पिकली वैद्यराजांची पोळी, इकडे बळीराजा कोठें कां जाईना भाकरीचे येंडकें जवळ असलें म्हणजे कोठें तरी स्वच्छ पाणी आणि रम्य छाया पाहिली कीं सोडलें येंडकें, लावलें *घड्याळाला टिपरूं कीं झालें काम; दोन घटका उशीर झाला तर एक भाकर जास्ती. पित्त बिचाऱ्याला थरथरा कांपतें ! जाहगीरदार जेवतांना कोणी येतां कामा नये. दृष्ट होते ! म्हणून घरांतल्या कोंदट हवेंत थोड्या तरी धुरांत आणि माशांच्या त्रासांत बसणें भाग ! बळीराजास दृष्ट पडत नाहीं, धूर नाहीं, माशा नाहींत, रानांतल्या स्वच्छ, शुद्ध व निरोगी हवेंत एखाद्या झाडाखालीं किंवा कोपींत आनंदानें जेवण होतें. आतां खरें रससुख कोणाला लाभलें ? आणि रससुखाचें सार्थक कोणापाशीं झालें ? पहा.

## मेल्या अन्नास बळ कोठलें.

विषयसेवनाचे पदार्थ, पर्याय, सामुग्री वगैरे भारुड अति वाढल्यामुळें खऱ्या विषयसुखाचा चुराडा झाला आहे ! आपण जे जे पदार्थ खातो त्यांच्यांतील बलानेंच आपल्यास बळ येण्याचें असतें. पण आपण रुचीला भुलून, आणि रुचीच्याच लोभानें पदार्थ जितका जास्ती खाववेल तितका खाण्याची इच्छा बाळगून ते पदार्थ भाजून. शिजवून, जाळून, मळून वगैरे नानाप्रकार करून त्यास मारून आपण खातों. अर्थात् त्यांचें बळ नष्ट करून त्यांचा निस्सत्व झालेला

* भाकरीला तिखट.

अंश मात्र पोटांत जातो; त्यामुळें आपल्यास बळाचा लाभ होत नाहीं. हिरवा हुरडा खाणाऱ्यास मानवतो तितका भाजलेला मानवत नाहीं. थंड पाणी पिणारास बल असतें तसें तापवून पिणारास असत नाहीं. साय काढून दूध सेवन केलें तर नुसत्या दुधाइतकें शक्तिदायक होत नाहीं. आपल्यास अनादि कालापासून ही संवय झाल्याकारणानें आपला कोठा केवळ अशक्त बनून गेला आहे, व उत्तरोत्तर अशक्तता वाटत आहे; त्यामुळें निर्जीव केलेले पदार्थ सुद्धां दिवसानुदिवस सोसेनातसे झाले आहेत! आयुष्य कमी होत चाललें आहे. नैसर्गिक पदार्थ व गोष्टी नेहमीं कृत्रिमापेक्षां श्रेष्ठतर असतात. पण मनुष्य आपल्या अकलेच्या तोऱ्यांत तें न समजून वेड्या समजुतीनें नानातऱ्हेचे कृत्रिम प्रकार वाढवून पंचविषयांच्या भोगाच्या अनंत पऱ्याकारांत पडून आपलें सर्वस्वीं नुकसान आणि घात करून घेत आहे. गांवांतील पशुपक्षी आणि रानांतील त्याच जातीचे प्राणी पहावे म्हणजे नैसर्गिक आणि कृत्रिम ह्यांमधील अंतर दिसेल. खेडयापाडयांतील लोक नागरिकांपेक्षां धडधाकड व दीर्घायुषी असतात.

## निद्रासुख कोणास जास्ती.

रंगमहाल, गुडघ्या इतका बिछाना, छपरपलंग, वाळ्याचे पडदे, पंखे, गायक वगैरे खटाटोप जमतील तेव्हां जाहगीरदार साहेबांस झोंप येणार, झोंप कोठली थोडा डोळा लागणार. बिछान्याला एखादी सुरकुती पडलेली असली कीं बिघडली झोंप, फुकाचें खाऊन सगळा दिवस लोळत पडणार, मग झोंप कोठून येणार ? इकडे बळीराजा मऊ करून म्हणजे सगळा दिवस सपाटून श्रम करून आकाशाच्या पांघरुणाखालीं धरणीच्या मृदु शय्येवर गाढ झोंप घेतो. व्याप तितका संताप. या न्यायानें जाहगीरदाराच्यामागें अनेक व्याप असतात, यामुळें त्याला अनेक काळज्या व विवंचना असतात, ह्यामुळें त्याला इतकी साधनसमृद्धि असूनही सुखाची झोंप येत नाहीं. बळीराजा धरत्री मातेची सेवा करणार, ती प्रसाद देईल तो खाणार आणि होईल तें होईल म्हणून आनंदांत राहणार

## सर्वांस सारखें सुख.

विचारानें पाहिलें असतां परमेश्वरानें सुख सर्वांस सारखेंच ठेविलें आहे. गायनानें मनाचा, स्पर्शानें त्वचेचा, रसानें रसनेचा, रूपानें नेत्राचा आणि गंधानें नाकाचा संतोष व्हावयाचाच. श्रीमान आणि गरीबगुरीब ह्यांचा भेद ह्या ठिकाणीं मुळींच नाहीं. इंद्रियांना विषयांचें सुख सहजगत्या परिस्थितीनुरूप प्राप्त होतेंच, व तें प्राप्त झालें कीं संतोष होतोच. हा संतोष कांहीं विषयांच्या प्रमाणावर लहान मोठा होत नाहीं. विषय मग तो कितीही लहान असो तो प्राप्त होतांच इंद्रियांस संतोष होतो. मासाभर कस्तुरीचा वास घेतल्यानें मासाभर संतोष आणि शेरभर कस्तुरीचा वास घेतल्यानें शेरभर संतोष, असा कांहीं प्रकार नाहीं. परिमितापेक्षां जास्त विषय प्राप्त झाल्यानें उलट त्रास मात्र होऊन सुखाचा भंग होतो. फार साखर खाल्ल्यानें मिठी बसते. फार मीठ झालें तर खारट होतां होतां कडू होतें. फार सुगंध झाला तर डोक्यांत भरून त्रास होतो. सुख सर्वांस सारखेंच. प्रत्यक्ष देवेंद्र आणि सुकर ह्यांच्या सुखदुःखांत कांहींच अंतर नाहीं हें शिरोलेखावरून कळतच आहे. रंभेपासून होणाऱ्या रतिसुखाचा इंद्राचा संतोष आणि शूकरीपासून शूकरास होणारा संतोष ह्यांत काय अंतर आहे. अमृतपानापासून देवेंद्रास होणारी तृप्ति आणि डुकरास त्याच्या घाणेऱ्या अन्नापासून होणारी तृप्ति यांत काय फरक आहे. मरणाचा ताप डुकरास आहे, तोच धाक स्थानभ्रष्टतेचा सुरेंद्रास नाहीं काय ! तात्पर्य तत्वतः सर्वांस सारखेंच सुख आहे. पण तेंही असत्यच, बळेंच मानून जग त्याच्या नादानें गुंग झालें आहे. तत्वतः तें सत्य नसून केवळ भासमान आहे हें मागें सिद्ध झालेंच आहे. कुपथ्याचे पदार्थ भक्षण केल्यानें अंगास कंडू सुटून हात खाजवावेंसें वाटलें म्हणजे खाजवितांना सुख वाटतें, पण तें पुढें सरूज उत्पन्न करून दुःख मात्र देण्याचें बीज असतें. त्याप्रमाणें अज्ञान आणि वासना यांच्या कुपथ्यामुळें मनास भोगेच्छारूप कंडू उत्पन्न होऊन पंचज्ञानेंद्रियांचा क्षोभ होतो आणि खाजविण्याप्रमाणें व्यापार होऊन पंचविषयांचा भडिमार झाला म्हणजे स्वर्गसुख सुद्धां तुच्छ वाटूं लागतें. पण दुःखाणारांचें काहूर आलें म्हणजे सरजुल्या माणसाप्रमाणें जिकडे तिकडे तिरस्कार, दुर्दशा आणि वेदनांचा सुकळ होतो.

## दुःख मिथ्या.

सुखास विघात करणारें काय तें दुःख आहे. त्याचा आतां विचार करूं. सुखास अंतराय तेंच दुःख होय. दुःख म्हणून स्वतंत्र असा कांहींच पदार्थ नाहीं. चिंता, क्लेश, दरिद्र आणि शोक हीं दुःखाचीं चार स्वरूपें आहेत. पूर्वी चिंतेचें विवरण झालें आहे. चिंतेचा नसता बोजा अज्ञानानें बळेंच आपण शिरीं घेतों, ती प्राप्त झाली असतां तिच्या बाधेनें विव्हळ न होतां भगवंताचा धावा करून भगीरथ प्रयत्न संकट निवारणार्थ करावा म्हणजे झालें. क्लेशाविषयीं मात्र मोठा विचार केला पाहिजे. हे शरीरालाच होत असल्या कारणानें सामान्य मॉणसांस विव्हल केल्यावांचून सोडीत नाहींत. ह्यांच्या होण्या न होण्यास कारण आपलें आपणच आहों. अपराधावांचून शासन कधीं होत नाहीं. आरोग्यशास्त्राच्या नियमाचें उल्लंघन केल्यावांचून व्याधि सहसा होत नाहीं. व्याधीपासून व्याकुळता न होण्यास विवेकपूर्वक मनाचा दृढ निश्चय झाला पाहिजे, शरिरावरील अहंकार सुटला पाहिजे. तळपायांस कुरवाळिलें असतां गुदगुल्या होऊन हंसूं येतें. हा सर्वांस अनुभव आहे. पण गुदगुल्यापासून मनाला होणारा संस्कार मानावयाचा नाहीं व हंसावयाचें नाहीं, असा निश्चय करून बसतां येतें. मग गुदगुल्या वाटत नाहींत. हंसेंही येत नाहीं. नाकांतील केंस काढल्याबरोबर रणशुराच्या डोळ्यांस पाणी येतें. पण तोच मन दृढ करून रणांत शिरला म्हणजे अनेक वार लागले असतां त्यांची पर्वा न करितां पराक्रम करीत राहतो. नांवाप्रमाणेंच कृति करणाऱ्या परशुरामभाऊस सद्व्यांच्या रणांगणावर पुष्कळ वार लागले, तेव्हां कांहीं दिवस ते रणभूमीवर येणार नाहींत असें संध्याकाळीं लोकांस वाटलें असून जय होण्याची अनायासें संधि आल्याचें ऐकिल्याबरोबर पहाटेसच स्वारी प्रकट झाल्याचें इतिहासांत प्रसिद्धच आहे.

## दुःखविमोचन.

देहाहंकार सोडून इतर संगाप्रमाणेंच देहहा आहे. त्याचा आपला तादात्मिक संबंध कांहीं नाहीं. असें मानणाऱ्या सिद्ध पुरुषांस देहाच्या व्याधीचें मानही नसतें. मिरजप्रांतीं प्रसिद्ध असलेले श्रीअण्णाबोवा सिद्ध पुरुष ह्यांचें अंग बाहेर पडत असे, त्यांस कावळे टोंचीत असत, तरी ते स्वानंदानें वागत असत

' ब्रह्मानंदीं लागली टाळी ॥ कोण देहातें सांभाळी ॥ ' ह्यावरून सामान्य माणसास व्याधीचें दुःख सत्य वाटलें तरी तत्वतः मिथ्याच आहे. विचारी माणसास दरिद्राची तर मुळींच प्रतिष्ठा नाहीं. दरिद्री आणि श्रीमान ह्याच्या व्याख्या आपण समजतों, त्या खऱ्या नाहींत; ज्याचें मन शांति आणि संतोष यांच्या नंदनवनांत विहार करणारें तो पैसेकरी असो वा नसो तोच खरा भाग्यवान. लक्षाधीश किंवा कोट्याधीश असून ज्याला लोभ सुटला नाहीं, द्रव्य रक्षणाची चिंता दूर झाली नाहीं, व्याप सुटले नाहींत, कार्पण्य नष्ट झालें नाहीं, आणि तळमळ गेली नाहीं, तो करंट्याहून करंटा. दरिद्राचें दुःख मानीव व मिथ्या आहे. शोक तर मिथ्या अज्ञानमूलक व अज्ञानप्रदर्शक आहे. हें पूर्वी दिसून आलेंच आहे. दररोज माणसें मरतात, पण त्यांच्याशीं संबंध नसणारास शोक कोठें होतो, पाण्यावर बुडबुडा आला तो फुटावयाचाच, उगवला दिवस मावळावयाचाच, तरुवर केव्हां तरी वठावयाचाच, ह्या स्वभावसिद्ध मर्यादा आहेत. उपजला प्राणी काळाचा खाऊ आहे, हें सर्वांस ठाऊक असून त्याच्याबद्दल शोक करावयाचा म्हणजे अज्ञानाचें प्रदर्शन नव्हे काय ?

## दुःख चतुष्टयापासून लाभ.

स्वस्थता, सुख, संपत्ति व आनंद या सुखचतुष्टयाच्या प्राप्तीनें मनुष्य स्थितीवर राहत नाहीं बेकाम होतें. त्यास ताळ्यावर आणण्यास लगाम आणि कोरडे. ह्याप्रमाणें दुःख चतुष्टयाचा उपयोग होतो. मनुष्याची दुर्बळता, धनवैभव व शरीर ह्यांची क्षणभंगुरता, प्रपंचाची निस्सारता, त्याजमधील अनंत दुःखें आणि परमेश्वराचें अगाध सामर्थ्य ह्या दुःखचतुष्टयाच्या तडाक्यानें जसें अनुभवास येतें तसें दुसऱ्या कशानें येत नाहीं. तसा अनुभव आला म्हणजे सुशील, पूर्वपुण्याई पदरीं बाळगणारीं मनुष्यें तेव्हांच जागीं होऊन त्यांचें लक्ष परमेश्वराकडे लागतें, म्हणून "यस्यानुग्रहमिच्छामि तस्यवित्तं हराम्यहं" असें भगवंतानीं म्हटलें आहे. ह्या म्हणण्याप्रमाणें दुःखाचा मासला सद्वृत्तनी मनुष्यास दाखवितात. त्या वेळीं त्या मनुष्यानीं हिम्मत खचूं देऊं नये. ईश्वराच्या येथें न्याय आहे आपण सद्वृत्तनी आहों त्यापेक्षां आपल्यावर संकट आलें तरी आपला परिणाम वाईट कधीं होणार नाहीं. सत्वधीरावर संकटें यावयाचींच

सोनें तावावें तों तों त्याचें तेज वाढतें, त्याप्रमाणें धर्मराजादिकांवर संकटें येऊनच त्यांची किर्ति अजरामर झाली. सत्यास मरण नाहीं. दुःखावाचून सुखाचा मार्मिक व यथोचित उपभोग होत नाहीं, म्हणूनच प्रभूंनीं आपल्यास दुःखाचा मासला दाखविला आहे. असें समजून त्यात जाबूत ठेवून देवावर भरंवसा ठेवून वागावें. पूर्वपुण्याईच्या जोरावर ज्या घराण्याचा उत्कर्ष पिढी दर पिढी करण्याचा असतो त्या घराण्यावर कांहीं काल विपत्ति प्रभु आणितात. तेणेंकरून त्यांतील माणसें शहाणपण, अनुभव, उद्योग, सोशिकपणा, इत्यादि सद्‌गुण शिकतात तेणेंकरून ताव दिलेल्या झाडांप्रमाणें त्यांचा उत्कर्ष होऊन तीं पूर्वींपेक्षांही वैभवास चढतात. दुर्वर्तनामुळें ज्यांस दुःखचतुष्टय प्राप्त होतें त्यांचा मात्र पूर्ण नाश झाल्यावाचून राहत नाहीं.

दुःखचतुष्टयापासून व सत्वधीर मनुष्यांस फार फायदा करून घेता येतो. चिंतेच्या योगानें एकाच गोष्टीचा सदा ध्यास कसा धरावा हें शिकून प्रपंचांत कोणच्याही स्थितींत असतां परमेश्वराचा ध्यास धरावा. ज्या दरदेमुळें क्लेश होतात. त्या दरदेकडे जशी चित्ताची एकाग्रता होते तशी एकाग्रता भगवंताचें ध्यान धरण्यांत करावी अत्यावश्यक पदार्थांखेरीज कोणचाही भोग किंवा दुर्व्यसन दारिद्र्यामुळें शिवत नाहीं आणि सदुपयोग होतो त्याप्रमाणें साधीवृत्ति ठेवून परमेश्वराकडे लक्ष ठेवावें. सर्व कांहीं नाशवंत असल्याची खातरी होऊन दुःखानें स्मशानवैराग्य उत्पन्न होतें. तेंच सदा कायम ठेवावें. दुःखाचा सत्परिणाम जाणून कुंतीनें सदासंपत्तिरहित ठेव असें प्रभूस म्हटलें.

## सुखेंही मिथ्याच.

दुःखाचीं चारी रूपें मिथ्या आहेत. आपण अज्ञानानें अहंकाराचें ओझें डोक्यावर घेऊन आपपराचें भारूड माजविलें आहे; मोहपाश लावून घेतला आहे; अनुकूल वेदना हें सुख म्हणवून भलतीच समजूत करून घेतली आहे; पंच विषयांचें आणि षड्रिपूंचें स्वाधीन झालों आहों, विवेक व सत्यशोधन ह्यांची ओळख विसरून गेलों आहों. आपण कोण आहों, कोठून आलों, आणि कोठें जावयाचें आहे ह्या मुख्य गोष्टींचें भान समूळ नाहींसें झालें आहे, नश्वरच प्राणापलीकडे प्यारें मानून त्याच्या प्राप्त्यर्थ रक्षणार्थ जन्म घालवीत आहों.

इत्यादि अनंत कारणांस्तव मिथ्या असलेलें दुःख आपल्यास पिळून काढीत आहे. हें मागें दाखविलेंच आहे. सारांश, दुःखें मिथ्या ठरलीं तेव्हां राहिलें तें सुखच आणि तें निजानंद असें म्हटल्यानेंही समाधान होत नाहीं; कारण दुःखें मानिव आहेत, पण अनुकूल वेदनात्मक सुखें तरी तशींच आहेत. "अहो नंदी पाषाणाचे, आपण देव कशाचे" असा हा प्रकार आहे. सुख ना दुःख तेव्हां शेष काय! ह्यांतील इंगित असें आहे कीं, सुखदुःखाचा अर्थच आपल्यास कळला नाहीं. नसतें महत्व देऊन अनुकूल वेदनेस आपण सुख समजत होतों, ही मोठी चूक झाली. वेदना ह्या शब्दानेंच ती चूक व्यक्त होते. अनुकूल का असेनात पण त्या वेदनाचना! त्यांस सुख कसें ह्मणावें! शिवाय त्या केव्हां-तरी बंद व्हावयाच्याच. त्या बंद झाल्या म्हणजे दुसरे कांहीं दुःख न झालें तरी त्या बंद झाल्या कीं सुख नाहींसें झालें. अर्थात् सुखाचा अभाव तें दुःखच सुख आणि दुःख हीं एकाच पदार्थाचीं अर्धें आहेत. अनुकूल वेदना प्राप्त करून घेण्याकारितां कांहीं तरी खटपट करावीच लागते, ती खटपट उगीच थोडीच होते? ती करीत असतां प्रतिकूल वेदना ऊर्फ दुःख सोसावें लागतें. त्यापासूनच म्हणजे दुःखापासू-नच सुख होतें. अर्थात्च सुखाचें मूळ दुःख झालें. मग त्यास खरें सुख कसें म्हणतां येईल? " यथा बीजः तथा कुरः " तें सुख वाटलें तरी परिणामीं दुः-खच म्हणजे जें सुख प्राप्त झालें, त्याचा अंत होण्याचा संभव असल्यामुळें त्या अंताचा धाक सुखाबरोबर सुख भोगणाराच्या मनांत वास करीत असतो. म्हणजे प्रतिकूल वेदना किंवा दुःख देत असतो. ज्या सुखाच्या अवस्थेंत दुःखाचें मान नष्ट होत नाहीं; आणि जास्त सुखाची हाव मनाला जाच केल्यावांचून सोडीत नाहीं; सारांश, सुख झालें असून मनाची तळमळ बंद होत नाहीं, त्यास सुख कसें म्हणावें! तें सुख म्हणजे दुःखाचेंच आवडतें स्वरूप म्हणतां येईल. तळमळ सुटणें व दुसरें कांहींच न स्मरतां केवळ आनंदरूप होणें ह्याचें नांव खरें सुख. अंमली लोकांस आपण तिर-स्करणीय मानितों. त्यांचा अंमल करण्याचा हेतु वेदनामान न राहवें हाच असतो. अंमल करून एकदां त्यांची वृत्ति तन्मय झाली म्हणजे त्यांस तळमळीचा लेश नाहींसा होतो. दिनदुनियेची ओळख नाहींशी होते. अंमल वगैरे न करितां तशी स्थिति प्राप्त होऊन पुनः ती कधीं न बदलणें ह्याचेंच नांव खरें सुख.

भवदुर्विपाकानळ भडकण्यास दंभ व अहंकार हे घृतकलश कसें कारण हो-तात, मिथ्याभयाचा नाद सवयीमुळें कसा लागतो, भव सुखप्रद व्हावा तो यो-जनेंत चूक होऊन दुःखप्रद कां होतो आणि साध्य सोडून साधनाच्या नादीं लागल्यामुळें सगळाच विपर्यास कसा होतो हें पुढल्या खंडांत वर्णिलें आहे.

---

# चतुर्थ खंड—भव दुर्विपाक कारण.

## भाग १५ वा.

### आगीवर तेल.

चांचल्य[1] थकवी मनोकपि तया आशासुरा खेळवी ॥
चावे मछर विंचु तो विषय हीं भूतें सदां मेळवी ॥
मोहाहंकृति-दंभ जादु करिती वेडा तयाच्या लिला ॥
वर्णाया असमर्थ मी म्हणुनिया अल्पांश तो वर्णिला ॥

रत्नदीप्ति, ज्वाळा, लहरी इत्यादि ज्याप्रमाणें वरच्यावर वरखालीं किंवा मागें पुढें होतात त्याप्रमाणें चळवळ करणारें, चक्राप्रमाणें सदा भ्रमण करणारें, अत्यंत उपद्व्यापी आणि अनिवार हें मनोमर्कट आहे हें वासना मदिरेनें अगदीं तर्र झालें आहे. मच्छर वृश्चिक त्याला सर्वकाळ दंश करीत आहेत. विषय पि-शाच्चें त्यांच्या बोकांडीं बसलीं आहेत. दंभ, अहंकार आणि मोह ह्या जादूनीं त्यांस घेरलें आहे. तस्मात् ह्याच्या चेष्टांचें पूर्ण वर्णन करण्यास कोण समर्थ आहे. विषय व मोह ह्यांचें वर्णन मीं अल्पमतीप्रमाणें पूर्वी केलेंच आहे. आतां दंभ व अहंकार ह्या जादूंनीं होणाऱ्या परिमाणांचें वर्णन करितों.

## दंभ.

शरिराला सुख होऊन तद्द्वारें मनाला आनंद व्हावा म्हणून विषयांचें सेवन मनुष्यें करितात असें वरुन दर्शनीं वाटतें, पण त्या हेतुशिवाय दंभ हा एक हेतु विषय सेवनांत असतो. दंभाचा नाद स्तुतीसाठीं लागतो, स्तवन हें विष आहे. पण फार मधुर वाटतें. स्तवनासारखा कैफ कशानेंही येत नाहीं. स्तुतीनें कोण म्हणून पाघळत नाहीं. स्तुति आवडत नसल्याचा बाणा बाळगणारास तुम्हास स्तुति आवडत नाहीं इतकें म्हटल्यानें तोही पाघळतो. माणसांचा काय पाड ! भगवान सुद्धां स्तुतिस्तोत्रप्रिय आहेत.

## सुख इतरांस.

नाटकपात्रें, मल्ल सर्कसवाले आपआपलीं कामें करितात, तेव्हां त्यांस पुष्कळ कष्ट होतात व काळजी बाळगावी लागते. त्यांच्या कलांपासून सुख प्रेक्षकांस होतें. प्रशंसेकरितां हीं माणसें राबत असतात. मंगलकार्यें, उत्साह आराशी वगैरे करणारे ह्यांचाही प्रकार तसाच. कार्याचा खर्च, तो करण्यास झालेलें कर्ज, तीं कामें करण्यास लागलेली मेहनत, दारूच्या धुराचे भपकारे, व्यवस्थेंत झालेल्या चुकांचें परिणाम, त्यापासून होणारा दुर्लौकिक व अनेक त्रास ह्यांचे मात्र धनी तीं कामें करणारे होत. मिष्टान्न, हारतुरे, गजरे, अत्तरगुलाब, वस्त्रेंभूषणें, इत्यादिकांचा लाभ शेकडों बाहेरच्या माणसांस होतो. यजमानास संध्याकाळपर्यंत दगदग होते, पाणी पाणी होऊन कांहीं नकोसें होतें. रात्रीं थंडसा भात व पिठलें मात्र त्याच्या वांटणीस येतें. घसा बसतो. कार्यांतीं मागचटा येऊन कदाचित दुखणें येतें. हें सर्व केवळ फुशारकी करितां मोठ्या आनंदानें पत्करितात. आपल्या समाजाच्या मागें ज्या अनेक घातक रूढी व संवयी लागल्या आहेत त्यांमध्यें कार्यांचा आलीजाई खर्च हा प्रमुख होय. हा केवळ फुशारकीकरितां, श्रीमंत नसतां श्रीमंत म्हणून घेण्याकरितां म्हणजे दंभाकरितां आहे, ह्याच्या योगानें समाजाची दुर्दशा सतत होत आहे. कर्जाच्या कहरानें कुटुंबेंचीं कुटुंबें कंगाल होत आहेत. तथापि समाजाचे डोळे उघडत नाहींत. पराक्रमी भाग्यशाली पूर्वज खर्च करीत नसत इतका खर्च आपण पायदळीं पडून बंदिवासांत दिवस काढीत असतां करीत आहों.

## अलंकारभूषणें

अलंकार, वस्त्रें, भूषणें इत्यादि सर्व सोंगें केवळ दिमाख दाखविण्याकरितांच आहेत. स्वतःच्या रंजनाकरितां मुळींच नाहीं. खऱ्या हिशेबानें त्याजपासून सुखाचा लेशही प्राप्त न होतां त्रास मात्र होतो. निद्रासुख घेतांना अलंकार भूषणें व कनकवस्त्रें कोणी घालतात काय! घातलीं असतां तीं सुखावह न होतां त्रासदायक होतात, म्हणून सर्व जोजार काढून टाकून साधें पातळ वस्त्र नेसावें लागतेंना! वेणींतील नग पाठीवरील जरीकाठ ज्यांचे त्यांस दिसत नाहींत असें असतां शेकडों रुपये त्यांत कां खर्च होतात. पागोटया खालील संजाब लोकांकरितां नव्हेत काय!

## रूप व दंभ ह्यांचें तादात्म्य.

"शिवश्च हृदयं विष्णुर्विष्णोश्च हृदयं शिवः" तसें रूपाचें हृदय दंभ आणि दंभाचें हृदय रूप होऊन बसलें आहे. खणगांत जितकें रेशीम जास्ती, कलाबूत जास्ती तितकें खणंग प्यारें. कांचेचे बिलोर बारीक तितके पाहिजेत, पण सोन्याचे जाड असतील तितके उत्तम. तांब्या पितळेचीं भांडीं किंवा कांचपात्रें नुसत्या रूपाच्याच संबंधानें पाहिलीं तर जास्त सुरेख दिसतात. नकलीं मोतीं व जवाहीर खऱ्यापेक्षां भपकेदार गोड दिसतें, पण तें नको. चांदीचीं भांडीं, खरीं मोतीं आणि जवाहीर पाहिजे, म्हणजे शोभेपेक्षां लोकांकडून श्रीमान म्हणून घेण्याची हांव बलवत्तर आहे.

## अलंकार.

### स्त्री.

स्त्री म्हणजेच मकरध्वजाची मुद्रा, ती पुरुषाच्या मनाला तळमळ लावण्यास पुरें नाहीं काय! ती रूपवति नसली तरी मदनानें मुसमुसून षोडषवर्षान्वित झाली कीं "गर्धभि अप्सरा जयेत" असा प्रकार होतो. मग त्या मदन ज्वालेवर वस्त्राभरणें व अलंकार भूषणें हें घृत कलश ओतून आपली राख रांगोळी कशाला करून घ्यावयास पाहिजे, स्त्री लावण्य जादूच, आधीं परपुरुषाचें मन भारून त्यास वेडें करून टाकितें, त्या जादूचा प्रभाव वाढविण्याकरितां वस्त्राम-

र्णें आणि अलंकार भूषणें यांचा धूप घातिला म्हणजे परपुरुषांची मनोभूतें फार चवताळून त्या स्त्रीवर झडप घालण्यास नानाप्रकारचें यत्न करितात. त्यांच्या लीला हमेशा दिसतच आहेत. दंभान्वित रूप–विषयाच्या मोहानें अलंकार भूषणांनीं भरारावलेलें स्त्रीलावण्य हेंच बीज घेऊन ह्याजपासून नाटकें व कादंबऱ्या आपल्या बुद्धिवैभवाप्रमाणें ग्रंथकार निर्माण करितात.

## लेंकरें.

अपत्य-भाव हाच संतति मनोहर वाटण्यास पुरें आहे. आपलें मूल म्हटलें कीं, तें कोळशांतील माणीक असो, वक्रतुंड असो, मिचकें असो वा शेंबडें लेंबडें असो, माता पितरांचा मूर्तिमंत आनंदच तें असतें, मग आणखी वस्त्राभरणांनीं आणि अलंकार भूषणांनीं त्याला मढवून काय करावयाचें? पण नाहीं. दृढ सवयी आणि रुढी यांजपुढें मनुष्याची विचारशक्ति हतवीर्य व अंध होते. स्त्री व मुलें ह्यांस नटविण्याच्या पायीं अपायाचा पाय असें ऋण सुद्धां घरांत शिरूं देण्यास माणसें तयार होतात. स्त्रियांच्या शृंगाराचा परिणाम वर लिहिला आहेच, दृढ सवयीमुळें अलंकार भूषणांनीं त्यांस आनंद तरी होतो, पण लेंकरास आईबापांच्या लाडापासून काय आनंद वाटणार, त्यांस अलंकार भूषणांचें ज्ञान कोठून असणार ? त्यापासून त्यास त्रास मात्र होतो. दंभान्वित रूपाच्या मोहनीमुळें व ममतेमुळें ही गोष्ट आईबापांच्या मनांत सुद्धां येत नाहीं. आपल्या आनंदाच्या भरांत मनुष्य दुसऱ्याच्या सुखदुःखाविषयीं मुळीं विचारच करीत नाहीं. मुलाचें चुंबन करून करून मिटक्या मारणारा बाप त्या लेंकराचे कोमल गाल लाल झाले, त्यास आपल्या मिशांचे केस बोचले, ह्याचा विचार कोठे करतो ? अंथरुणावर केस पडला किंवा सुरकुती पडली तर लेंकराच्या कोमल अंगास बोचेल म्हणून जी जननी तसें न व्हावें म्हणून जपते तीच त्याचें नाक व कान ह्यांस तीक्ष्ण सुईनें वेध करून मोठा सोहाळा करून आनंद मानिते. शिव ! शिव ! ह्या रुढीपुढें माणसें दीन झालीं आहेत. ह्या मातोश्रीच्या वेडया हौसेमुळें लेंकराच्या अंगावर घातलेे त्या दागिन्यामुळें त्यास किती तरी त्रास होतो ! मुलाच्या कमरेस मऊ रेशमी कडदोरा बांधिला तर नाहींका चालत ? पण दंभान्वित रूपाच्या भुलीनें माता चांदीची साखळी त्याच्या क-

मरेख बांधिते, ती पुन्हां जाड, म्हणजे जास्ती किंमतीची पाहिजे. हिची झाली हौस, पण त्या बिचाऱ्याची कंबर काचली व काळी झाली. पुढें संसारिक अनेक बिड्या पडतील तेव्हां पडतील बारशालाच पण चांदीच्या बिड्या मोठ्या प्रेमानें व कौतुकानें माता त्या अर्भकाच्या पायांत अडकावून त्यास त्रास देते. ऐपत असेल त्याप्रमाणें दागिन्याचें ओझें लेंकराच्या अंगावर लादण्याचा तिचा स पाटा चाललेला असतो. कनकासारखी आकर्षण शक्ति दुसऱ्या कशांतही नाहीं. दुष्ट आणि नीच लोक ह्यांच्या मनाचा तर कनकापुढें टिकावच लागत नाहीं. त्याची दृष्टादृष्ट होतांच तें कनकाकडे धावूं लागतें. कनकाचा रक्षण करणारा बेसावध होण्याचा उशीर कीं ते त्या कनकावर जाऊन पडतात. बालकें मुळींच अज्ञान, तीं हातीं सांपडणें सुलभ, म्हणून भामटे लोक त्यांच्या अंगावरील कनकावर टपलेले असतात. अलंकृत मुलांस घेऊन जाऊन त्यांचे दागिने घेऊन तीं नांवें सांगतील म्हणून त्यांचा ते निकाल करून टाकितात. असें प्रसंग वारंवार येतात. कानडया मुलुखांतील एका सेशन जज्जापुढें थोड्याच अवकाशांत अशा बालकांच्या खुनाचे तीन खटले येऊन तिघा इसमास फांशी देण्याचा प्रसंग त्यास आला. तेव्हां मुलाच्या अंगावरील दागिने चोरणारास तें बक्षीस करावें. असा कायदा होईल तर बरें, असें त्यानें उद्गार काढिले. मूर्ख आया आणि त्यांच्या ओंजळींनीं पाणी पिणारे त्यांचे शतमूर्ख दादुले असा कायदा झाला तरी सुद्धां आपला हेका सोडणार नाहींत.

## अहंकार.

अखिल जनतेला ज्या मनोमर्कटानें प्रवृत्तिमार्गांत नाचावयास लाविले आहे, त्या मर्कटास बाधा करणारी विषय भूतें सदा सार्वकाळ नाचविणारा हा अहंकार आहे. ह्याचा प्रभाव दंभापेक्षांही उग्र आहे. जगांतील सर्व घडामोडीस हाच कारण आहे. थाटमाट, मजलसी, प्रदर्शनें व अक्षतबाजा हे रूपाचे विषय मालकापेक्षां प्रेक्षकांच्या नेत्रास आनंद देतात, पण कर्तृत्वाभिमानानें जो संतोष होतो, त्यापुढें दर्शनसंतोष कांहींच नाहीं. लक्ष्मीचे वरदपुत्र कार्यांत किंवा दिवाळींत जे दिपोत्साह व आतषबाजा करितात त्यापुढें गरिबगुरिबांच्या दहापांच पंत्या आणि फटाके काय मोल ? निढळाच्या घामानें मि-

ळविलेले पैसे खर्चाची तारांबळ असतां त्यांनीं त्या कामांत कां खर्च करावे. श्रीमंताच्या हवसेपासून त्यांस आणि गरिबागुरिबास व त्यांच्या लेंकरास दर्शन संतोष समानच नाहीं कां होत? होतो. असें असतां घरोघर दारूच्या निमित्तानें पैशाची राख कां करितात. अनेक मावंडांसुद्धां निरनिराळी दारू कां असावी लागते. लहान मुलांच्या नांवाचीही निराळी दारू काढून ती जाणत्या मुलांकडून उडविली म्हणजे लहान लेंकरास आनंद कां होतो ? केवळ अहंकार ह्यास कारण आहे. आपली म्हणून दारू उडविल्यावांचून व आपल्या हातून चार पेत्या लावल्यावांचून अहमिकेचें समाधान होत नाहीं.

अहमिका लहानें मुलांस मात्र वेडें करिते आणि थोरांस सोडिते असें नाहीं; चिमकल्या मुलांच्या वेडानें चिमणें नुकसान होतें, पण थोरांचें सगळें थोर.

## आपलें तेवढें चांगलें.

घरच्या बागेंतील फळें, पुष्पें, भाजा वगैरे पदार्थ बाजारांतलि पदार्थांपेक्षां वाईट कां असेनात, तें उत्पन्न करण्यास त्यांच्या किंमतीपेक्षां पुष्कळजास्ती पैसे कां पडलेले असेनात, तरी त्यापासून होणारा संतोष अवर्णनीय आहे. ते पदार्थ शिफारसीजोगे नसले, तरी आपण मात्र सेवूनही समाधान होत नाहीं. अंगचे पापसुद्धां दुसऱ्यास न देणारीं कृपण माणसेंही फुशारकी करितां ते पदार्थ घरोघर वाटितात. तुमच्या मळ्यांतील फळें फार उत्तम असें धूर्त माणसांनीं ह्मटलें ह्मणजे मालकास वाटणारा आनंद शब्दांनीं सांगून समजावयाचा नाहीं. तो त्यासच माहीत शिफारस करणाऱ्या धूर्तांकडे आणखी आणखी फळें कधीं पाठवीन असें त्यास होतें.

## देखतभूल.

अहमिकेचे चमत्कार अतर्क्य आहेत. पत्नीशीं व्यभिचार करणाराचें तळपट हो, असा शाप नवरा देतो, जाराचा तडाक्यासरसा खूनही करतो, पण त्या गुन्ह्यास कारण जी पत्नी, तिचे ठिकाणीं आपलेपणा असल्या कारणानें तिचा खून राहिला, पण त्याग किंवा निदान अव्हेर तरी करतो काय ? त्या कृत्यास कांहीं दिवस लोटले कीं, कंठमणि होतेच. जाराचें मात्र स्मरण झालें कीं, पायाची आग मस्तकास जाते.

## कमसल संतति.

घुशीप्रमाणें घर पोखरून नांवालौकिकावर पाणी ओतून उभय कुलांस कलंक लावून तोंड काळें करून घेऊन हीन जातींतील जाराबरोबर निघून गेलेल्या बायकोची मुलें ह्यांजवर ममता करण्याचें कांहीं तरी कारण आहे काय ! तीं मुलें नवऱ्याची कशीं म्हणावीं, पण त्या मुलावर आपलेपणा मानल्यामुळें त्यांच्यावर ममता बाप करितोच, त्याला आई नाहीं म्हणून ज्यास्तीच जपतो. ह्याहीपेक्षां चमत्कार कीं, ती आकाबाई पुन्हा आली तर नवरा तिला घरांत घेऊन प्रथम कांहीं दिवस मोलकरणीप्रमाणें, निराळी ठेवितो, पण हळू हळू सर्व जुळते ही केवढी देखत भूल आहे. तृतीय प्रकृतीच्या गळ्यांत बायकोचें लोढणें पडलें, म्हणजे तोही तिजवर आपलेपणा मानून तिच्या व तिच्या कमसल परिवाराच्या मरणाकरितां इतर पुरुषाप्रमाणें संसाराचा घाणा आमरण फिरवीत असतो.

## आख्यायिका.

ह्या आपलेपणाच्या महात्म्याची एक विलक्षण आख्यायिका आहे. ती सत्य असो वा नसो, पण तिच्यापासून आपलेपणाचा महिमा चांगला कळून येतो. एका सर्पानें दंश करून एका कुळांतील पुष्कळ माणसें पुष्कळ वर्षांत मारिलीं, तो साप त्या घरांतील माणसांस नेहमीं दिसे. एके दिवशीं एका मुलास तो साप दिसला, तेव्हां तें मूल भयभीत होऊन आपला साप आला असें म्हणालें, तें ऐकताच तो साप प्रसन्न झाला. असा आपलेपणाचा चमत्कार आहे. जें राष्ट्र आपलेपणाला जपतें तें सर्व सुखें भोगितें आणि जें राष्ट्र आपसांत विरोध वाढवितें त्याचा परिणाम काय होतो हें जगास मूर्तिमंत पाहण्यास सांपडावें म्हणून कीं काय सर्वांपेक्षां वडील व बुद्धिमान आर्यराष्ट्र हल्लींच्या अवस्थेंत परमेश्वरानें ठेविलें आहे.

## घराची हौस.

ह्या अहमिकेच्या पायीं थोरांच्या हातून मोठमोठ्या चुका होऊन अनर्थ होतात. घरास पडणारें भाडें आणि घरास लागणाऱ्या खर्चाचें व्याज ह्यामध्यें

मोठें अंतर असतें, घराच्या डागडुजीस नेहमीं मोठा खर्च येतो. शिवाय अस्मानी--सुलतानीची जोखीम असते. असें असतां अहमिकेच्या बाधेनें भ्रमिष्ठ होऊन घर बांधण्याविषयीं माणसास मोठी तळमळ लागून जाते. घराची घरघर मागें लागल्यामुळें ऋण राहूच्या तोंडांत न सांपडणारे घर बांधणारे थोडेच असतात. कैक घरें तर बांधितां बांधितांच सरकार--दप्तरीं प्रवेश करितात. कैकांस घरापायीं बिनभाड्याच्या घरांत सावकाराचा मत्ता खाऊन हवा खात बसावें लागतें.

## सरकार.

आपलें सरकार परम चतुर, महा दक्ष आणि अर्थशास्त्रांत पूर्ण प्रविण आहे. अत्यंत सुनियंत्रित आहे. एका व्यक्तीच्या शहाणपणावर अवलंबून नाहीं. असें असतां अहमिकेच्या झपाट्यानें त्या सरकारावर सुद्धां झडप घातली आहे सरकारच्या कचेऱ्यास थोडया माडयावर इमारती मिळत असतां हजारों रुपये खर्चून इमारती बांधून भाड्याच्या कैक पटीनें दरसाल रिपेयरखर्च सरकार करितें. इंजनेरी कामाचें कच्चेपण सर्वश्रुतच आहे, त्यामुळें त्या इमारती कायम राखण्यास हजारों रुपये खर्च होतात. पण सुयी सुद्धां न जाऊं देणाऱ्या सरकाराच्या नजरेस हत्ती गेलेला दिसत नाहीं, असा अहमिकेचा विलक्षण प्रभाव आहे. ठिकच आहे, देऊळची गेली घाट म्हणून गुरवाचे ताट बंद थोडेंच होतें. मग त्यानें घाटेस कां जपावें. भ डोत्री, परकी, निरंकुश, बिनकळकळीचे कामदार ह्यांनीं उधळपट्टीस काय म्हणून जपावें. सरकारास खर्च झाला म्हणून त्याचे पगार थोडेच कमी होणार। जितका फैलाव वाढेल तितकी त्यांची पोळी संख्या वाढून पिकणार, खर्चाची तूट भरून काढण्यास दुर्दैवी, निरुपद्रवी, मुकी आणि समाधानी रयत बसलीच आहे मग त्यांनीं का कमी करावें. मायेवांचून रड नाहीं।।

## संस्थानिक राजे.

दुसऱ्याचें म्हणून हसावें आणि आपलें म्हणून रडावें म्हणतात तें खोटें नाहीं. सरकार परकी म्हणून हसावें, पण देशी राजे महाराज, रजवाडे आणि जाहगीर-

दार तरी काय करीत आहेत. सरकार कामाकरितां तरी इमारती बांधितें. पण आमची वरील मंडळी नुसत्या शोकाकरितां हजारों नव्हे लाखों रुपये खर्चून इमारती बांधून ठेवितें. तें बोलून चालून राजेच त्यांस आणखी काय म्हणाव-यांचें! केव्हां तरी संस्थानें खालसा झालीं म्हणजे त्या इमारती आयत्याच भाग्य-शाली सार्वभौमास जातील, इतकेंसुद्धां ज्ञान बिचाऱ्यांचा वाट्यास आलें नाहींना! गांवांतील किंवा देशांतील निवडक शाहाण्यांनीं पुस्तकालयादि ज्या संस्था चा-लविलेल्या असतात त्यांच्याकरितां जमलेला बहुतेक संचय राजमंदिरा-सारख्या इमारती पायीं खर्च होऊन जातो. ज्या मूळ हेतस्तव त्या निर्माण केलेल्या असतात ते हेतु पूर्ण होण्यास दामदुकळ पडतो. पुस्तकालयास चांगलीं मौल्यवान पुस्तकें द्रव्याभावामुळें मिळत नाहींत. शाळांस भिकार पगाराच्या कारणानें विद्वान शिक्षक मिळत नाहींत. दवाखान्यांत अनाथ रोग्यांच्या शुश्रु-षेस द्रव्य नाहीं. चांगलीं औषधें नाहींत. टोलेजंग मंदिरांत पाळ्याचे पडदे लावून खुशाल हवा खात आणि चकाट्या पिटीत वाचक, विद्यार्थी आणि रोगी ह्यांनीं बसावें, जणूंकाय येवढ्याच करितां लोकांनीं द्रव्य दिलें, आणि वायु-भक्षणालयें करून ठेविलीं. स्वतः कांहीं विचार न करितां अनुकरण करण्याचा परिणाम आणखी काय होणार! आपलें म्हणविण्याचा लोभ किती तरी भयंकर आहे!

---

# भाग १६ वा.

## संवय.

श्लोक.

वृथा विषय मोह ही, वपु तशी श्रुतें विश्वही ।
असून सुख दुःख दे, नवल हें गमें या मही ॥
असे संवय मूळ या, गलित धर्म होते वपू ।
तथापि मन पाघळें, त्यजिन तें सहाही रिपू ॥

विषय, धनवैभव, मायाजाळ या गोष्टी ज्यापेक्षा मिथ्या ठरल्या, त्यापेक्षा त्यांच्यापासून सुखदुःख होणें शक्यच नाहीं. वंध्यापुत्राच्या गळयांत मृगजलानें निर्माण केलेल्या खपुष्पाच्या माळा म्हणण्याप्रमाणें हें म्हणणें असंबद्ध आहे. मनुष्यासारखा ज्ञानसंपन्न प्राणी ह्या गोष्टी मिथ्या असतां अनंत कालापासून त्यांच्या कधींही नादीं लागला नसता. तेव्हां हें आंधळें गारूड आहे तरी काय ? ह्या सर्व घातक पीडा मनुष्यानें कशाकरितां पतकरिल्या आहेत ह्याचा विचार केला पाहिजे. मन गतानुगतिक आणि पराकाष्टेचें नादीं आहे त्याला एकदां जो नाद लागतो त्याची संवय त्यास झाली म्हणजे तें तिचें अगदीं गुलाम बनून राहतें.

## अंधेर कोठडी.

मनुष्याला अंधेरांत राहणें फार दुःखद वाटतें, म्हणून अंधेर कोठडीची शिक्षा देत असत. एका तशा शिक्षेचा मनुष्यास अंधेर कोठडीची दृढ संवय झाल्यावर मुदत भरली म्हणून बाहेर काढतांना त्याला वाईट वाटलें. एका कैदेंत असणारास उंदरावरोबर खेळण्याची संवय झाल्यामुळें शिक्षा सरल्यावर त्या उंदरास सोडून जाणें त्यास कष्टप्रद वाटलें. आरामांत राहणारास थोडें काम पडलें तर श्रम असह्य वाटतात. सदां श्रम करणारास रिकामें बसणें त्रासदायक वाटतें

## वासना.

इंद्रियें जीर्ण झालीं, तरी मनाची संवय मनाला अगदीं तरुण ठेवते. यामुळें वासना कधींच वृद्ध होत नाहीं. लहानपणापासून झालेल्या संवयी क्षीण होत नाहींत. नेत्रांनीं विश्रांति घेतली तरी नाटक सर्कशी व प्रदर्शनें नकोशीं होत नाहींत. काय चाललें आहे तें ऐकून किंवा दुसऱ्यास विचारून किंवा दुसरे बोलत असतील तें ऐकून तरी संवयींची शांति करावी लागते. कानांनीं राजिनामे दिल्यावर कीर्तनें, गाणीं, संगीतें नाटकें ऐकावयास जाऊन कर्णाऐवजी नेत्रांची तृप्ति करून तरी संवयींचें समाधान करावेसें वाटतें. वृद्धपणीं सर्व गात्रें शिथिल होऊन इंद्रियें आपलीं कामें सोडून बसलीं, देहाचाच भार देहास नकोसा वाटूं लागला, तिसऱ्या पायांवाचून ( काठीवाचून ) चालतां येईनासें झालें, तरीहि युवतिमुख, युवतिचेष्टितें आणि युवतिसमागम ह्यांजवरील भक्ति नष्ट होत नाहीं. चावेनासें झाल्यामुळें अन्नाची चव गेली, अन्न पचेना, तरी नानाप्रकारचीं चतुर्विध अन्नें खाण्याविषयीं वासना कंटाळत नाहीं. कुसकरून वाटून कशीतरी पिशवी भरलीच पाहिजे, आणि अपचनाच्या कारणानें पुन्हां रिकामी करण्याकरितांही औषधें घेतलींच पाहिजेत. नाकाची देवता गेली तरी गुलाबी तपकीर अत्तर गुलाबपाणी नकोसें नाहीं. तात्पर्य सदां तरुण असलेल्या वासनेच्या संवयी आमरण कायम असतात.

## द्रव्यसंचय.

समाजांत प्ररुढ असलेल्या चालीरीती मनुष्याच्या अंगीं बेमालूम मिळून गेल्या आहेत. द्रव्यार्जनाची समजूत त्यांपैकींच आहे. द्रव्यसंचय मुलाबाळांकरितां करावा लागतो. स्वसुखास मुकून हीं माणसें सदां सर्वकाल द्रव्याकरितां धडपडत असतात. पण संवयीचा चमत्कार कसा होतो पहा. दुर्दैवी बापास अनेक पुत्र असतां सर्वच दुर्वर्तनी निघून त्याच्याशीं वैर धरितात. सरकार दरबार करून आपली व त्यांची बेअब्रू करितात. मांडून मांडून पित्यास मंडावून सोडितात. तो मरेल केव्हां आणि शिक्कामोर्तब हातीं येईल केव्हां, तिजोरीची किल्ली आपल्या कमरेस लागेल केव्हां म्हणून गणपति पाण्यांत घालून बसतात. अशा बापास द्रव्यार्जनाची हाव कां असावी. इतर संसारिका-

प्रमाणें त्यानेंही न्यायान्यायाचें धर्माधर्माचें भय न बाळगितां शरीर कष्टवून द्रव्याची गुलामगिरी कां पतकरावी, खाण्यापिण्याचे सुद्धां हाल कां करावे, परमेश्वराच्या कृपेनें आणि वडलांच्या आशिर्वादानें छानीनें यथास्थित निर्वाह चालण्याजोगें स्वास्थ्य असतां तीर्थवास करून देहाचें व जन्माचें सार्थक कां न करावें ? इतका उघड प्रकार असतां द्रव्यसंचय करून कोणाची धन करावयाची, असें इतरांस वाटतें; पण आज नाहीं उद्यां टक्के टोणपे खाऊन मुलगे सावध होतील असें म्हणून बाप मुलांचीव संवयीची गुलामगिरी सोडीत नाहीं.

## निपुत्रिक.

मिया व बिबी हाच काय तो प्रपंच. जवळचें भावंड किंवा भाऊबंद नाहीत, कोणाची काळजी नाहीं, जरूर नाहीं पोटीं संतान होण्याची बरीच निराशा, जवळ लाखों रुपये आहेत असें असतां उत्तमोत्तम हवापाण्याची जन्मभूमि, लाखोंरुपयांची मालमत्ता, प्रियतम तरुण पत्नि दूर ठेवून वाईट हवेंत कुग्रामांत तावेदारी पतकरून कोणातरी सुजाण माणसानें रहावें काय ? पण द्रव्यसंचय अर्पण करण्यास पुत्र नाहीं तर आणखी लग्न करूं, पुत्रलाभ करूं, इतकेंही करून पुत्र नच झाला तर दत्तक घेऊं, अशी उमेद बाळगून तो द्रव्यार्जनाच्या सवयीचा दासानुदास बनतो. असा विचार करीत नाहीं कीं, देवानें औरस अगर यत्नानें दत्तक पुत्राचा लाभ झाला तर असलेला द्रव्यसंचय त्यास पुरण्याजोगा नाहीं कीं काय, तुंबडी भरून देण्याचा करार आहे कीं काय, दोन पैसे कमी म्हणून निवाडा भरपाई होणार नाहीं काय ? हो पण तो तरी काय करील, जन्मांतरीचें असलेलें ऋण पैनपै पुत्र म्हणून वारस म्हणून किंवा अन्य बरेंवाईट कारण म्हणून ज्याचें त्यास दोघींच्या वाटेनें दिल्याखेरीज त्याची सुटका कशी होईल ? द्रव्यार्जनाची इच्छा व संवय त्यास कसें सोडील ? एखादें शुक्लकाष्ट किंवा दुर्व्यसन एकदां गळां पडलें म्हणजे आमरण सोडीत नाहीं. तशी द्रव्यार्जनाची सवय त्या शाहण्यासही सोडीत नाहीं. द्रव्यार्जन हीच कायती जन्माची इतिकर्तव्यता; असें मानून सरकसट माणसें माहर, ( लक्ष्मी हरण करणारी ) बनून संवयीमुळें द्रव्याच्या मागें लागलीं आहेत.

## जागा झालेला मनुष्य.

थोड्या दिवसांत लागलेल्या संवयीसुद्धा हाडीं खिळून जातात मन अनादि

कालापासून अनंत जन्मोजन्मीं विषय, मायाजाळ, धनवैभव, ममता आणि षड्रिपु ह्यांच्याशीं झालेलें तादात्म्य कसें सुटणार. अनंत जन्मींचें सुकृत फळास येऊनही नरतनु लाभली आहे हिच्यांत त्या कचाट्यांतून जो मुक्त होतो तोच धन्य.

संवयपिशाच आपल्यामागें लागलें आहे; हेंच मुळीं अज्ञानास कळत नाहीं तेव्हां त्याची सुटका होणें शक्यच नाहीं. संवयीचे दुष्परिणाम ढळढळीत दिसूं लागल्याकारणानें संवयी सोडण्याविषयीं ज्याचा प्रयत्न चालू असतो त्यास सुद्धां ह्यांच्या मगरमिठींतून लवकर सुटतां येत नाहीं. आपल्यास कोणचेंही दुर्व्यसन शिवलें नाहीं असें असतां वर्तमानपत्रें वाचण्याचा नाद आपल्यास आहे तो सोडावा, असा विचार एकजणानें केला; पण दिवस उगवल्याबरोबर आज अमुक पत्र येईल तें वाचावें असें त्यास वाटूं लागे, हा नाद वाईट नाहीं, न वाचलें तर जगाच्यामागें रहावें लागेल, तस्मात् अनायासें पुढें आलें तर वाचण्यास काय हरकत आहे. आज महत्त्वाची बातमी येईल ती वाचण्यास चिंता नाहीं, अशा अनेक सबवी मनांत येऊन संवय त्यास वाचावयास लावी.

## वासनेचा झगडा.

कृतांताची अमलध्वजा मुखावर फडकूं लागली; गृह, सुत, धन, दारा, देह आणि इतर सर्व पसारा प्रत्यक्ष सोडवत नाहीं तर मनानें तरी सोडावा असा विचार एकानें केला, पण घरांत असलेल्या गैरसोयी कशा दूर कराव्या, नव्या नव्या सोयी कशा कराव्या, ह्या कल्पना रात्रंदिवस त्याच्या मनांतून जाईनात. त्या गोष्टी करण्यास अवकाश राहिला नाहीं, शरीरबळ राहिलें नाहीं, बंधुवर्गाची अनुकूलता नाहीं, उभयतांची गैरसोय सहज दूर होण्याजोगी तोडही त्यास आवडत नाहीं, करितां आपण एकस्थानें ह्या गोष्टीचा ध्यास धरून मनास शिणवावें, हा केवळ वेडेपणा आहे. असें त्यास वारंवार वाटे, तरी कल्पनांच्या लहरी त्यास क्षणमात्र सोडिनात. उंबरघाटच उल्लंघन करवेना; मग सुत, धन, दारा ह्यांजपर्यंत मजल जाणार कशी.

## स्त्रीसुत.

स्त्रीसुत मनाप्रमाणें न वागोत, सेवातत्पर नसोत, बेपर्वा असोत, पण त्यांच्या

गुलामगिरीविषयीं अहर्निशीं कल्पना, विवंचना आणि प्रयत्न मनाला सोडीत नाहींत. त्या कल्पनांस वारंवार झिटकारून टाकिले, तरी त्या पुनः पुनः मनाला मगरमिठी घालतात. संन्यास घेतल्यावरही स्नानाच्यावेळीं शेंडीकडे हात धावतो, त्याप्रमाणें सर्वसंगपरित्याग करण्याचा प्रयत्न केला किंवा प्रत्यक्ष त्याग केला तरी संवय गुलामगिरि करण्यास लावण्याचा प्रयत्न करून ज्ञान्याच्या ज्ञानाशीं झगडत राहते. असो संवयीचा दारुण प्रभाव सगळ्या प्रवृत्तिमार्गावर कारण घडतो आणि विषयादिक लचांडें, त्यामुळें खरीं कशीं वाटतात हें पहा.

बाळपणीं ज्या गोष्टीचा नाद लागतो, त्या गोष्टी मनावर अगदीं बेमालूम ठसून जातात. पंचविषय आणि मायाजाल हीच कायतीं सुखाचीं विकासमंदिरें, असें कळूं लागल्यापासूनच मनाला शिकविलें. त्यामुळें विषयाचा मोहकपणा आणि मायाजालाचे वेढे त्याच्यावर अगदीं दृढतम झालेले आहेत. त्यांचे आणि मनाचें तादात्म्यच बनून गेलें आहे असें म्हटलें तरी चालेल. बाळपणीं पाळण्यांत रडत असतां बालकाचें मन दुसऱ्या कोणच्या तरी नादांत गुंतविण्याकरितां मूल रडूं नये म्हणून, आई गाणीं म्हणूं लागते, तेव्हांपासून मुलाच्या मनाला शब्द विषयाचा नाद लागून त्या लेकराबरोबर हळू हळू तो नाद वाढत जातो. स्पर्शसुखाचा नाद याप्रमाणेंच जन्मापासून लागतो. माता ममतेनें मऊ मऊ शय्येवर मुलाला निजविते. वारा लागूं नये म्हणून अंगडीं टोपडीं करिते, तेव्हांपासून वाढतां वाढतां अतोनात मिजास वाढून पूर्वी वर्णन केल्याप्रमाणें अनर्थ होतो. सुखासाठीं केलेलेंच दुःखास कारण होतें. मातेस आवडत असलेलाच रस उत्तम समजून त्याची संवय माता लेकरास लाविते. तेणेंकरून रस त्याला आवडूं लागून त्याच्या अंगवळणीं पडून सोसूंही लागतो. मूल रहावें, रडूं नये, म्हणून त्याचें मन दुसरीकडे वेधण्याकरितां माता ममतेनें पाळण्यावर खेळणीं, चांदवे बांधिते. नानाप्रकारचीं खेळणीं चित्रें वगैरे दाखवून रूप विषय त्याच्या मनावर खोदून टाकिते. आईबापांच्या अभिरुचीप्रमाणेंच गंधाची आवड त्याच्या मनावर ठसून जाते. मायाजाळाची ही गोष्ट तशीच आहे. लहानपणांतच मी आपल्या बाळ्याला गोरीपान बायको करीन, असें आई म्हणते. बायकोविषयीं, तिच्या रूपाविषयीं व गुणाविषयीं

तेव्हांपासूनच धडे मिळत असतात. बाबा माझा, आई माझी, भाऊ माझा, बहीण माझी, हीं सर्व माणसें आपलीं. शेजारी, नातलग, आप्त सोयरे, इष्टमित्र हे सर्व आपले, बाकी सारीं परकीं. फलाणें आपले दायादार. अमके यजमान इत्यादि धडे पहिल्यापासूनच मिळून मनावर ठसून गेलेले असतात; यामुळें विषय, सुखदुःखें आणि मायाजाळ सत्य वाटून त्यांच्याशीं मनाचें तादात्म्यच बनल्यासारखेंच होतें.

## विषयसुख.

मनुष्याच्या अंगीं संवय इतकी खिळून गेलेली आहे कीं, ती असल्याचें भान व कल्पना सुद्धां मनांत येत नाहीं. पंचविषय, सुख व मायाजाल हे नैसर्गिक धर्मच आहेत. ते हल्लीं ज्याप्रमाणें आपण उपभोगितों तसा उपभोग स्वभावसिद्धच आहे असें आपल्यास वाटतें. पण खरा प्रकार तसा नाहीं. एका साहेबाला शिकार करितांना वाघाच्या गुहेंत एक माणसाचा मुलगा सुमारें दहा वर्षांच्या वयाचा सांपडला. तो वाघाप्रमाणेंच हातपाय टेंकून चालत असे, ओरडत असे, लोकांच्या अंगावर धावे, व कच्चें मांस खाई. ह्यावरून व एक मुसलमान गवतच खाऊन राहत असल्याचेंही ऐकिवात आहे. ह्यावरून, विषयसुख व मोहजाल केवळ संवयीनें खरें वाटतें हें उघड आहे.

## घबाड अज्ञान.

लहान मुलें भातुकली खेळून संसाराची नक्कल अनुकरणानें करीत असतात, तेव्हां एखादी बाहुली मोडली असतां मोठमोठ्यानें रडूं लागतात. कांहीं गोष्टींनीं फार आनंदित होतात. पुष्कळ खटपट करितात तें पाहून प्रौढ माणसांस त्यांच्या अज्ञानाचा मोठा चमत्कार वाटतो; पण विचार करून पाहिलें तर त्यांच्या नकलेंत आणि ह्यांच्या असलेंत काय फरक आहे? त्या लहानांचें थोडा वेळ टिकणारें चिमुकलें अज्ञान आणि चिमणे हर्षामर्ष, आणि यांचें घबाड अज्ञान, आणि कांहीं वर्षें टिकणारें हर्षामर्ष! प्रौढ माणसें त्यांस वेडीं म्हणतात! रामदासादिक आपल्यास वेडे म्हणतात!

---

## भाग १७ वा.

# योजना.

अमंत्रोमक्षरं नास्ति ॥ नास्ति मूलं अनौषधीं ॥
अभाग्यो पुरुषोनास्ति ॥ योजकस्तत्र दुर्लभः ॥ १ ॥
( सु. भा. )

## दुर्योजना.

सृष्टीचें मूळ सच्चिदानंद, पृथ्वी परम रमणीय, आनंद परिपूर्ण विषय, आणि ज्ञानासह सर्व साधनांनीं समर्थ मानव तिचा उपभोक्ता, सारांश हीं सर्व कारणें आनंदमय. तेव्हां ह्यांचें कार्य जो भव तो परमानंद सागर असलाच पाहिजे, असें कोणासही वाटतें. सहा भागापर्यंत तसेंच असून पुढें एकसारखी दुःखाची वृद्धि होत होत संसार तर दुःखाचें सरण आणि पापाचा उदधि झाला आहे हा मोठा चमत्कार आहे. हें अंधळें गारुड आहे तरी काय? अशी शंका मनाला चैन पडूं देत नाहीं. पण ह्याचें कारण अगदीं थोडें आहे. हा घोर परिणाम केवळ दुर्योजनेचा आहे. जगांत परमेश्वरानें एकही वस्तु निरुपयोगी निर्माण केली नाहीं. सत् किंवा असत् परिणाम तिच्या योजनेनुरूप होतो. तोच प्रकार संसाराचा व नरतनूचा आहे. लाल व गुंठित अधर, शेंबडाचें बोळकें आणि मांसाचे गोळे ह्यांस कविवरांनीं शृंगाराच्या दृष्टीनें महत्व दिलें म्हणून पूर्वीं आश्चर्य प्रकट केलें आहे, पण तेच अवयव सत्परिणामीं कसे होतात पहा. " कंठे सुधा वसति वै खलुसज्जनानां " या उक्तीप्रमाणें फक्त सज्जनांच्या कंठीं अललेलें अमृत ज्या अधरांनीं प्रसृत होऊन जगदुद्धार होत आहे, न्यायनीतीचा प्रसार होत आहे, चौदा विद्या आणि चौसष्ट कळा परिपक्वतेस येऊन मानवीसुखाची समृद्धि होत आहे, त्या अधरांस अमृताच्या पलीकडेही कांहीं असतें तर त्यांची सुद्धां उपमा कमी न पडती काय! बिचारा कलंकीचंद्र, त्या मुखास आपली उपमा दिल्याबद्दल संकोच नाहीं का पावणार!

ज्या मनुष्यरत्नांच्या अकलेपासून नाना शास्त्रें, नाना शोध उत्पन्न झाले, आपलें तन, मन, धन परोपकारीं वेंचून ज्या भाग्यशाली माणसांनीं आपली कीर्ति अजरामर करून ठेविली आहे, ज्यांचा धर्मकृत्यांपासून सदोदित परदुःख विमोचन होत आहे. धर्महानि नाहींशी करून स्वजनांचें पारतंत्र्य नष्ट करून आपला देश ज्या धीरवीर आणि तेजस्वी तान्यांनीं सुखसमृद्ध आणि सुप्रकाशित केला; श्रीज्ञानराज, तुकारामप्रभृति प्रतिभगवान, ज्यांनीं नराचे नारायण बनण्याचे मार्ग जगांत अत्यंत सुगम करून ठेविले, अशा जगद्भूषणांस रजाचें गज व राइच पर्वत करण्यास जे पयोधर कारण झाले, त्यांच्यावरून कनककलशांच्या किती लाखोल्या ओंवाळून टाकाव्या! प्रत्यक्ष चिंतामणीची सुद्धां उपमा त्यांस देण्यास काय हरकत आहे? असो. नारायणांनीं नरतनु ज्या हेतूनें दिली आहे, तो हेतु समजून नरतनूच्याद्वारें कमाई केली, तर ब्रह्मदेवाचें काम प्रत्यक्ष सच्चिदानंदरूपीं मनुष्य करील.

## दुरुपयोग.

पित्यानें आपल्या लेंकरास आनंद-सामुग्री भरपूर ठेवून सर्व अधिकार त्यांच्या स्वाधीन केल्यावर तीं मुलें त्या सामुग्रीची विपरीत योजना करूं लागलीं तर परिणाम विपरीत न होईल तर काय होईल! कदाकाळीं रोगोद्भव होईल, त्याच्या प्रतिकारार्थ ठेवलेलीं गोड पण येरवीं विकार करणारीं गोडगोड औषधें मुलें रोग नसतां खाऊं लागलीं तर परिणाम काय होईल? त्यांनीं एकमेकांशीं गुण्यागोविंदानें राहून एकमेकांस मदत करून आनंदानें काळ घालवावा असा पित्याचा हेतु असतां तीं परस्परांस पाण्यांत पाहूं लागून नाश करण्यास प्रवृत्त झालीं, तर त्या सर्वांचा नाश होऊन त्यांचे हाल कुत्रें सुद्धां खाणार नाहीं. त्यांचीं घरेंदारें दुसऱ्या शहाण्या व सद्गुणी माणसांकडे जाऊन त्या मुलांस सदोदीत हाल अपेष्टा सोसाव्या लागल्यावांचून राहवेल काय? असा भयंकर परिणाम व्हावा अशी त्या पित्याची इच्छा किंवा योजना होती काय? अपला प्रकार अगदीं तसाच आहे. आपल्या कल्याणाकरितां आणि परमेश्वराच्या करमणुकीकरितां व त्याचें सामर्थ्य किंचित तरी ओळखून त्याचे गुणानुवाद गाऊन शेवटीं त्याचें स्वरूपीं लीन होण्याकरितां प्रभूनींही अमोल नरतनु

दिली. मायेस आपली क्रीडा सदोदीत चालवावयाची आहे. सर्वच मनुष्यें खरा हेतु ओळखून सन्मार्गानें वागलीं तर, तीं कृतार्थ झालीं म्हणजे जगत्प्रपंच कसा चालेल म्हणून मायेनें मनुष्याला ज्ञान देऊन त्याच्यापुढें सत् आणि असत् असे दोन मार्ग निर्माण केले.

## निवृत्तिमार्ग.

चांगली वस्तु नेहमीं दुःसाध्य असून तिचे परिणाम मात्र अत्यंत कल्याणकारक असतात. वाईट मार्ग सकृतूदर्शनीं मोठा थाटदार मनोहर आणि सुखदायक दिसणारा असतो. लवकर सुखानें प्राप्त होणाऱ्या भपकेदार वस्तु पाहतांच त्यांच्या परिणामाकडे बिलकूल लक्ष न देतां त्यांस मोहून जावें हा मानवी स्वभावच आहे. शिवाय अनादिकालापासून माणसांस संवयही अगदीं खिळून गेली आहे ह्यामुळ पंचविषय, मायाजाळ, धनदौलत आणि ऐश्वर्य ह्याखेरीज दुसरी कोणचीच जोड आपल्यास कर्तव्य नाहीं अशी समजूत होऊन बसली आहे. निवृत्तिमार्ग मुळीं सकृतूदर्शनीं भयाण, अत्यंत कठीण, सुख सोयीशीं वैर करणारा, परिणामीं मात्र अनुपम कल्याण करणारा आणि जन्म-मरण चुकविणारा, त्याच्या दर्शनाबरोबरच माणसें थरथरा कांपूं लागतात. त्याचीं सत्फळें त्यांस आधीं कळतच नाहींत, आणि कळलीं तरी त्याचें खरें वर्म कळत नाहीं, यामुळें सन्मार्ग अगदीं दूर पडला आहे. त्याच्याकडे जाण्याला वाटच मुळीं प्रवृत्तिमार्गांतून आहे. एखादा मनुष्य कदाचित् निवृत्ति-मार्गास जाण्यास निघाला तर वाटेंत त्याला पंचविषयरूप पिशाचें पछाडतात. नितंबिनी वाघुरी कामभिल्लानें मध्यें पसरून ठेविलेल्या त्यास आपल्यामध्यें गुंतावितात. रांडा पोरें वंचक चोरें त्याच्या भोंवतीं वेढा घालतात. धनदौलत व ऐश्वर्य आपली जादू त्याच्यावर टाकितात. त्याच्या योगानें तो बिचारा वेडा होतो. श्रीकृष्णाच्या मुरलीनें वेड्या झालेल्या गोपी ज्याप्रमाणें कानांत नथा आणि नाकांत बुगड्या घालूं लागल्या तशी मानवाची धांदल होते. फणसांतलि गरे मात्र गोड लागतात. नारळांतील खोबरें मात्र गोड असतें. ह्मणून ती फळें खाण्याची पद्धत माहीत नसेल आणि वरल्या सालीसुद्धा फणस किंवा असला नारळ कोणी खाऊं लागला तर त्याला ती अमृततुल्य रुची प्राप्त न

होतां दांत पडताले. जिभेच्या चिंध्या होतील. तसा प्रकार मनुष्याचा झाला आहे. प्रपंचांतील सगळीं खटलीं परमेश्वरानें आणि शाहण्या आर्य लोकांनीं आनंदाकरितां व कल्याणाकरितां निर्माण केलीं आहेत, पण त्यांची योजना बरोबर होत नाहीं, ह्मणून संसार दुःखाचें सरण आणि दोषनिधि झाला आहे.

## शब्दाकडे काय शब्द.

ज्ञान संपादन करण्याकडे, काव्य गायनादिक कलांनीं मन तल्लिन करून हरिभजन हरिकथा करण्याकडे, वेदघोष, सदुपदेशाचीं व्याख्यानें देऊन आपल्या बरोबर लोकांस सन्मार्गास लावून आनंदानें मोठ्या समारंभानें तीर्थयात्रा वगैरे शेंकडों सत्कृत्यें करण्याकडे, शब्द विषयाची योजना करून पहिल्या खंडांत शब्दविषयाची प्रसंसा केल्याप्रमाणें त्याचें सार्थक करण्याचें सोडून दुसऱ्या खंडांत वर्णन केल्याप्रमाणें शब्दाची दुर्योजना करून शृंगार आणि बीभत्स रसांचा गोंधळ घातला तर त्या भागांत लिहिल्याप्रमाणें दुर्दशा कां न होईल ?

## स्पर्शाकडे काय दोष.

स्पर्शसुखाची महति पहिल्या खंडांत वर्णिली आहे. त्याप्रमाणें स्पर्श विषयाची योजना केली आणि 'धर्मेच अर्थेच कामेच नाति चरामि' ही देवाब्राम्हणांसमक्ष केलेली आपली प्रतिज्ञा आनंदानें शेवटपर्यंत पाळली तर स्पर्शसुखाचे अत्यंत घातक परिणाम कसे होतील. पहिल्या खंडांत वर्णन केल्याप्रमाणें अमोलिक लाभ गृहस्वामिणीपासून होतील. आणि गृहस्थाश्रमाचें सार्थक होईल. वडील, साधुसंत ह्यांची शुश्रुषा व अनाथाचें दुःख निवारण जर हस्त करतील तर जन्माचें सार्थक होईल. ह्या सर्व गोष्टी सोडून दुसऱ्या खंडांत लिहिल्याप्रमाणें अमंगळ दुर्गंधी कुपाचें कुत्रें बनल्यावर मागें वर्णन केल्याप्रमाणें दुर्दशा, विपत्ति आणि बेअब्रू होऊन शेवटीं अधोगति प्राप्त झाली तर तो दोष स्पर्शसुखाचा कीं अत्याचार आणि अनाचार करणाराचा ?

## रूपांचा काय उपाय ?

परमेश्वरानें नेत्रकमलें दिलीं आहेत. त्याचें सार्थक तीर्थ, क्षेत्रें, देवाचे

छंदिने, खान्या, निरनिराळ्या पूजा, दीपोत्साह पाहून करावे. अपार प्रेम-संपत्ति आपल्या आर्यपूर्वजांनीं भरून ठेविली आहे. ती ह्या दोन दुर्भिणीच्या द्वारें आपल्या हृदयमंदिरीं सांठवून आपल्यास सुसंस्कृत करून घ्यावें, आपलें मन पवित्र करून हरिचरणीं अर्पण करावें, चराचर सृष्टि सूक्ष्मदृष्टीनें व ज्ञान-दृष्टीनें अवलोकन करून तिचे कर्त्याचें कौशल्य, योजना, सामर्थ्य आणि दूरदृष्टी मनांत आणून थक्क होऊन त्यास अनन्यभावें शरण जाऊन त्याची कृपा संपादन करावी, ते सोडून कुश्चळ वारांगना, नट आणि नर्तक ह्यांच्या शेंबडाच्या बोळक्यांकडे, हावभावांकडे पाहून नरकाचें साधन मन करूं लागलें. भपकेदार वस्तु आपल्यास लुटण्याकरितां आल्या त्यांस मोहून आपल्या घरा-दारावर तुळशीपत्र ठेविलें, आपले देशबांधव उपाशी मारले तर रूपविषयानें काय करावें?

## रसाकडे दोष का मनाकडे.

बलवर्धक, बुद्धिवर्तक, आनंददायक आणि अमृतोपम पदार्थांनीं प्रभूनीं दुनिया भरून ठेविली असून ते सोडून शरीराची, अकलेची, धनाची आणि अब्रूची माती करणारे पदार्थ खाण्यापिण्याची चटक जिव्हेस लावून आपला आपण घात केला, मनुष्यानें आपलें पोट जाळण्याकरितां दुसऱ्या निरुपद्रवी प्राण्याचे प्राण घेतले, आपल्याला त्यांच्यापासून मिळणाऱ्या अमृताची हानि करून घेतली, आपल्या शेतास मिळणारें खाद्य नाहींसें करून त्यांची आणि त्यांच्या बरोबर आपलीही उपासमार करून घेतली. जिव्हेला नेहमीं पाहिजे तें खाण्याची चटक लावून, स्वैर सोडून दिलें तर घरेंदारें जाऊन अन्नान्नगत झाली तर रस विषयाला दोष द्यावा, का प्रारब्धाला द्यावा, कीं आपल्या अनावर मनाला द्यावा.

## गंधावर का टपका.

नानाप्रकारचीं सुवासिक पुष्पें व त्यांजपासून काढलेलीं अत्तरें, चंदन, केशर, कस्तुरी वगैरे परिमल द्रव्यें ह्यांनीं भगवंताची प्रेमपूर्वक पूजा करावी. गुरुजनांस संतुष्ट करावें. आपल्या व आपल्या गांवांतील घरें स्वच्छ ठेवून त्यामध्यें आयुर्वृद्धि करणारे सुगंध भरून ठेवावे. अपायकारक गंधाचा प्रवेश न

व्हावा म्हणून सावधागिरी ठेवावी; तें सोडून हार, गजरे ह्यांनीं आणि सुगंधिक द्रव्यांनीं बाजारांतील चालतें बोलतें दुर्गंधीकूप पूजिले, अत्तराचे दिवे बैठकींत व तमाशांत जाळले, केशराचे रंग आणि गुलाल ह्यांनीं रंगेल दुर्व्यसनी लोकांस न्हाणिलें तर दुर्गति, दरिद्र आणि दुष्टरोग प्राप्त झाले तर ईश्वरावर बोल का, आपल्या मूर्खपणावर बोल ठेवावा ह्यांचा विचार ज्याचा त्यानेंच करावा.

## चांगलें घेतलें तर फळ चांगलें.

विषयांचे प्रकार बहुत आहेत. आपल्या परिस्थितीस हितप्रद असतील तें हंसक्षीर न्यायानें पसंत करून घेऊन जे विषयांचा उपभोग घेतात त्यांचें कल्याणच होतें. पीठ टाकून देऊन कचरा आणि खडे, माती चाळणी घेते. त्याप्रमाणें विषयांच्या प्रकारांची योजना जे करितात त्यांचा खंड दोन ह्यांत लिहिल्याप्रमाणें घात होतो. मनुष्यास मदत परस्पराकडून होऊन सगळ्या जनतेचें कल्याण व्हावें, माया, ममता, प्रीति, स्नेह इत्यादिक अमोलिक मनोवृत्तींचा लाभ होऊन गोकुळाप्रमाणें आनंदांत कुटुंबें राहावीं, त्या कुटुंबांनीं दुसऱ्या कुटुंबाबरोबर सत्यबंधुप्रेमानें वागून सर्व राष्ट्र एक कुटुंब असल्याप्रमाणें जुटीनें वागावें, राष्ट्रांनींही परस्परांवर ममता ठेवून वसुंधरेवरील सर्व मानवांनीं एका कुटुंबांतील असल्याप्रमाणें कायावाचामनें निर्मळ अंतःकरणानें गुण्यागोविंदानें करून, सत्ययुगांत असल्याप्रमाणें पुण्यरूप असावें म्हणून कुटुंबरचना, समाजरचना, राष्ट्ररचना आणि शेवटीं साम्राज्यरचना ज्ञानी पुरुषांनीं करून ठेविली असून आपण मंदमति होऊन सहोदरांशीं, जन्मदात्याशीं, कलत्राशीं व पुत्राशीं शुद्ध प्रतारणा करूं लागलों, तर सगळ्या भूमंडळावर कलहाचा प्रळयाग्नि पेटून राष्ट्रेंचीं राष्ट्रें जळून खाक न होतील तर काय होईल. सुखासाठीं जमविलेला परिवार आपस्वार्थी व वंचक न होईल तर काय होईल? पापाचरणाच्या कारणानें चिंता, क्लेश, दरिद्र, दुःख ह्यांचा वर्षाव जनतेवर होईल तर काय होईल.

## वैभव.

वैभव केवळ एकट्याच्या देवपुजेकरितां नसून एकट्याच्याच भाग्यानें मि-

ळत नाहीं, त्यांत पुष्कळांचे हिस्से असतात. ते बहुभाग्यानें एकाच्या नांवावर प्राप्त होतें म्हणून प्राप्त झालें असतां जितक्या मोठ्या समुदायाचें कल्याण करितां येईल तितकें करावें, सर्वांस सुख देऊन सर्वांचे आशिर्वाद घ्यावे, तें सोडून आपण त्याच द्रव्याचा विनियोग लोकांशीं भांडण्यास लोकांचा छल करण्यास, त्यांस लुटण्यास, त्यांस गांजण्यास व जिंकण्यास करूं लागलों, जमिनीच्या किंवा देशाच्या अन्यायाच्या अभिलाषास्तव एकाच्या नद्या वाहवूं लागलों, तर त्याचा दोष वैभवाकडे का जमिनीकडे. का आपल्या दुराशेकडे. चाकरी करील त्याला पोटभर भाकरी देण्यास भूमिमाता तयार नाहीं काय ? परोपकार करून जन्मसार्थक करून घेऊं नका. माझा विनियोग अधोगति प्राप्त करून घेण्याकरितां असें म्हणून धन दौलत आपल्यामागें लागते काय ?

## देह.

ही नरतनु अनंत जन्मांच्या सुकृताच्या जोडीमुळें आपल्यास प्राप्त झाली आहे तिचा उपयोग भगवत्प्राप्तीकडे, परोपकाराकडे, ज्ञानवर्धनाकडे करण्याचा असतां तें सोडून रतिमात्र असलेल्या रतिसुखाकडे, विषयोपभोगाकडे परापहाराकडे व परपीडणाकडे केला तर त्याची दुर्विपाक विषफळें भोगण्यास दुसरें का कोणी येईल. मन ही एक अमोलीक देणगी प्रभूंनीं मानवाला दिली आहे, तिचा सदुपयोग केला असतां ज्या लाभाविषयीं कल्पना करितां येत नाहीं असे अनंत लाभ होतात अनंत सामर्थ्य प्राप्त होतें. विलक्षण चमत्कार करिता येतात. तें मन आपण स्त्री, सुत, धन, गृह, इत्यादिकांत कोंडून ठेवलें आणि अज्ञानाचें दास्य त्यास करण्यास लावलें तर अनित्यालाच नित्य मानून सदोदित कनक व कांता ह्या दोन कातऱ्यामध्यें तें पडून त्याच्या चिंधड्या न होतील तर काय होईल. थोडी द्रव्यहानि झाली किंवा एखाद्या सुहृदाचा वियोग झाला तर तें रडत बसेल तर काय करील. जरा अनिष्ट गोष्ट घडली कीं, तें खचून गोंधळून जाईल तर काय करील. ह्या सर्व गोष्टींचा दोष मनाकडे का आपण त्याला सुसंस्कार केला नाहीं म्हणून आपल्याकडे, तात्पर्य संसारास असारत्व येण्यास आपली दुर्योजना कारण आहे.

## मनोदेवता.

मनुष्याला परमेश्वरानें ज्ञान दिलें आहे म्हणून त्या ज्ञानाचा तो जसा उपयोग करील तसें त्यास फळ मिळावें म्हणून प्रभूनीं सत् व असत् हे दोन्ही मार्ग त्यास खुले ठेविले आहेत. सन्मार्गानें जाईल त्याचें कल्याण होईल, दुर्मार्गानें जाईल तो संकटांत पडेल. सन्मार्गाचें अवलंबन करणें फार कठिण आहे. सकृद्दर्शनीं मनोहर नाहीं, यामुळें मनुष्याची प्रवृत्ति बहुधा कुमार्गाकडेच होते. सत् कोणचें व असत् कोणचें, हें कळण्याकरितां मनोदेवता अंतःकरणांत स्थापन केली आहे. इतर प्राण्यापेक्षां मनुष्याचें श्रेष्ठत्व असण्यास एक श्रेष्ठतम देणगी दिली आहे, ती केवल प्रभूंची विभुतिच; मानवाच्या अंतःकरणांत वास करित आहे. ती मनोदेवता होय. ईश्वरदत्त धर्म काय तो तोच आहे. भूतलावर प्रकट असलेल्या अखिल धर्मांचें जनन तिच्यापासूनच झालेलें आहे-धर्माचें निर्मळ स्वरूप ती होय. तिच्या आज्ञेप्रमाणें जर माणसें वागतील-तर जगांत दुःखाला किंवा शोकाला ठावच मिळणार नाहीं. मनुष्याच्या अंतःकरणांत कामक्रोधादिक षडुर्मी आहेत, त्या मनाच्या आधिन न होतां ह्या पवित्र देवतेच्या आज्ञेप्रमाणें वागूं लागतील तर जनतेमध्यें सर्वत्र विवेक, निस्पृहता, शांति, क्षमा, सौजन्य, अनुराग, वात्सल्य, औदार्य, विराग, विजय, विनय, अदांभिकता, मर्यादा, सलज्जता, समता, अहिंसा, सरलता, इत्यादि सद्गुण भरून जाऊन दुःखशोकाची वार्ता सुद्धां नाहींशी होईल. मनुष्य विचारानें वागूं लागेल तर अन्यायाचरण नामशेषच होईल. मग न्याय, आणि न्यायाधीश हे शब्द कोशाबाहेर कधींच येणार नाहींत. दंड, शासन इत्यादि शब्द अगदीं अपरिचित होऊन त्यांचा अर्थ समजण्याची मुष्कील पडूं लागेल. राज्याचें अर्धें कामच संपेल. निस्पृहतेची प्रवृद्धि झाली असतां राज्याचा बंदोबस्ताचें कारणच नाहींसें होईल. ज्यांचे त्यास लक्ष-लाभ असो. परस्वास हात लावणें म्हणजे नरकांत उडी घालणें आहे, आपल्या पवित्र मुखास काजळ सारविणें आहे, असें सर्वांस वाटूं लागेल तर पृथ्वीवर कोट्यवधि माणसें माणसांचेच प्राण घेण्याकरितां सज्ज ठेवावीं लागत आहेत-व राष्ट्रांच्या कमाईचा फार मोठा भाग मानवांचे गळे कापण्याकरितां शस्त्रा-

खांस खर्च करावा लागत आहे, व शेंकडों खंडी दारूगोळा सालोसाल मातींत जात आहे, तो अचानक वांचेल. सकलजनतेमध्यें निर्भयता, संतोष, शांति, आणि समृद्धि ह्यांचें साम्राज्य होईल. मनुष्यें परस्परांस बंधुप्रेमानें मदत करूं लागतील. एकच राष्ट्र किंवा एक व्यक्ति संपत्तीच्या अतिरेकानें बुद्धि-भ्रष्ट होऊन बेफाम व्हावी, आणि कित्येक राष्ट्रांना किंवा व्यक्तींना अत्यंत हाल-अपेष्टा भोगाव्या लागाव्या, असें कधींही होणार नाहीं. एकास कांटा मोडला तर दुसऱ्याच्या अंतःकरणास तळमळ होईल असें झालें असतां अर्थात्च दुःखाचें मूळ नाहींसें होईल. दया, क्षमा, शांति, भूतदया प्रभृति सद्गुणांचा पूर्ण अंमल बसला तर पापच उरणार नाहीं. शोकाचें तेंच बीज नाहींसें झालें तर शोकाचें व दुःखाचें नांवही नष्ट होईल. परमेश्वराची योजना बरोबर अंमलांत येईल. दुःखाचें मूळ पाप हें म्हणणें सध्यांच्या विपरित कालीं कित्येकांस रुचणार नाहीं. कित्येक तर फार थट्टा करतील हें कांहीं खोटें नाहीं. पण इतिहास आपणाला तसें सांगतो, ह्याला काय करावें. पवित्र रामराज्यांत अ-काल मृत्यु नव्हता असें रामायण सांगतें. ही गोष्ट मानवी प्रयत्नाच्या बाहेरची आहे. असें असतां त्या पवित्र राज्यांत सिद्ध झाली होती. मग दरिद्रादिक दुःखें सहज दूर होणारीं असल्याकारणानें नसलीं तर त्यांत काय नवल आहे. इतका प्रभाव शुद्ध वर्तनाचा होता. कमीजास्ती मानानें शुद्धवर्तन पांडवांपर्यंत चाललें होतें. धर्मराजापुढें भूमिगत द्रव्याचा वाद आल्याची कथा सुप्रसिद्धच आहे. तिच्यावरून त्यावेळच्या मनुष्यांच्या मनाची स्थिति कळून येते. त्याच द्रव्याच्या वादाचा न्याय पाताळीं होत असतां कलिरायाच्या विनीचा वारा वाहूं लागतांच उभय पक्षकार आणि प्रत्यक्ष धर्ममूर्ती राजा धर्म यांच्या बुद्धीस विपर्यास कसा झाला हें सर्वश्रुतच आहे.

## षड्रिपु.

देवानें सर्व दिलें पण आपल्या कर्मांनें त्यांत विष कालविलें, त्यास देव काय करील. आपण नीतिभ्रष्ट झालों. षड्ऊर्मी पवित्र मनोदेवतेच्या कह्यांत न ठेवतां उलट मनाच्या स्वाधीन केल्यामुळें आपला नाश झाला आहे. पण तो कांहींच नाहीं. आपण शुद्धीवर येऊं तोंपर्यंत एकसारखा चढत्याप्रमाणानें

आपला नाशच होत राहणार. सर्व घातास हे षड्रिपु कारण आहेत. त्यांचें वर्णन स्वतंत्र गद्य लेख लिहून कोणी मार्मिकपणानें सविस्तर करून त्यांच्या दुष्परिणामाचा स्फोट करील तर जनपदाचें मोठें कल्याण होईल.

## अधःपात आणि हाल.

कलिप्रवेशापासून जनतेच्या मनाचा अधःपात एकसारखा कसा होत आला आहे, आणि त्याचा परिणामही तसाच कसा झाला आहे. पहा, अगदीं पहिल्यानें देवघेवीचा सर्व व्यवहार नुसत्या वचनावर चालत होता. वचनाला पूर्वी लोक किती जपत असत, हे पुराणप्रसिद्ध हरिश्चंद्र व दशरथ प्रभृतींच्या कथांवरून सर्वश्रुतच आहे. बापानें कर्ज घेतलेलें पुत्रास माहीत नसलें तरी सावकाराच्या शब्दावर भरंवसा ठेवून ऋणकोचा पुत्र बापाचें कर्ज वारीत असे. कर्ज ठेवणें हें महापातक असें समजत असत. पुढें तोंडचे वचनांत अंतरायाचा किंचित् प्रादुर्भाव झाला, तेव्हां पुरजावर दोन अक्षरें पडूं लागलीं. त्यास मान मिळण्याची चलचिचल दिसूं लागली. तेव्हां कुळस्वामी किंवा ग्रामदेवतांच्या शपथा कागदावर होऊं लागल्या. त्यांस कोणी कोणी धाब्यावर बसविलें तेव्हां माणसांच्या साक्षीवर आलें. तथापि सरकारची पायरी चढावी लागू लागल्यावर मुद्रा घेतल्याची आठवण रहावी म्हणून कीं काय तप्त मुद्रा देतात त्याप्रमाणें छापील कागदाचा दंड जणू कर्जांची आठवण राहण्याकरितांच पडूं लागला. सरकार बांधून घेणार भलें आणि त्यावर शक्कल लढविणार लोकही भले. सरकारनें दुसरीं दस्तऐवज नोंदण्याचा बंदोबस्त केला तर दस्त लिहून दिला पण भरणा पोंचला नाहीं अशा तक्रारी येऊं लागल्या. शेवटीं नोंदणाऱ्या कामगारानें भरणा समक्ष करावा असा हुकूम झाला. पण निर्लज्जपणाची आणि युक्तीची कमाल झाली. भरणा अमलदारास दाखवून परत घेण्याची शक्कल निघाली. तोडीवर तोड, खरा भरणा घेऊनही पुन्हा रुपये परत घेतले. अशा तक्रारी क्वचित् प्रसंगीं कुठें आणूं लागलीं आहेत. ईश्वराच्या येथील न्याय निराळाच आहे. वासना तशीं फळें, हा तेथील कायदा आहे. जन्मांत एकदांही दुष्काळ न पाहतां पूर्वींचीं पुष्कळ माणसें जात असत. पुढें पन्नास वर्षांनीं एकदां दुष्काळ पडला. त्याच्यापुढें बावीस वर्षांनीं पडला. आतां

तर त्याच्या आवृत्तींस सुरुवात झाली आहे. " हांसत कर्म करावें भोगावें रडत तेंचि परिणामीं. "

## शुद्ध वर्तन.

सृष्टि कष्टकारक होण्यास जनतेचें दुर्वर्तन कारण आहे. पण जगन्नाथाच्या योजनेप्रमाणें ततोतंत वर्तन जनतेकडून कधींच झाल्याचें पुराणादिकांच्या दाखल्यावरून दिसत नाहीं. सध्याच्या कलीरायाच्या जाज्वल्य अंमलांत तसें वर्तन होण्याची आशा कोणी वेडापीरही स्वप्नांत देखील करणार नाहीं. मोठा चमत्कार हा कीं हें अनर्थांचें कारण जगजाहीर आहे. सर्व लोक त्याबद्दल दिलगिरी प्रकट करून हळहळतात. पण असें कोणी पाहत नाहीं कीं, जनता जनता म्हणजे आहे तरी काय ? जनता व्यक्तिघटितच आहे. प्रत्येक व्यक्तीनें आपलें वर्तन शुद्ध केलें तर जनतेचें वर्तन वाईट राहणार कोठून ! असो. लोकांशीं कांहीं करावयाचें नाहीं. कोणाच्या म्हणण्यानें कोणी शुद्धीवर येतो असें नाहीं. पण एकाचें पाहून मात्र दुसरे सत्पथास लागतात म्हणून ज्यास कल्याणाची इच्छा असेल व निजानंदास पात्र व्हावयाचें असेल त्यानें जगाची वाट न पाहतां किंवा जगाची उठाठेव करीत न बसतां आपलें वर्तन शुद्ध ठेवण्याचा निश्चय करून अंमलांत आणावा हेंच काय तें कर्तव्य आहे. सकल जनतेच्या सद्वर्तनानें सृष्टि आनंदमय होण्याचा संभवच नाहीं, त्यापेक्षां आपल्या पायांत जोडा घालून सर्व मार्ग मृदु चर्मानें मढविल्याप्रमाणें सुख आपण अनुभवितों त्याप्रमाणें आपलें वर्तन शुद्ध ठेवून आपण निजानंद संपादन करून सृष्टि आनंदमय करून घ्यावी.

# भाग १८

—०:*:०—

## विपर्यास.

आकाशात् पतितं तोयं यथा गच्छति सागरं ॥
॥ सर्व देव नमस्कारं केशवं प्रतिगच्छति ॥ १ ॥

### पुरुषार्थवृक्ष.

चोऱ्यायशीं लक्ष पायऱ्यावरून घुटमळत घुटमळत शेवटल्या पायरीवर लेल्या प्राण्यास मनुष्य ही पदवी आहे. या प्राण्यास मात्र प्रभूनीं ज्ञ म्हणून जी देणगी दिली आहे तिच्या प्रभावानें अनादि कालापासून लेल्या ज्ञात्यांनीं सारासार विचाराअंतीं जे संस्कार ठरविले तोच सं होय. मनुष्यानें त्यांत जन्म घालवून जे अर्थ संपादन करावयाचे त्यांस षार्थ म्हणतात. धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष असे चतुर्विध पुरुष आहेत. बीजवृक्ष या न्यायानें हे पुरुषार्थ आहेत. पुरुषार्थ वृक्षाचें व मूळ धर्म होय. अर्थ हा शाखापल्लवादि विस्तार, काम हीं सुरम्य मनो पुष्पें आणि सलोकता, स्वरूपता, समीपता व सायुज्यता ह्या चार मु त्या वृक्षाची सुरस रुचिर फळें होत. पशूला रसाळ फळाचें ज्ञान नसतें, वृक्षाच्या विस्तारास कारण मूळ हें वर्म माहित नसतें म्हणून तें झाडाच्या फां पानें व पुष्पेंच खाऊन व मुळ तुडवून झाडाचा विध्वंस करून टाकतात. प्रमाणेंच कलियाच्या अंमलांतील माणसांचा प्रकार झाला आहे. त्य आदि आणि अंत दोन्ही सोडून मधल्या तुकडीवरच सर्व प्राण ठेविले आ अर्थ आणि काम म्हणजे कनक व कामिनी ह्यासच ब्रह्म मानिलें आहे. मा व कांता ह्या दोन पात्यामध्यें नरास घालून माया मानवाच्या चिंध्या फ टाकीत आहे. मोक्षफल या वृक्षास येण्यापूर्वीच शाखापर्णें आणि पुष्पें खा नरपशु या वृक्षाचा व त्याच्याबरोबर आपलाही सत्यनाश करून घेत आहे.

## मूळ.

पुरुषार्थवृक्षाचें बीज धर्म. त्याचीं ४ स्वरूपें आहेतः—१ गुणधर्म, २ कर्तव्य, ३ दानधर्म परोपकार आणि शेवटचें ४ ईश्वरप्राप्ति यांपैकीं कर्तव्य ह्या स्वरूपाचा मुख्य आधार पुरुषार्थवृक्षास आहे. अर्थप्राप्तीचा खरा व राजरोस मार्ग कर्तव्य होय. या मार्गानें जी अर्थप्राप्ति होते तीच सुखप्रद व कल्याणप्रद होते. काम ह्मणजे मनोरथ हे परिपूर्ण होण्यास अर्थावाचून अन्य साधनच नाहीं. सर्व मनोरथ यथासांग व यथाशास्त्र परिपूर्ण करून घेऊन मनाच्या ओढी शांत झाल्यावर अंतिम पुरुषार्थ मोक्ष मिळविण्याचा काम धारण करून सद्गुरु कृपाप्रसादानें तो साध्य करून घेतात, तेंच नरश्रेष्ठ व चतुर होत. तात्पर्य, पुरुषार्थवृक्षाचीं मधुर फळें ज्या मुक्ति त्याच धर्माचें सार्थक होत. नरजन्मांत साध्य विषय काय तो हाच आहे. प्रपंच हा तें साध्य साधून घेण्याकरितां आहे. कनक व कामिनी हीं प्रपंच यात्रा यथासांग चालविण्याचीं साधनें आहेत. हीं दुकल स्वयमेव सुख नव्हे हें मागील विवेचनावरून आपल्यास कळून आलें आहे. परंतु हीं साधनें नसून साध्यच मानल्यामुळें कसा विपर्यास झाला आहे हें पुढें लिहिलें आहे.

## साध्य साधन.

हितकर, सुखकर किंवा आनंदप्रद वाटेल त्याला लुब्ध होऊन त्याच्या भजनीं लागावें हा मानवी स्वभाव आहे. त्यास अनुसरून मन प्रयत्नास लागलें म्हणजे त्याला त्या प्रयत्नाखेरीज दुसऱ्या कशाचाच विचार राहत नाहीं. प्रयत्नाचा भर होतां होतां इतका वाढतो कीं ज्याच्या प्राप्त्यर्थ तो प्रयत्न असतो त्यासही मन विसरून जाऊन प्रयत्नास अथवा साधनासच सर्व प्राधान्य प्राप्त होतें. द्रव्य याची मूळ योजना म्हटलें असतां सुखाचीं साधनें प्राप्त होण्याकरितां आहे म्हणजे तें साधनाचें साधन आहे. साध्य विषयसुख आहे. पण केवढा विपर्यास झाला आहे पहा, सगळें जग ह्या कनकाच्या मागें लागलें आहे. राजापासून रंकापर्यंत सर्वांचें आयुष्य ह्याच्या अभिलाषांत जात आहे. न्याय, नीति, पुण्य, धर्म, कर्म, लौकिक वगैरे गुणांचें सुद्धां बळी त्या द्रव्याच्या पायावर नित्यशः अनंत पडत आहेत. साध्य जें सुख त्याचा विसर पडून द्रव्यार्जनाकरितां सुखा-

थर पाणी सोडण्यास मनुष्यें तयार होऊन अहोरात्र द्रव्याकरितां सक्तमजुरी मोठ्या आनंदानें व अभिमानानें करीत आहेत. त्या मेहनतीचे श्रम म्हणजे सुखहानि त्यांच्या मनांतसुद्धां येत नाहीं. परलोकीं यमदंड घडेल या कल्पनेचा जन्म कोठून होणार. पुढल्याजन्मीं पापाचें प्रायश्चित्त भोगल्यावांचून सुटका नाहीं हें कसें कळणार ? द्रव्यलोभाचा अतिरेक झाला म्हणजे कार्पण्य उत्पन्न होतें, कृपण मनुष्य साधनाच्या साधनास साध्यापेक्षां म्हणजे सुखापेक्षां जास्त मानितें. " आडका वेचिता जाय प्राण " अशी त्याची अवस्था होते. देवार्चना, संतसेवा, अन्नसत्रें, परोपकार, लोकसेवा, सत्कीर्ति, दानधर्म इत्यादि अनंत सत्कृत्यांचें संपादण्याचें साधन द्रव्य आहे हें वर्म जाणून जे त्याची यथार्थ योजना करितात त्यांस वरील अनंत साध्यें साधून त्यांच्या जन्माचें सार्थक होतें. साधन समजलें तरी साध्याची योजना ज्याची गैरशिस्त होते त्याची सहजच दुर्दशा होते. द्रव्यास प्रति-साधन न समजतां साध्यच जे समजतात ते सुखास स्वार्थास व परमार्थास मुकतात. द्रव्य खर्चू नये एवढें मात्र त्यांचें ब्रीद असते. हजारों रुपये खर्च करून वडिलांनीं बांधलेल्या इमारती शेकारावांचून व किरकोळ डागडुजीवांचून नाश पावूं लागल्या तरी ते तो खर्च करण्यास नाराजी असतात. प्रत्यक्ष प्राणावर बेतली असून ऐपत असतांही वैद्यास पैसे द्यावे लागतील म्हणून औषध घेत नाहींत. मोठ्या नाखुशीनें नाइलाज होऊन अगदीं शेवटची वेळ आल्यावर औषध घेऊन चांगला गुण आला तरी रोगाची राहिलेली कसर निःशेष करण्याकरितां पुढें औषध घेण्याचें खर्चाच्या भीतीनें सोडून शेवटीं प्राणास मुकतात. तात्पर्य साध्य आणि साधन ह्यांचा विपर्यास झाल्यामुळें असे अनर्थ हमेशा होतात.

## कामिनी.

कनकाचा प्रकार वर लिहिला तसाच कामिनीचा आहे. संसार यात्रा सुखानें व्हावी, संसाराची घरांतील व बाहेरील कामें सुरळीत चालण्याकरितां त्यांची वाटणी योग्य योजनेनें व्हावी, परस्परांची कळकळ व प्रेम उत्तम प्रकारचे हित, संबंध एक असल्यामुळ रहावे, दुखणीं बाहाणीं व नानाप्रकारच्या आणखी अपत्ती ह्यामध्यें सेवा, चाकरी, जपणूक, दीलदिलासा एकमेकांस एकमेकांनीं

द्यावा, खर्चावेचाची काळजी काटकसर ठेवण्यास कळकळीचें साह्य असावें, घराणीं व राष्ट्रें ह्यांची अभिवृद्धी निरंतर होत असावी, व सर्व भावी प्रजा कुलीन, सद्वर्तनी निर्माण व्हावी, रतिसुख यथाशास्त्र निर्मळ प्राप्त व्हावें, स्वैर वर्तनामुळें एका स्त्रीचा अनेक भिन्न प्रकृतीच्या पुरुषांशीं योग घडून उपदंशादिक विघातक रोगांना दुर्दशा न व्हावी, धर्मकृत्यें व कुलधर्म, कुलाचार यथास्थित अबाधित चालावे, वगैरे अनंत हेतु म्हणजे साध्यें मनांत आणून समाजव्यवस्थापकांनीं कलत्राची योजना करून ठेविली आहे. "सो शहाणे अक्कल एक" या न्यायानें म्हणा, किंवा सर्वत्र मानवी स्वभाव सारखाच असल्याकारणानें म्हणा, ही कलत्राची योजना सुधारलेल्या सर्व राष्ट्रांमध्यें प्रौढ आहे. पण धनाप्रमाणें स्त्रीसंबंधानें विपर्यास झाला आहे. स्त्रीच्या योजनचे अनंत हेतु मनांत न आणितां स्त्री केवळ रतिसुखार्थच आहे अशी समजूत झाल्याचा भास होतो. वधुयोजना करतांना तिच्या सदृढपणापेक्षां स्वरूपावर भर असतो. नाजूक ऊर्फ अशक्त मुलगी लावण्य असली तरी पुढें प्रपंचांत तिचा उपयोग व्हावा तितका न होतां फार गैरसोय होईल. जन्मभर नवऱ्याला ताप घडल त्याचें मानच रहात नाहीं. संततीचें बळ आईच्या प्रकृतीस अनुसरून असतें. एका बोअरानें एका इंग्रजास म्हटलें होतें कीं, उन्हाला भिऊन छत्र्यांखालीं फिरणाऱ्या नाजूक अबलांची नेभळीं पोरें तुम्ही आम्हांशीं काय रे लढणार! सारांश भावी प्रजा सदृढ निपजण्यास वधु सदृढ व निकोप असली पाहिजे घराण्याच्या चालीरीतीप्रमाणें पुढील संतति सद्वर्तनी निपजते. ह्यास्तव वधु किंवा वर योजितांना माता पितरांची व घराण्याची वर्तणूक अवश्य मनांत आणली पाहिजे, परंतु हुंड्याच्या लोभामुळें "यस्यास्ति वित्तं सनरः कुलीनः असा प्रकार होतो. श्रीमंताच्या व प्रमत्तांच्या मुली धन लोभास्तव पतकरल्यामुळें कैक संभावित कुलीन माणसें पश्चात्तापांत पडतात. वधुवर योजनेच्या संबंधानें पुष्कळच लिहिण्यासारखें आहे, परंतु विषयांतर भीतिस्तव इतकेंच पुरें.

## दुष्परिणाम.

अनंत साध्यें साधण्याच्या हेतुस्तव कलत्र हें साधन योजिलें आहे. पण स्त्री पुरुषांच्या भिन्न स्वभावांच्या कारणानें, कोणाच्या तरी उधळेपणामुळें, कोणा-

च्या डामडौली वर्तनामुळें, कोणाच्या तरी दुर्वर्तनामुळें व अनंत अन्य कारणें उत्पन्न होऊन कधीं कधीं नवऱ्याला भीक नको पण कुत्रा आवर असें म्हणण्याचा प्रसंग येतो. कोठून लग्न केलें आणि सुखाचा जीव दुःखांत घातला असें वाटतें. अत्यंत हितकर सुखकर व आनंदप्रद असा दांपत्यसंबंध सर्व-प्रकारीं तापप्रद होतो. विद्याचार संपन्न म्हणून मिरविणाऱ्या देशांतून सांप्रत हा वैवाहिक संबंध अत्यंत दुःसह होऊं लागला आहे. विवाहितापेक्षां अविवाहितांचें प्रमाण वाढलें आहे. " अति सर्वत्र वर्जयेत " ह्याप्रमाणें सुधारणेच्या व स्वातंत्र्याच्या अतिरेकाचा परिणाम सुधारणेला रानटी स्थितीचें व स्वातंत्र्याला बेबंदीचें स्वरूप प्राप्त करून देणारा झाला आहे. आपला जन्म केवळ आपल्या सुखाकरितां आहे. " परोपकाराय इदं शरीरं " हें म्हणणें मूर्खपणाचें ठरल्यासारखें झालें आहे. स्वतःच्या सुखाकरितां व वैभवाकरितां अनाथांचीं घरें, दारें, देश सुद्धां लुटणें हा मोठा पराक्रम, हेंच जन्माचें सार्थक मानलें जात आहे. पण ह्याचें नवल किंवा खेद वाटावयास नको. अनादि कालापासून दांपत्य-संबंधानें नवरा नवरी म्हणजे एकाच शरीराची दोन अर्धे अशी असलेली समजूत अस्तास चालली आहे. परस्परांचें प्रेमबंधन शत्रूच्या शृंखळाप्रमाणें वाटूं लागलें आहे. अर्धांगी गळ्यांत घोरपड बांधल्या सारखी वाटूं लागली आहे,

## रानटी स्थितीपेक्षां भयंकर.

नवरा बायको हें नातें मोडून रतिसुखार्थ ज्यावेळेस जो पुरुष अथवा स्त्री मिळेल तिचा योग करावा. वाटेल तोंपर्यंत दोस्ती चालवावी, आणि त्याला किंवा तिला सोडून त्यांच्या जागीं दुसऱ्यांची योजना करावी, असा प्रकार सुरू झाला आहे. शिखरावर गेलेला मनुष्य पुढें जाण्यास मार्ग उरला नसल्या कारणानें पुन्हां तळीं येतो, त्याप्रमाणेंच वन्य स्थितिपासून वर चढतां चढतां सुधारणेच्या शिखरावर पोहोंचलेला दांपत्यसंबंध पुन्हां वन्यस्थितीवर आला आहे. पशु, पक्षी आणि अशीं माणसें ह्यांत काय अंतर आहे ?

## वन्या पलीकडे

पशु, पक्षी संतति समर्थ झाल्यावर तरी ओळख विसरतात. गर्भधारणापासून संतति स्वसंरक्षणपटु होईपर्यंत तरी तिचें संरक्षण माया मानवाप्रमाणेंच मोठ्या

समतेनें करतात. पण परावृत्त झालेल्या बुद्धीच्या स्त्रियांस गर्भधारणेपासून व संततीच्या संगोपनापासूनही स्वसुखहानि वाटते, आणि सुखविरोध करणाऱ्या त्या गर्भाचें धारण करून कष्ट, क्लेश व रतिसुखहानि आपण काय म्हणून सोसावी, म्हणून त्या गर्भधारण न होण्याचे उपाय योजितात. त्यांतूनही गर्भधारणा झाली तर विसर्जन करण्याची खटपट करितात. एखादा निगरगट्ट त्या उपायास न जुमानतां प्रसव पावला तर त्यास फेंकून देऊन मोकळ्या होतात. अत्यंत पूर्व ( रानटी ) अवस्थत सुद्धां स्त्रियांनीं संततीचें संरक्षण केलें नसतें तर निर्मानव उर्मीतल झालें नसतें कां ? ठीकच. त्या पशुवत स्त्रियांनीं पशूप्रमाणें आचरण केलें. विद्याचारसंपन्न स्त्रियांनीं त्यांच्यावर कडी केली आहे हेंच त्यास शोभतें. ह्या सुधारणेमुळें संपूर्ण राष्ट्रालाच मुक्ति मिळण्याचें भय वाटूं लागलें, म्हणून अनाथ बालकाश्रम राजांनीं स्थापन केले आहेत. विवाहसंबंध वाढावा म्हणून विवाहितांस अनेक हक्क देण्याच्या योजना चालल्या आहेत. सारांश, ज्या साध्याकरितां दांपत्यसंबंधाची योजना केली. तीं साध्यें विसरून मनुष्यें भलत्याच प्रकारास प्राधान्य देऊं लागल्या कारणानें विवाहसंबंध दुःसह वाटूं लागल्यामुळें सर्वस्वी विपर्यास घडून असे अनर्थ होत आहेत. आपला समाज अद्याप अर्वाच्य सुधारणेच्या प्रसादास पूर्णपणें पात्र झाला नाहीं म्हणून आपल्यास वर प्रमाणें लाभ झाले नाहींत. म्हणून केवळ निराश होण्याचें कारण नाहीं. पाश्चात्य ज्ञानरवीच्या कृपेनें हळूं हळूं सर्व मनोरथ पूर्ण होतील. दांपत्यसंबंधामध्यें झालेल्या विपर्यासाच्या बाबती शतशः आहेत त्याचें वर्णन कोठवर करावें ?

## मंगल कार्यें.

आप्त, सोयरे, इष्टमित्र ह्यांच्यासह आनंदोत्साह व ख्याली खुशाली दोन दिवस सामर्थ्यानुसार भोगावी, विवाह, दत्तविदान वगैरेच्या योगानें उत्पन्न झालेले संबंध सर्वांस महशूर व्हावे, एकमेकांमधील प्रेमभाव वृद्धिंगत व्हावे, सर्व संबंधीं लोकांचा एकमेकाशीं परिचय वाढावा, इत्यादि अनेक हेतु मनांत आणून संस्काराची व मंगलकार्याची योजना आहे. तीं साध्यें गौण होऊन डामडौल व थाटमाट ह्यांसच प्राधान्य प्राप्त झालें. लग्नकार्याच्या पायी समाजाचा

विध्वंस होत आहे. शेंकडा नव्वद कार्यें ऋणोत्पादक असतात. संसारामध्यें ऋणाचा प्रवेश घरास अग्नि स्पर्श होण्याइतका घातक असतांही सर्व शहाणी सुर्ती माणसें कार्य करण्यास निघालीं म्हणजे बेफाम होऊन सर्व अपायाचा पायच असें कर्ज मोठ्या आनंदानें व समारंभानें घरांत आणितात.

## मानपान.

नूतन व्याही विहिणी ह्यांनीं एकमेकांचा आदरसत्कार करावा हें विहितच आहे. त्यास अनुसरून लग्नांत मानपानाची योजना झाली. पण ते मानपान म्हणजे एक बावच होऊन बसली आहे. मनःपूर्वक मान देण्याचें लोपून मानपानाच्या हक्काचा कडाक्याचा वाद होतो. त्यांत उखाळ्या पाखाळ्या निघून कधीं कधीं मोठे तंटे होतात. दुराग्रही सोयऱ्यांची गाठ पडली असतां आजन्म अबोलेही पडतात. विहिणीविहिणींचा कडाक्याचा तंटा चालू असतो, स्त्रीस्वभावास अनुसरून अश्रुपात चालू असतात, व अशा मंगलकारक थाटांत मानपान देण्याघेण्याचा संस्कारही होत असतो. जीं माणसें मोठ्या आदरानें व अगत्यानें बोलविलें असतांही दुसऱ्याच्या घरीं जेवणास येण्याचें कठीण, तीं माणसें व्याह्यांशीं जेवणाची व पागोट्याची खंडणी मागून जळफळत नाखुषीनें दिलेलें जेवण उकळीत असतात. असे विपर्यासाचे प्रकार कार्यांत पुष्कळ होऊन आनंदाकरितां केलेल्या मंगलकार्यांत तंटे बखेडे व रडारडी होते.

## कथा पुराणें.

समाजामध्यें भक्तिज्ञानवैराग्यादिकांचा प्रसार होऊन समाजाची प्रवृत्ति हरिभजनाकडे व्हावी, आणि त्या योगानें लोक तरून जावेत म्हणून कथा पुराणें ह्यांची योजना असतां कथेमध्यें हरदास आपली विद्वत्ता प्रदर्शित करण्याकरितां चंपु; अंतरलापिका; बहिर्लापिका, कुटें कोट्या इत्यादिकांची रेलचेल करून देतात. आपली विद्वत्ता कळण्यासारखे कांहीं तरी गृहस्थ श्रोतृसमाजांत आहेत कीं नाहींत, ह्याचा तर मुळींच विचार करीत नाहींत. त्यांच्या कंठशोषापासून श्रोत्यांच्या अंतःकरणावर लवमात्रही संस्कार घडत नाहीं. विद्वत्ता बेताचीच असून आव मात्र मोठा घालणारा हरदास असला म्हणजे तर

### श्लोक

यत्र वैदिकास्तत्र पंडितः । यत्र पंडितास्तत्र वैदिकः
यत्र चोभयं तत्र नोभयं । यत्र नोभयं तत्र चोभयं ॥१॥

असा प्रकार तो करतो आणि अज्ञान श्रोत्यांच्या मनावर आपल्या विद्वत्तेचा मपका टाकून त्यांस फसवितो. हा एक प्रकार झाला. पोटभरू हरदास केवळ नकले किंवा तमासगीर बनतात. जावयाच्या गोष्टी, सासवासुनांच्या गोष्टी, बादशाह, बिरबल ह्यांच्या गोष्टी, व ग्राम्य नकला करून बायका पोरें ह्यांस हंसवून ते वेळ मारून नेतात. कोणी गायन व वाद्यें ह्यांच्या साह्यानें मनोहरण करितात. कोणी तर गोपीचंद आख्यानांत सोंगेंही घेतात. कोणी तर नांवाला मात्र कथा म्हणून प्रत्यक्ष प्रतिष्ठित तमाशाच करितात.लावण्या, संगीतें ह्यांच्या चालींवर शृंगारीक पदें किंवा कच देवयानी, किंवा शुकरंभा संवाद किंवा गोकुळांतील लीला शृंगाराची पुनः पुनः घोटणी करून सांगून श्रोत्यांच्या मनामध्यें शृंगाराचा उद्भव करितात. हरहर योजना काय आणि प्रयत्न कसले?

## श्रोत्यांची तऱ्हा.

वरील तऱ्हेचे हरदास झाल्यामुळें श्रोत्यांचा प्रकार कसा झाला आहे पहा. शेंकडा एक तरी श्रोता हरिकथा भावभक्तिपूर्वक ऐकून आपल्या ज्ञानाची वृद्धि, मनोविकाराचें शुद्धिकरण, करण्याच्या हेतूनें कथेस जातो काय, कथेहून घरीं आल्यावर आज कीर्तनश्रवणापासून आपल्यास काय प्राप्त झालें. आपल्या मनांतील कोणचे मळ (दुर्गुण ) नष्ट झाले. भगवंताचें कोणचें चरित्र किंवा कोणचे गुण आपल्यास कळून आले. कालच्यापेक्षा आज परमेश्वराकडे आपल्या मनाचा ओघ किती जास्त झाला, इत्यादि विचार करितो काय ? नाटक, तमाशा इत्यादि मनोरंजक समारंभ पाहून निघालेले प्रेक्षक पात्रांच्या भाषणाविषयीं, हावभावाविषयीं, देखाव्याविषयीं चर्चा करीत घरीं जातात व मोकळे होतात, त्याप्रमाणेंच कथांची तऱ्हा झाली आहे. कीर्तनाहून माणसें निघालीं कीं हरदासाच्या भाषणाची, विद्वत्तेची, वाद्यांची, व नकलांची व फलांची चर्चा करीत घरीं जातात. आज कथा छान झाली. आजची खराब झाली. अशीं सरटिफिकीटें हरदासास देऊन मंडळी मोकळी होते. ( अभंग ) ''नळी फुंकिली

सोनारें, इकडून तिकडे गेलें वारें. " असा प्रकार कीर्तनातील ज्ञानोपदेशाचा होतो. तो एका कानांतून येऊन दुसऱ्या कानांतून निघून जातो. सारांश, योजना सफशेल बुडाली.

## सुधारणा.

कालचक्राचे फेरे ज्यास्ती होत गेले म्हणजे हरएक गोष्टींमध्यें गाळसाळ वाढत असतो, त्याप्रमाणें आमच्या कथापुराणामध्यें गाळ वाढला आहे. मूळ हेतूचा विपर्यास झाला आहे. हरदास, पुराणिक ह्यांची रहाणी व आचार आणि कीर्तनें व पुराणें ह्यांच्या पद्धती ह्यांमध्यें घोटाळे उत्पन्न झाले आहेत. ते काढून टाकून पुन्हां नारद व व्यास ह्यांच्या गाद्या स्वच्छ केल्या असतां समाजाचें कोटकल्याण होईल. कीर्तनासारखी उपदेशपद्धति कोणचीही नाहीं. उपासाअंतीं पारणें, ग्रासाअंतीं मोक्ष त्याप्रमाणेंच धर्म जागृति होतच असते. धर्म स्थापनेकरितां ईश्वरांश प्रकट होतात. आपल्या धर्माच्या ग्लानीचा फेरा आतां संपून हळूं हळूं धर्मजागृति होण्याचीं सुचिन्हें दिसूं लागलीं आहेत. आंग्लविद्याभूषित पंडित पुराणाचा महिमा गाऊन नव्या पद्धतीनें पुराणें सांगूं लागले आहेत, ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. कीर्तनपद्धतींतही भर घालून नीति, व्यवहार, जूट स्वदेशाभिमान वगैरे गोष्टींचीं किर्तनें होऊं लागतील तर फार उपयोग होईल. नुसत्या व्याख्यानापेक्षां कीर्तनानें मनावर संस्कार फार चांगला होतो.

## शेवटचा विपर्यास.

विपर्यासाचे कांहीं मासले वर दाखविले. हरएका गोष्टीमध्यें हा विपर्यास भरला आहे. त्याचें वर्णन ह्या स्थळीं होणें शक्य नाहीं. शोधकबुद्धीनें सूक्ष्म निरीक्षण हरएक वस्तूचें व गोष्टीचें केलें असतां दंभ व रूप ह्या दोन जादूंनीं मनुष्यास कसें वेडें करून विपर्यासाची पूर्ण व्याप्ति करून सोडिली आहे हें चांगलें लक्षांत येईल. आणि शोधक निरीक्षणाची सवय होईल.

आतां शेवटचा विपर्यास वाचकांस दाखवितो. या भागाच्या आरंभाच्या विवेचनावरून नरजन्म मोक्ष साधनाकरितां आहे हें वाचकांस कळलेंच आहे. मोक्ष हेंच साध्य आहे. ज्याच्याशीं साक्षात निकटसंबंध असतो तोच मालक

वाटतो. साधनें हींच स्थूलदर्शनीं दिसून येतात ह्यामुळें साध्यापर्यंत नजर पोहोंचत नाहीं. अर्थात साधनास मालक मानिलें जातें पाटलापासून स्टेट सेक्रेटरीपर्यंत राजसेवक यांस साक्षात् संबंधामुळें गरीब रयत सरकार, धनि, (राजे साहेबही म्हणते. त्याप्रमाणें संसारांतील पंच विषय, मायाजाल, (धनवैभव, सत्ता इत्यादिकांचा जीवाशीं साक्षात् निकटसंबंध असतो म्हणून अज्ञान माणसें त्यालाच साध्य मानितात. व त्यांच्याच आराधनेंत जन्म घालवितात व जन्ममरणाच्या रहाटगाडग्यांत फेरे घेतात. मातापितरें, धनि, गुरू, पति, राजा इत्यादिक यांस देव मानण्यास नीति शास्त्रें सांगतात. उपासक आपल्या उपास्य देवतांस ईश्वर समजतात. मताभिमानानें एकमेकांचा द्वेषही करितात, वादाविवाद वाढवितात. सर्व धर्म पंथ अशाच मार्गानें संस्थापित झाले आहेत. पण हे सर्व विपर्यास होत. बहुतेक धर्मपंथ परमेश्वराच्या प्रतिनिधीचेच उपासक आहेत. यामुळें प्रतिनिधीचा हुकूम मानून त्यांच्याशीं राजनिष्ट राहिलें असतां राजाशीं राजनिष्ट राहणें सहजच होतें. व राजाचा हुकूम शिरसावंद्य केल्याचें श्रेय येतें. त्याप्रमाणेंच म्हसोबा खिरोबापासून ज्ञान राजाच्या ब्रह्मापर्यंत कोणच्याही देवतेची भावभक्तीपूर्वक उपासना केली तरी तिनें परमेश्वर संतुष्ट होतो. तात्पर्य, संसार हा विपर्यास होय. खरें साध्य मोक्ष अथवा परमेश्वर प्राप्ति होय. साधनाला भुलून साध्याचा विसर पडणें हा मानवी स्वभावांत दोष असल्या कारणानें साध्य जें परब्रम्ह त्यास विसरून बहुतेक माणसें संसारांत गटांगळ्या खात आहेत. हा पर्वतप्राय विपर्यास सर्वांनीं ओळखून सावध रहावें आणि खऱ्या साध्याची ओळख करून घेऊन त्याची कृपा संपादन करावी. मिथ्या सुखदुःखें कोठून आलीं, त्यांचा भास कोणास होतो, वैराग्य खडतर आहे म्हणून सर्वसंग कायम ठेवून निस्संग कसें रहावें, संसार करीत असतांही निजानंदांत राहून तरून असें जावें, ह्याचा विचार पुढल्या खंडांत केला आहे.

# पंचमखंड—भाग १९ वा.

## भवभ्रम निरसन.

### दुःखशोधन.

दूरे मुंचति वंध मंध इवयः संगांद्भुजंगादिवत्
त्रासंयो विद्धाति वेत्ति दशकं रोगंच भोगंचयः ॥ १ ॥.
( यो० वा० )

### आनंदाविषयीं निराशा.

परमात्म्याची ताडातोड झाल्यापासून मन एकसारखें चौऱ्यांशी लक्ष योनी-मध्यें भ्रमण करून सुखाचा शोध करीत आहे; संसार मंदिरांतील आपल्या सुद्धां सहाही द्वारें त्यानें धुंडाळलीं; प्रत्येक द्वारांत सकृद्दर्शनीं त्याला मोठा आनंद वाटला; येथें प्राणापलीकडे आवडता आनंद आपल्यास खास प्राप्त होईल, अशी मोठी उमेद वाटली; पण तो त्यास कोठेंही मिळाला नाहीं त्या द्वाराच्या अंतःप्रदेशांत तें जसजसें गेलें, तसतसें त्यास दिसून आलें कीं, प्रत्येक द्वारापुढें अनंत लोक त्याच्या नादीं लागून नाश पावून पडले आहेत. हीं सर्व कंवडला-प्रमाणें मनोहर दिसणारीं पण परिणामीं सत्यनाश करणारीं आहेत तेव्हा अगदीं निराश होऊन विचार करूं लागलें असता त्यास वाटलें कीं, आपल्या जन्माचा केवळ शिमगा झाला आहे.

### शिमग्याची योजना.

आपल्या पूर्वजांचे अनुभव अनंत काळाचे असल्यामुळें परिपक्क झालेले होते; त्यांनीं केलेले नियम आणि घालून दिलेले परिपाठ फार खोल विचारांचे आहेत त्यांत कांहीं तरी खुबी आहे ती आपल्यास कळत नाहीं, ती कळण्यास पूर्वजांच्या ठिकाणीं पूज्यबुद्धि आणि आपल्या अंगीं विचक्षणपणा व शोधकबुद्धि पाहिजे. आपला शिमग्याचा सण म्हणजे सगळ्यांत हिडिस्स तो कोणी काढला असेल, आणि आजपर्यंत कसा टिकला असेल, ह्याचें सर्वांस आश्चर्य वाटतें. आपल्या पूर्वजांच्या योग्यतेस हा सण गालबोटच आहे असें वाटतें; तथापि मनुष्याच्या

संसाराच्या शेवटच्या परिणामाचें रूपक करून दाखवून, तें पाहून लोकांनीं शहाणे व्हावें, आपल्या जन्माचा तसा फजितवाडा करून घेऊं नये, म्हणून हा सण ठरविला असावा, असें एका प्रकारें मानतां येण्याजोगें आहे.

## शिमग्याची संसाराचीं तुलना.

शिमगा सालची अखेर, इकडे म्हातारपण ही जन्माची अखेर. शिमग्याच्या सणास अकराव्या महिन्यांत माघ शु० १५ स आरंभ होतो. ते दिवशीं चुडया पेटवून गांवाभोंवतीं फिरवितात आणि महाशब्द करितात. इकडे म्हातारपणीं संसाराची सर्व फटफजिती होऊन पश्चात्ताप झाला, आणि परलोकाविषयीं कल्पना मनांत घोळूं लागल्या, म्हणजे आपण संसारांत येऊन काय केलें! हा विचार मनांत येऊन जसें दिसून यतें कीं आपल्या पोटाची गार भरण्याकरितां व आपलें आणि परिवाराचें सोलवाड करण्याकरितां लोकांच्या मुंडया मुरगळल्या, घरेंदारें लुटलीं, नानाप्रकारें अविचार केले; अतएव गांव जाळिला त्याचें दर्शक ही गांवाभोंवतीं पेटलेल्या चुडया फिरवून करण्याची होळी आहे. आपल्या नांवानें लोक काय करीत आहेत, ह्याचें दर्शक महाशब्द आहे. पुढें शिमग्याची होळी. ह्या होळीस लांकडें गोंवऱ्या चोरीच्या असतात, ह्याचें इंगित असें असावें कीं, पश्चात्ताप झाल्यावर असें वाटलें कीं आपलें हें सर्व लबाडया, लटपटी कसचें म्हणजे प्रतिष्ठित चोऱ्या करून मिळविलेले आहे, त्यापेक्षां ह्याची होळी करून टाकावी, ह्याचें दर्शक होळी आहे. प्रपंचांत येऊन दुसरें कांहींच केलें नाहीं, सर्व जन्म कामिनीच्या नादांत घालविला, ह्याचें दर्शक विभत्स शब्दोच्चार आहे. आपल्यास व दुसऱ्यास दुस्तह दुर्दशा प्राप्त करून रडण्यास व महाध्वनि करण्यास मात्र लावलें, याचें दर्शक शंखवाद्य आहे. झालें तें झालें, आतां हा संसार पुरे, आंगास राख लावावी असें मनांत येतें, तें धुळवडीनें दर्शविलें आहे. नुसती राख लाविल्यानें काय होतें ? प्रायःचित्त घेतलें पाहिजे, हें शेणवडीनें सुचविलें आहे; सर्व दुष्कर्म जाळून टाकलें, अंगास राख लावली, प्रायश्चित्त घेतलें, तस्मात् आतां ईश्वराच्या ठिकाणीं रंगून जाऊन जन्माचें सार्थक करावें; हे दर्शविण्याकरितां रंगपंचमीची योजना आहे हे रूपक समजून जो सावध होईल त्यास सदां रंगपंचमी ! इतरामागें शिमगा आहेच ! !

दुःखानें पूर्ण व्यापिलें आहे त्यापेक्षां त्याचें निवारण केल्यावांचून गति नाहीं. शत्रूचा पराजय करण्याचे मार्गास लागण्यापूर्वी त्याचें बलाबल पाहिलें पाहिजे-त्याच्या मुळाचा माग काढून मुळावरच कुऱ्हाड घातली पाहिजे. म्हणून आतां सुखदुःखाच्या मूळाचा शोध लावून त्यांच्या सपाटयांतून निघून जाण्याच्या तयारीस लागलें पाहिजे. सुख म्हणजे अनुकूल वेदना, असा साधारण समज आहे. त्याच्याच अनुरोधानें सध्या चालू.

## सुखाचा व दुःखाचा वेध.

सुख आणि दुःख ह्यांस आशा आणि काळजी हे दोन वेध आहेत. प्रत्यक्ष सुखप्राप्तीनें जें सुख होतें, त्यापेक्षां सुख प्राप्त होण्याचा पूर्ण संभव वाटला, म्हणजे जी आशा उत्पन्न होते, तिच्या मनोराज्यांत जास्ती सुख वाटतें. सुख प्रत्यक्ष प्राप्त झालें म्हणजे त्याचें महत्त्व वाटेनासें होतें. आणि त्याच्या अनुषंगानें येणाऱ्या अडचणी प्राप्त होतात. यामुळें त्या सुखापासून पूर्वानुमानाप्रमाणें सुख होत नाहीं. " माझी परीक्षा उतरली म्हणजे मी मामलेदार होईन, मग माझ्यापुढें शिपाई नाचतील, हाताखालीं फडणिसासुद्धां कारकून राहतील, रयतेवर माझा अंमल चालेल, मी रयतेचें कल्याण करीन, तसें हित करीन, लोकांवर छाप बसवीन, " असें वाटत असतें. एकदां मामलेदारी मिळाली, आणि पूर्वोक्त गोष्टी करण्यास येणाऱ्या नानाविध अडचणी दिसून आल्या, म्हणजे " दुरूनच डोंगर साजरा " ह्या म्हणण्याचा प्रत्यय येतो; रात्रंदिवस काम करितां करितां खट्टा मोकळा होतो, तेव्हां मामलेदारींत सुख किती आहे हें कळून येतें. दुःखाचाही प्रकार तसाच आहे.

## प्रत्यक्ष दुःख बरें.

प्रत्यक्ष दुःख येऊन पोंचलेलें बरें, पण तें तें येणार असें कळून आलें असतां, जी काळजी उत्पन्न होते, जो त्रास पडतो आणि जें नुकसान होतें, तितकें प्रत्यक्ष दुःख प्राप्त झाल्यानें होत नाहीं; दुष्काळाचें का हूर पहिल्या धडाक्यास प्राप्त झालें म्हणजे सगळी जनता घाबरून जाते; ज्यांच्याजवळ खंडोगणती गल्ला असतो ते, आणि ज्यांच्याजवळ उद्यांचाही शिधा नसतो ते, असे सगळेच दाणादाण करूं लागतात. " पगडी बेचकर रखो धान " हाच मंत्र सगळे

जपूं लागतात. ज्या बाजारांत पाहिजे तेव्हां गाड्यावारी धान्य मिळावयाचें, तेथें पैसे देऊन धान्य मिळेनासें होतें. लोकांस धास्ती पडते कीं, " आपल्या पदरीं दहा माणसें, रोज २।३ पायली धान्य लागणार; आजच धान्य मिळत नाहीं, अजून उमें वर्ष नवें धान्य येण्यास पाहिजे, तोंपर्यंत धान्य आणावें कोठून ! पैसा नसला तर कसेंही करून पैदा करूं, जीव गहाण ठेवूं, पण पैसा देऊन धान्य न मिळालें तर करावें तरी काय ! पैशाला चावावें कीं काय करावें ? धान्य मिळालें तरी शेकडों नव्हे हजारों भिकार मोकळे सुटलेले, खाऊं तरी कसें देईल ! पण पुढें दुष्काळाच्या जाज्वल्य स्थितींत सुद्धां ही काळजी राहत नाहीं.· एकदां दुष्काल पक्का ठरला आणि व्यापाऱ्यांनीं कंबरा बांधल्या, म्हणजे गांवोगांव दाण्यांच्या पोत्यांच्या थड्याच्या थड्या लागून राहतात; ज्याला द्रव्यबळ त्याला कशाचा दुष्काळ ? त्याला फक्त महागाई मात्र वाटूं लागते. सरकारांनीं व उदार गृहस्थांनीं पुढें हात करून दुष्काळग्रस्तास आश्रय दिला, म्हणजे गांवांत मजुरीलासुद्धां माणसें मिळेनाशीं होतात.

## व्यर्थ चिंता

कोणी जरा आजारी झालें, कीं हरण काळजी. मनुष्य त्या आजारी मनुष्याच्या अंताची कल्पना करून, तसें झालें असतां असा प्रसंग येईल, तसा प्रसंग येईल, असें नुकसान होईल, तसें नुकसान होईल, म्हणून कल्पनासृष्टि रचून एकसारखी तळमळ करूं लागतो; इतक्यांत ते मनुष्य सहजासहजीं बरें होतें. रिकाम्या काळजीनें ह्याचें मात्र रक्तशोषण झालें तें परत येत नाहीं. विचार करून पहा, एकेका मनुष्याबद्दल असे प्रसंग किती वेळां आलेले असतात, आणि रिकाम्या काळजीनें किती रक्त शोषण केलेलें असतें ! मरण तर एकदांच यावयाचें. तें तरी काळजी करणाराच्या देखतच येईल, असाही नेम नाहीं. पण ज्या मनुष्याच्या मरणाची काळजी कोणी मनुष्य करतो, तो तें मनुष्य जन्मल्यापासून अनेक वेळां काल्पनिक मरणाचा ध्यास करून आपलें रक्त काळजीला निष्कारण पाजीत असतो; कदाचित् काळजी करणाराच्या देखत मरण आलेंच तर, त्यावेळेस होणार तें होऊन गेलें, आतां रडत बसून काय होणार, आलेला प्रसंग निवारिला पाहिजे; असें म्हणून तो पुढाल उद्योगास लागतो. त्यावरून प्रत्यक्ष दुःखापेक्षां काळजीचें काल्पनिक दुःख किती दुर्घट आहे पहा !

## चितेपेक्षां चिंता प्रबळ.

चिंतेचा प्रभाव प्रज्वालित चितेपेक्षां दारुण आहे, चिता आपल्या मिसाऱ्यांनीं मेलेल्यास जाळते, पण चिंता अग्नि नसतां जिवंत माणसास जाळून टाकते. काळजी शब्दाची रचना मोठी मार्मिक आहे. हिचा विग्रह शेवटचें अक्षर मागें घेतलें ( जी–काळ ) ह्मणजे बरोबर होऊन अन्वर्थक होतो आणि तिच्या प्रमाणाचा बोध होतो. काळजी करणें हा निव्वळ वेडेपणा आहे. काळजी निवारण करण्याचें बहुधां काळजी करणाराच्या स्वाधीन नसतें, कांहीं अंशीं स्वाधीन असलें तर काळजीमुळें मनोत्साह मग्न होऊन शरीर असमर्थ होतें, तेणेंकरून काळजी उत्पन्न करणाऱ्या गोष्टीं नाहींशा करण्याच्या किंवा ज्या गोष्टींनीं काळजी दूर होईल, त्या संपादण्याचा यत्न करण्याच्या कामांत विघ्न येतें. " देवा देवा, रामा रामा, आतां काय करूं, असें ह्मणून रडत बसून नवस करण्यापलीकडे कांहीं प्रयत्न होत नाहीं. ह्या विलापांनीं संकटाला दया थोडीच येणार, दादा, बाबा म्हणून पायधरण्या केल्यानें संकट थोडेंच जाणार, मोठें धैर्य धरून भगीरथ प्रयत्न करून त्याचा बींमोड करण्याकरितां त्याच्यावर मारा करावा; तेव्हां तें पळ काढेल. सारांश, काळजी, संकट दूर करणारी नसून, असलेलें संकट वाढविणारी व नसतें संकट उत्पन्न करणारी आहे.

## प्रभूस शरण जाणें.

ज्या गोष्टी केवळ अपरिहार्य आहेत त्यांचीं सर्व माणसें काळजी करतात. पावसानें जरा ओढ दिली कीं दुष्काळाचें विक्राळ स्वरूप मूर्तिमंत पुढें उभें राहिलेसें वाटून जिकडे तिकडे माणसें घाबरून जातात, आणि चिंतातुर होतात. मुंबईस प्रं. सं. चा कहर चालल्याचें वाचून दूर दूरच्या गांवच्या लोकांस ग्रंथिक सन्निपाताची धाड आपल्यावर येण्यास निघाल्यासारखे वाटून झोंप येईनाशी होते. लढाईच्या धामधुमीवाचून कोणास वाटतें आपल्या सरकारांत असलेल्या पेशाचें काय होईल ? कोणास वाटतें आपला चरितार्थ आणि मोठेपणा सगळा राजाश्रयावर आहे तेव्हां आपलें काय होईल ? कोणी म्हणतो आपलें सर्व द्रव्य बाहेर पेरलें आहे पण कोठेंस का धक्का बसला कीं आपण ठार बुडणार; पण सोतून एकाच्या तरी स्वाधीन लढाई बंद करण्याचें असतें काय ? मग

व्यर्थ चिंताकुल होऊन आपलें रक्त तिला पाजण्यांत मतलब काय ? असल्या अनिवार्य प्रसंगीं परमेश्वराचा धावा करून त्यास संकट घालावें, एवढाच काय तो उपाय पूर्वापर करीत आले आहेत. कार्यकारण भावाखेरीज कशावर विश्वास न ठेवणारे परदेशांतील लोक हल्लीं सुद्धां हेंच करतात.

## विश्वंभरास सर्वांची काळजी.

" आपलें कसें होईल, कसें चालेल " ही विवंचना जनतेच्या फार मोठ्या भागाच्या मागें लागलेली आहे. या काळजीनें लोक व्यर्थ झुरत असतात. खरें पाहतां सर्व तंत्र विश्वंभराच्या स्वाधीन आहे. देणार तरी तो, आणि नेणार तरी तोच. त्याच्या इच्छेविरुद्ध माणूस काय करणार ! जसजशी भवितव्यता असेल त्याप्रमाणें परिस्थिति प्राप्त झाली, तरी ती सोसण्याजोगें सामर्थ्य नारायण देतात, आणि प्राण्याचें रक्षण करतात. प्रसवासारखें मनुष्याच्या अकलेच्या बाहेरचे प्रसंग प्राप्त होतात; त्या वेळीं सूतिकेला प्रसूतिवायु उत्पन्न करून त्या घोर यातना तिला कळूं न देतां तिची सुटका होते. चौऱ्यांशीं लक्ष योनींतील अनंत प्राण्यांचें पोषण कोणाच्या सत्तेनें आणि योजनेनें चाललें आहे ? पाषाणाच्या पोटांत वास करणाऱ्या बेडकास तशा स्थलीं पाणी कोणी निर्माण केलेलें असतें ? त्याला आपण यःकश्चित्‌ एक जीव किंवा त्याचा परिवार पोसण्यात जड आहे काय ? त्या जड झाल्यावर त्याचें पोषण करण्यास अखिल ब्रह्मांडांत कोण समर्थ आहे ? मी कर्ता, मी सर्वांचा पोशिंदा, असा अभिमान वृथा जर कोणास शिवत असेल. तर त्यानें विचार करावा, कीं एक जलयंत्र एकसालीं असडल्याबरोबर एवढें बलाढ्य, धनाढ्य आणि भगीरथ प्रयत्न सरकार जिवापलीकडे मेहनत करीत असतां व परक्या राष्ट्रांची मदत घेत असतां लोकांची कोण दुर्दशा झाली ! एक वेळ कृपादृष्टि करून प्रभूंनीं वेळेवर वृष्टि केली कीं, जिकडे तिकडे कसा आनंद होतो ! तस्मात्‌ आपण वेडे, म्हणून व्यर्थ काळजी करतो. विश्वंभरावर भरंवसा ठेवून आपलें कर्तव्य मात्र आपण करावें, त्यापेक्षां कांहीं एक आपल्याकडे नाहीं.

## आपणच दुःखास कारण.

आतां दुःखास कारण कोण, तें आपल्यावर आलें कोठून ? हें पाहूं. तें

अवचित आपण होऊन आपल्यावर येऊन कोसळलें नाहीं, किंवा कोणी आणूनही झाडलें नाहीं. आपणच त्याच्या निम्या भागास ( सुखांत ) मोठा गौरव करून नवसायांनीं आमंत्रण करून मिनतवारीनें आणिलें. अर्थातच एका अर्धांबरोबर दुसरें अर्ध दुःख प्राप्त झालें. दुःखाचें सहचारी सुख, आणि सुखाचें सहचारी दुःख असा त्यांचा अन्योन्य आश्रय आहे. अंधास पाचारण केलें तर त्यास वागविणाराची सोय आधीं केलीच पाहिजे. जेवावयास पाहिजे, पण शिधा सामुग्री नको, असें म्हणून चालावयाचें नाहीं. नफा पाहिजे, पण तोटा नको असें म्हणून व्यापार होणार नाहीं. ज्यानें लग्नच केलें नाहीं त्याला भार्याविरह कधींच होत नाहीं. आमरणांत जाचणारा पुत्रशोकाचा शंकु त्याला स्वप्नांत सुद्धां लागणार नाहीं, विरहानळास किंवा पुत्रशोकास कारण लग्न, आणि लग्न तर आपलें आपणच केलें, तेव्हां आपल्या दुःखास कारण आपणच आहों.

## बाळपणचें सुख

मोठ्या आनंदांत असलेल्या संसारांतील माणसें सुद्धां बाळपणांत गेलेले दिवस मोठ्या आनंदांत गेले असें नेहमीं म्हणतात. खरें म्हटलें असतां बाळपणीं जगाचें ज्ञान नसतें. सुखोपभोगाच्या वस्तूंचें आणि सुखाचें मार्मिकज्ञान कांहींच नसतें. रसिकता किंवा प्रत्येक वस्तूंतील रुची आणि खुमास मुळींच माहीत नसतें. " सकल सुख सीमा सुवदना " म्हणण्याचें मर्म गांवींही नसतें. ह्या सर्व गोष्टींच्या सुखाच्या अनुभवाचा भर हंगाम, तारुण्य असून परमेश्वर कृपेनें बहुतेक सुखें अंशतः तरी भोगण्याची अनुकूलता असतां तारुण्यांतील माणसें बाळपणाच्याच सुखाचे पोवाडे कां गातात ? बाळपणीं वरील गोष्टी नव्हत्या खऱ्या, पण थोडें थोडकें कां होईना, जें सुख मिळत होतें, तें निर्मळ अप्रतिबंध आणि अनायासें मिळत होतें. तारुण्यांत सुखाचा सुकाळ झाला खरा, पण त्याला असलेल्या अनेक मर्यादा कळूं लागल्या, त्या सुखांचा केव्हां अंत होइल ह्याचा भरंवसा नाहीं; ही भीति मनांत घोळूं लागली, तीं सुखें मिळविण्याकरितां नानाविध कष्ट करावे लागूं लागले, व्यवधानें संभाळावीं लागूं लागलीं, धोरणें ठेवावीं लागूं लागलीं, दुसऱ्याचे आर्जव करावे लागूं लागले, धाक बाळगावा लागूं लागला, यामुळें तीं सुखें विपूल खरीं, तरी त्यांच्या मानानें त्यांच्या बरोबर चोरून लपून दुःखेंही असतात म्हणून निर्मळ सुख नाहीं. यामुळें सहचारी दुःखाचा एखादा झटका

बसला म्हणजे बाळपणच्या स्वच्छंदी, निर्मळ आणि विनमोबदल्याच्या सुखाचें स्मरण होतें.

## हौसी स्त्रीचा थाट.

एखाद्या धनकनकसंपन्न भाग्यशाली खुशाल चेंडूची पूर्ण हव्यासी, हौसी, रसिक व चतुर दिव्य ललना नखशिखांत वस्त्रेंभूषणें आणि टाकटिकले ह्यांनीं विराजित होऊन आरशांत पहाते; तेव्हां तिला वाटतें, कीं धन्य या जगीं मी. मजसारखी सुखी कोणी नाहीं. आहाहा! ही बाराशें रुपयांची दुमजली दुरंगी पैठणी मला किती नामी दिसते आहे, ही शिकारखानी कांठाच्या बुट्यांच्या किनखापाची चोळी काय तरी मजेची आहे! माझ्या अंगांत कशी अगदीं भिनून गेल्यासारखी बसली आहे! माझा एकेक दागिना केवढा मोलवान किंतीतरी कौशल्यानें तयार केलेला आहे! पर्वांच्या प्रदर्शनांत ह्यांच्या जोडीला कोणाचेही दागिने लागले नाहींत. ही लांबरुंद भरगच्ची शालजोडी मला किती नामी शोभते, आणि ह्या सर्वांस माझ्या अप्रतिम लावण्यानें केवढी शोभा आली आहे! जातां मी रस्त्यानें चाललें कीं नाहीं, म्हणजे अलम दुनिया मजकडे टकमक पाहत राहील! आणि स्वर्गलोकाकडून रंभा किंवा उर्वशी ह्या भूतलावरील वसंतविलास आणि उत्साह पाहण्यास उतरली आहे काय? अशी भ्रांति सर्वांस होईल. माझ्या थाटाचा आणि सुखाचा हेवा राजा रजवाड्यांच्या राण्यासुद्धां करूं लागतील, असें मनांत म्हणत ती चटक चांदणी भर उन्हाळ्यांत ऐन दोन प्रहरीं त्या भूषणभाराचें, पैठणीचें, आणि शालेचें ओझें घेऊन एखाद्या लग्नमंडपांत मोठ्या गर्दीत नाच पाहत बसते, जातांना झालेल्या उन्हाचा ताप, मंडपांतील लखलखाट, वायूचा प्रवेश न होईल अशी मंडपाची रचना आणि माणसांची गर्दी यामुळें परमावधीचा उकाडा होऊन ती बिचारी उकडून निघते. एकदां येथून केव्हां सुटेन असें तिला होऊन जातें, आपल्या महालांत जाऊन सगळा जोजार काढून टाकून मोकळे होण्याविषयीं उतावीळ झालेली असते. ती त्या समारंभांतून मोकळी होऊन घरीं येते. तेव्हां लहर्के लेंकरूं किंवा यजमान जवळ आले तर त्यांस सुद्धां जरा थांबा दूरच असा असें म्हणून बारीक पातळ नेसून हुश्श हुश्श करीत पंख्यानें वारा घेत बसते, आणि म्हणते कीं, कोण मेली पिडा ही, मला मेलें, असें झालें कीं, आतां जीव

जातो, पण चौघांतून उठतां येईना. आतां मला किती तरी आनंद होत आहे! इतक्यांत दागिन्यांची मोजदाद करितां "तनमणी नाहीं" असें पाहून तिचें तन, मन थरथरां कांपूं लागतें, अगदीं गाळण होऊन जाते, तो गेला, अशी खातरी झाली म्हणजे पहावा तरी कोठें ? रस्त्यानें शेकडों माणसें आलीं गेलीं, मंडपांत हजारों माणसें जमलीं होतीं. कोणास विचारावें, मग काय विचारतां यजमान बरे असले तर दोन वाग्पुष्पें टाकून थोडी धुसफूस करतील म्हणजे आटोपलें. पण ते कां अविचारही आणि तिरशिंगराव असले म्हणजे चौदाव्या रत्नाशीं गाठ. जन्मभर आठवण विसरावयासच नको.

## सुख साधनांचा दुर्विपाक.

ह्या बाईला जी पैठणी आणि शाळजोडी सोन्याची पूर्ण खाण वाटली, तीच तिला मारून टाकण्याइतकें दुःख देण्यास तयार म्हणजे कारण झाली. त्याच वस्त्रांनीं आणलेला घाम त्यांस पुसतां येईना, हरहर ! इतके पैसे खर्चून घेतलेलीं वस्त्रें तिची ताबेदार असावींत, पण तें एकीकडे राहून तिला त्यांचें दास्य पतकरावें लागलें. बरें सुख तरी व्हावें, तेंही न होतां प्राणांतिक त्रास झाला, ह्यापेक्षां स्वच्छ चांगलें गुलाबी लाली चढलेलें बारीक पातळ नेसती, आणि प्याजी रंगाचा चंदेरी शेला अंगावर घेऊन जाती तर घामच न येता आणि आलाच असतां, तर पुसण्यासही शंका न येती. दरएक वस्त्राभूषणाचाही प्रकार असाच. तो कोठवर वर्णावा ! आपल्या देशापेक्षांही अत्यंत प्रिय अशा देहाला हीं सर्व वस्त्रेंभूषणें संपादन करण्याकरितां ह्या बिचारीला किती तरी श्रम करावयास लावावें लागलें असेल ! किती तरी बरीं वाईट कृत्यें करवून परलोकींचें दुःख भोगण्याची तयारी करावयास लावावें लागलें असेल ! बोलून चालून हा मृत्युलोक. तेव्हां अकालीं मृत्यूची झडप तिच्या आधारावर पडली असतां तिच्या व तिच्या परिवाराच्या पोषणास उपयोगी पडण्याचें साधन जोडण्यास उपयोगी पडला असता, तो पैसा अशा दांभिक बुद्धींत खर्चांत घालून बिचारीनें आपल्या विपत्तीचें साधन आपल्याच हातानें नाहीं कां करून ठेविलें ? इतकें होऊन प्राणांतिक त्रास तिला झाला ना ? दुःख तिला दुसरें कोणीं दिलें काय ? तिला प्रथम वाट-

लेलें सुख खरें होतें काय ? त्या सुखाच्या भ्रांतीस भुलून तिनेंच होऊन नसतें दुःख करून घेतलें कीं नाहीं ? तनमण्याची हानि आणि शिक्षा ह्यांस मूळ तरी ती सुखाची भ्रांतीच कीं नाहीं ?

## त्या स्त्रीच्या स्थितीशीं संसाराची तुलना.

हाच दाखला संसारसुखाला लावून पहा. बाळपणीं माणूस किती सुखी असतें, त्या वेळीं कशाचीही काळजी नसते; पोटाला मिळालें म्हणजे दिन-दुनिया ठाऊक नाहीं. पोटाला तरी घालणार घालतात. जरा कमी पडलें कीं, रडून मांडून घेतलें कीं मोकळें. जसजसें माणूस मोठें होतें, तसतसा त्याच्यामागें लकडा लागूं लागतो, पुढें सर्व सुखाचें साधन म्हणून कलत्राचें लोढणें त्याच्या गळयांत अडकावून देतात; एक कलत्र झालें कीं, सर्व साधनांच्या मागें मनुष्य लागलेंच. होतां होतां वरच्या स्त्रीप्रमाणें ह्याची अवस्था होते. जसजशीं सुखाचीं साधनें वाढत जातात, तसतसा आनंद होत जातो, आणि मजसारखा धन्य मीच, असें त्यास वाटूं लागतें. जसजसा व्याप वाढत जातो, तसउसा ताप वाढूं लागतो; तो मात्र त्याच्या ध्यानांत लवकर येत नाहीं, होतां होतां त्या विचारीला ज्याप्रमाणें गुदमरून मरण्याची पाळी आल्यासारखें वाटलें त्या-प्रमाणें ह्याच्यावर चोहोंकडून प्रपंचांतील अडचणी, पैशाची टंचाई, मुला लेंकरांचीं दुखणीं, त्यांचे अभ्यास, निर्वाहाच्या पुढील सोयी, त्यांजकडून घडलेलीं दुष्कृत्यें, वाढलेल्या परिवारांतून एखादा माणसाच्या हातून जगांत तोंड दाखवूं नये असें होऊन जाणारें घडलेलें दुष्कृत्य, पूर्वीच्या वाढलेल्या लौकिकामुळें कार्यं प्रयोजनें त्यांचे वाढलेले अवाढव्य खर्च, तशींच कार्यें दरसाल "ओ" म्हणून उभीं राहिलेलीं, त्यांचे तगादे घणापेक्षां दुःसह असें ऋणाचे घाव, अशा शेंकडों व्यापा चोहोंकडून लागून वणव्यांत सांपडलेल्या हरणाप्रमाणें त्याची अवस्था होते दुरून पहाणारास ह्याचा संसार कवंडलाप्रमाणें मनोहर दिसतो. पण खरा प्रकार "अंदरकी बात राम जाने" असा असतो. "परमेश्वरा, या यमयातनांतून आणि नरकवासांतून एकदां अजून डोळे झांक" असें तो म्हणत असतो.

## उपायच अपाय.

त्या चटकचांदणीला, गुदमरून मरते कीं काय असें वाटलें. तेव्हां

तिला झालेला ताप थोडा वेळ टिकण्याचा होता, व कशानें झाला हें तिला ठाऊक होतें, आणि तो दूर करण्याचे तिच्या स्वाधीन होतें; पण संसारिकाचें तसें तरी कोठें आहे ? आधिभौतिक, आधिदैविक, अध्यात्मिक, असे मुख्य तीन आणि त्यांच्यांतील अनंत पोटभेद, असे ताप त्याला पापडाप्रमाणें उलथा पालथा करून दुःखांगारकावर माजीत असतात. त्या स्त्रीचा एक तनमणी मात्र हरवला; पण संसारिकाला अनेक वेळां आपले सोन्यारुप्याचे, हिऱ्यामोत्यांचे दागिने आपल्याच हातानें बोळवावे लागतात. त्यांची काय बिशाद, पुत्र, कलत्र, आप्तस्वकीय, इष्टमित्र असे एकदां गेले कीं, पुनः दृष्टीस न पडणारे दागिने वारंवार जाऊन त्याला चोहों प्रकारें पिळून टाकून जन्मभर जळावेगळ्या माशाप्रमाणें तळमळ तळमळ करून मरावयास लावतात; तरी पण त्याच्या लक्षांत येत नाहीं; आणि आलें तरी हे सर्व ताप सुखाकरतांच आहेत अशा समजुतीनें त्यांपासून सुटका व्हावी, असें त्यास वाटत नाहीं. यामुळें ते ताप दूर करण्याचा यत्न तो अशा प्रकारें करतो कीं, त्यांच्यायोगानें ते ताप वाढण्यास मात्र कारण होतें, पहिली आग ( बायको ) प्राप्त झाल्यापासून तिच्या कचाट्यांतून सुटेपर्यंत अनेक दुःखें, संकटें, हाल, अपेष्टा, अपमान आणि दुर्दशा झालेली असते; तरी ती गेल्यावर पाश तुटला, बरें झालें, असें समाधान न पावतां मोहजालांत गुरफटलेला नवरा एखाद्या बायकोप्रमाणें ढळढळा रडूं लागतो आणि झालेल्या दुर्दशेनें आणि खुषींतल्या लाथांनीं पुरती कणीक मऊ न झाल्यामुळें, उतारवय झाल्यावरही तारुण्यानें मुसमुसलेला दुसरा संबंध मोठ्या सायासानें जोडून, मशालजी बनतो, आणि ती करदीपिका ( बायको ) नव्या तरण्याबांडांपुढें नाचवून तिच्या तारुण्यज्वालेनें आपल्या आधींच जीर्ण झालेल्या दाढीमिशा जाळून घेऊन तारुण्यज्वालोत्पन्न दुर्लौकिकाच्या काळजीनें आपलें तोंड काळें करून घेतो !

## पुनरावृत्ति.

लेंक, लेंकी, नातवंडें, पंतवंडें होऊन पूर्वकर्मप्रकोपानें एकाएकीं घाला पडून वंशच्छेद झाला, तर " झालें तें झालें, दिलें तें मिळालें. पेरलें तें उगवलें. आतां बस्स. आहे तेवढें सत्कार्यीं लावून देहाचें सार्थक करण्यांत तरी आयुष्य

घालवूं. " असें मनांत न आणतां पुत्रद्वारें स्वर्गप्राप्तीची वेडी आशा करून मातीचे कुळें लावण्याचा खटाटोप करितात! जणों दत्तक अमरपट्टाच घेऊन आला आहे! संसारांत पूर्वी मिळालेलें शालजोडीतले + + + यांनीं संतोष झाला नाहीं; म्हणून ही पुनरावृत्ति! कां दुःखविमोचनाचा हा खासा मार्ग आहे कीं नाहीं! पहिल्यापेक्षां शतपट दुःख न होईल तर तें विमोचन कशाचें?

## चिखलांत फसलेली गाय.

तात्पर्य, दुर्गंधींतील किड्यांस दुर्गंधीचा वीट कधीं आला आहे काय? अट्टल दारूबाज दुसऱ्यादुसऱ्या दिवस जगतो कीं मरतो अशा स्थितींत येतो, तरी पुन्हां " पीत्वा पीत्वा पुनः पीत्वा यावत्पतति भूतले " असें करून त्यांतच आनंद मानतो! तद्वत् संसारिकाची स्थिति होते. अनंत पूर्वजन्मांतील सुकृतानें " मनुष्याणां सहस्रेषु " या भगवदुक्तीप्रमाणें हजारांत एखाद्यास मात्र तो ताप कळून मंडपांतून निघाल्यावर त्या सुंदरीच्या झालेल्या स्थितीप्रमाणें त्याची अवस्था होते आणि आपल्यास ताप होण्यास कारण संसारसंग झाला असें वाटूं लागतें; पण वाटेंत जसें तिला तापांतून मुक्त होतां आलें नाहीं त्याप्रमाणें त्यास प्रपंचांतून लागलेंच सुटतां येत नाहीं. त्याची अवस्था चिखलांत रुतलेल्या गायीप्रमाणें किंवा चिकट पदार्थांस घुटमळलेल्या माशीप्रमाणें होते. संसारांतून निघण्यास एक पाय वर काढूं लागतांच दुसरा पाय जास्ती खोल जातो! दुसरा पाय काढूं लागतांच पहिला पाय खालीं जातो; असा तो मोठ्या विवंचनेंत मग्न होतो.

## संग भुजंग.

अशा स्थितीस पोंचलेला गृहस्थ मात्र आपल्या दुःखाचें मूळ शोधूं लागतो. बाकीचे लोक दुःखालाच सुख मानून त्या यातना जन्म जन्मांतरीं सोसून ' पुनरपि जननं पुनरपि मरणं ' या रहाट गाडग्यांत चौऱ्यांशीं लक्ष योनींत फेरे घेत आहेत. शोध लागलेल्या गृहस्थास मग असें दिसून येतें कीं, दुःखाचें कारण केवळ संग होय. जसजसा संग वाढत गेला तसतसा दुःखास आणि काळजीस पूर आला. परंपरागत अंधळी समजूत अशी आहे, कीं संग हें सुखाचें मूळ आहे. हीच समजूत सर्वस्वी घातक आहे. जेथें संग म्हणजे

योग झाला, तेथें वियोग हा व्हावयाचाच. दोहोंतून एक आधीं गेलेच पाहिजे सुखाची इच्छा केल्याबरोबरच दुःखास विसार पटतो; पण तें लक्षांत येत नाहीं; दुःखाचें मूळ उपटून टाकावयाचें असेल तर संगाचें मूळ उपटून टाकलें पाहिजे; हें प्रकट गुह्य आहे. वसिष्टांनीं संगाला भुजंग म्हटलें आहे. आम्ही तर आपल्या अंगावर एकच नव्हे अनंत भुजंग घेऊन ते सदोदित वागवीत आहों ! एका सर्पाला चुकून धक्का लागला पुरे कीं तो बारा वर्षें द्वेश धरून घात केल्यावांचून राहत नाहीं. अनंत भुजंग सर्वकाळ धारण करून सुखाची इच्छा करणारास वसिष्टांनीं प्रत्यक्ष लंबकर्ण म्हटलें आहे तें काय खोटें आहे ?

## संगाचें मूळ वासना.

संगाचें मूळ पाहूं गेल्यास देह सुद्धां संगच आहे, देहाच्या पलीकडला लिंग-देहही संगच आहे. तो प्राप्त वासनेनें झाला तस्मात् वासना ही संघाचें मूळ होय. संगाचें मूळ तेंच दुःखाचें मूळ. मनुष्य जन्मास आल्याबरोबरच दुःखास आरंभ होतो, म्हणून मूल उपजल्याबरोबरच आक्रोश करते; त्यापूर्वीं गर्भवासाचें भयंकर दुःख होतें तें गरोदर स्त्रीच्या स्थितिरीतीवरून अनुमानानें ताडितां येतें. तस्मात् " वासनेच्या संगें नको गुंतू मना " हा श्री तुकाराम महाराजांचा उपदेश पक्का घेऊन " संगंत्यक्त्वा सुखी भव ,, हा आशीर्वाद ग्रहण करावा, म्हणजे दुःख विमोचन होईल.

---

# भाग २०.

## वेदनांची बाधा कोणास.

### श्लोक.

अनाद्य विद्या संबंधात् तत्कार्याहं कृते स्तथा
संसारो पार्थ कोपिस्याद्रागद्वेषादि संकुलाः ( यो. वा. )

### भास देहास.

मायाजाल, विषय, शरीर आणि जग हें सगळें आरुढ मिथ्या, पण सुखदुः

त्मक वेदना भासतात, ह्यांत कांहीं संशय नाहीं. तस्मात् त्या कोणास कशामुळें भासतात ? ह्याचा विचार करूं. देह प्रारब्धानुसार देहास भोग होतात, हा जगन्मान्य सिद्धांत आहे. " पापाचें संचित देहाशीं दंडणा " हें सत्पुरुषाचें वाक्य आहे. कोणाच्या देहास राजभोग, तर कोणाच्या देहास अत्यंतिक कष्ट होतांना आपण हमेष पाहतों; तेव्हां वेदनाचा भास शरीरास होतो, हें प्रकट-गुह्यच ठरल्याप्रमाणें बहुधा सर्वांस वाटतें. पण विचाराच्या कसोटीस तें लागत नाहीं. प्राणादिकांपासून पृथक् समजून त्याचा विचार केला असतां देह म्हणजे अस्थिमांसादिक जड पदार्थांचा गोळा होय. त्याच्या अंगीं वेदना समजण्याचा धर्म असणार कोठून ? प्राणाचा वियोग होतांच तो काष्टवत होतो, मग हुं कां चूं सुद्धां करण्याचा धर्म त्याच्यांत राहत नाहीं. अग्निपूत किंवा भूगत होऊन किंवा अन्य कोणच्या तरी मार्गानें बाकीच्या तत्वांपासून निराळा होऊन ज्याच्यापासून तो मुख्यत्वेंकरून बनला त्या तत्वांत अंतरभूत होऊन जातो. हा आपला नित्य प्रत्यय आहे. वर सांगितलेला सिद्धांत व सत्पुरुषाचें वाक्य ह्यास वरील विवेचनावरून हरताळ लागतो असें नाहीं. तीं विधानें प्राणयुक्त शरिरासंबंधानें स्थूल दृष्टीनें केलेलीं आहेत. सारांश, देह त्या वेदनांचा ज्ञाता किंवा भोक्ता नाहीं.

## इंद्रियांस भास.

प्राणयुक्त देहाचा विचार केला तरी वायूनें बेशुद्ध असतां कुरवाळिलें, किंवा चिमटा घेतला, अथवा कापिलें, तरी सुद्धां वेदना होत नाहींत. शरीर प्राणयुक्त असतां कसा प्रकार होतो त्याचा थोडा जास्त विचार करूं. शरीर म्हणजे इंद्रियग्राम होय. ह्यापैकीं कर्मेंद्रियें तर बोलून चालून अंतकालपर्यंत श्रम मात्र करण्याचीं मालक. त्यांच्या भाग्यांत वेदनांचें ज्ञान कोठलें ? प्रभूंनीं त्यांच्या ठिकाणीं असा विलक्षण धर्म ठेविला आहे कीं, तीं काम करीत राहतील तरच त्यांच्या आंगीं बळ, तरतरी, उत्साह व पुष्टता राहील. त्यांनीं कामाचा कंटाळा केला कीं पुरे, तीं दुर्बळ, फोपशीं, कंटाळलेलीं आणि निरुपयोगी व्हावयाचीं. ह्यावरून त्यांनीं नुसतें कामच करीत राहावें, असाच ईश्वरी संकेत व्यक्त होतो. विश्रांतीपासून त्यांस सुख होतें असें वाटेल पण तसें नाहीं. त्यांस कामास लावण्याचा किंवा न लावण्याचा अधिकार निराळ्याच तत्वाकडे आहे.

यंत्रें, वाद्यें वगैरे आपल्या मर्जीप्रमाणें चालविण्याचें, व कंटाळा आला असतां बंद करून ठेवण्याचें जसें त्याच्या मालकाकडे असतें, त्याप्रमाणेंच कर्मेंद्रियांस कामास लावणारें, व न लावतां विश्रांतिसुख घेणारें तत्व निराळेंच आहे. ज्ञानेंद्रियांचा अधिकार कर्मेंद्रियापेक्षां श्रेष्ठतर आहेच. त्यांस वेदनांचें ज्ञान होतें, पण वेदनांच्या पूर्ण भोगाचें स्वामित्व त्यांजकडे नाहीं. बाजारांत पाठविलेला मनुष्य परिक्षेकरितां वाद्य वाजवून पाहतो. वस्त्राचा मऊपणा समजण्याकरितां हात लावून पाहतो. पदार्थांचा घाट बरोबर आहे कीं नाहीं हें निरखून पाहतो, फळें चाखून पाहतो. अत्तरें हुंगून पाहतो, तेव्हां त्यास त्या त्या विषयांचें ज्ञान होतें, परतु त्याचा पूर्ण उपभोग त्यास कोठून होणार ? ती सत्ता व तें भाग्य निराळेंच असतें. त्याप्रमाणें ज्ञानेंद्रियें वेदनांचें परीक्षण मात्र करून त्या वेदना मालकाकडे पावत्या करणारीं साधनें मात्र होत. त्यांस मोक्षीं म्हणणें म्हणजे तरवारीनें राज्य घेतलें म्हणण्याप्रमाणेंच आहे, तीं विचारी जड त्यांचे ढीगचेढीग घालून ठेविले. म्हणून शत्रु मरेल काय ? तोच ते ढीग लुटून नेऊन घालणाराचें कोठांत फाडीक; पण तीच भवानी छत्रपतींच्या हातांत खेळूं लागतांच महत्कार्य घडलें. तेव्हां तरवार राज्य घेण्याचें साधन होऊन राज्य छत्रपतींनीं घेतलें असें म्हटलें पाहिजे. त्याप्रमाणें वेदना प्रविष्ट करण्यास इंद्रियें फक्त साधन होत. देहपतनानंतर इंद्रियें नसतात असें नाहीं. द्वारें कायमच असतात, झोंपेंत डोळे मात्र मिटून बाकीचीं इंद्रियें मोकळीं असतात, पण त्यांचें धर्म सुषुप्तींत लय पावलेले असतात, म्हणून त्यांस वेदना कळत नाहींत. इंद्रियास वेदना कळण्यास ते धर्म जागृत असावे लागतात, जागेपणीं सुद्धां नैसर्गिक धर्म बधिर झाला असतां इंद्रियांस वेदना कळत नाहींत; त्यापेक्षां वेदनांचें स्वतंत्रपणें ज्ञातृत्व इंद्रियाकडे नाहीं ज्ञातृत्वच नाहीं मग मालकी नाहीं, हें निराळें काय सांगावयाचें आहे ?

## वासाचे मालक प्राण.

देहाचा प्रकार हा झाला. नुसता देह वेदना-ज्ञानक्षम सुद्धां नाहीं. प्राणांच्या संगतीनें जागृतींत त्यांस वेदनांचा थोडा भास होतो, त्यापेक्षां प्राण तरी वेदनांचे मालक आहेत काय ? पाहूं. प्राण प्राण म्हणजे दुसरें कांहीं नाहीं; वायु

होत. प्राण, अपान, व्यान, उदान आणि समान असे पांच प्रकार स्थानपरत्वें मानले आहेत, वस्तुतः एकच वायु आहे. वायु हें केवळ तत्व आहे, त्यास वेदनांचें ज्ञान असण्याचा मुळींच संभव नाहीं. तो आपल्या नैसर्गिक धर्मांप्रमाणें संचार करणारा आहे. मरण म्हणजे प्राण गेला म्हणतात, त्याचा अर्थ इतकाच कीं स्थानास्थानाच्या ठिकाणीं ज्याप्रमाणें वायूचा वास असण्याचा क्रम आहे, त्याप्रमाणें राहण्याचें त्यानें सोडलें. तसें तो सोडतो तरी शरिरांत तो मुळीं वास करीत नाहीं, असें नाहीं. त्याच्या वासाखेरीज कांहींच नाहीं. हवेच्यारूपानें तो सर्वांस व्यापून आहे, त्याप्रमाणें मृत शरीर व्यापून असतोच; मात्र ज्याप्रकारें असावयास पाहिजे, त्याप्रकारें असत नाहीं.

## जीव भोगाचा अधिकारी.

ह्या दोहोंची वाट लागली; तर आतां वेदनांचा मासपावणारें तत्व सांपडणार तरी कोठें? आपली थोडी गैर समजूत झालेली आहे ती येथें दाखविली पाहिजे. प्राण आणि जीव ह्यांमध्यें असलेला भेद आपण लक्षांत ठेवीत नाहीं. प्राण म्हणजे काय तें वर सांगितलेंच आहे. आतां जीव म्हणजे काय हें सांगतों. कर्मेंद्रियाचें कर्तृत्व--धर्म, ज्ञानेंद्रियांचें ज्ञातृत्व—धर्म, पंचप्राण मन आणि बुद्धि अशा सत्रा कलांचा समुदाय धारण करणारे तत्व त्यास जीव ही संज्ञा आहे. प्राण जीवाचा अंशमात्र आहे. शरीर किंवा प्राण ह्यांजकडे भोक्तृत्व नाहीं, त्यापेक्षां भोक्त्याचा पत्ता जिवांत कोठें तरी शोधिला पाहिजे, शरीर व प्राण ह्यांजबरोबर पंधरा कलांचा निकाल लागला; तेव्हां मन व बुद्धि हे द्वय मात्र आतां राहिलें.

## मनाचा अधिकार.

यांत अत्यंत चंचल, उपव्यापी, हव्यासी मन होय. मन शुद्धीवर नसलें म्हणजे दुःख कळत नाहीं, श्रमाचीं कामें करितांना श्रम वाटूं नयेत म्हणून " भलर दादा " वगैरे गाणीं काम करीत म्हणतात. बाया दळतांना ओंव्या म्हणतात. हें तर मनाच्या भोक्तेपणाचें प्रत्यक्ष प्रमाणच आहे असें वाटतें, पण दुर्गंधीची पीडा होऊं नये म्हणून नाक दाबून धरणें किंवा अप्रिय शब्द ऐकूं येऊं नये म्हणून कानांत बोटें घालणें, त्यासारखेंच शुद्ध नाहींशी करणें

किंवा शुद्ध जाणें अथवा " मलेरे दादा !" म्हणून किंवा ओव्या म्हणून श्रम न कळूं देणें होय. तेवढ्यावरून भोक्तृत्व मनाकडे येत नाहीं. झोंप लागली म्हणजे मन म्लान होतें, असें असतां स्वप्नांत सुखदुःखें होतात, तीं कोणास भासतात ? स्वप्नही मनालाच होतें असें म्हणावें तर मनाला पक्क्या माहीत असणाऱ्या गोष्टी विरुद्ध व्यापार स्वप्नांत घडतो. आपल्याला पक्षांप्रमाणें उडतां येत नाहीं हें मनाला ठाऊक असून आपण आधांत्री वर चाललों आहों असें स्वप्नांत दिसतें, ज्याचें मरण त्यास कधीं दिसण्याचा संभव नसतां स्वप्नांत दिसतें. जीं कर्मे जीव गेला तरी करवणार नाहींत, तीं केल्याचा स्वप्नांत भास होतो. जागृतींत शुद्धीवर असतांही ज्वर आला म्हणजे साखरही कडू वाटू लागते. तोच ज्वर प्रक्षुब्ध होऊन भयंकर झाला म्हणजे केव्हां केव्हां सगळें गोड लागू लागतें. सर्पदंश झाला असतां मिरच्या गुळाप्रमाणें गोड लागू लागतात. मन हें तरी सहावें ज्ञानेंद्रिय आहे अर्थात् तें उपकरण आहे. इतर इंद्रियें भोगाची मालक ज्या कारणावरून नाहींत असें सांगितलें तीं सर्व मनासही लागू आहेत, मनाचा धर्म मनन करण्याचा आहे, निश्चय करून सिद्धांत ठरविण्याचा अधिकार निराळ्या तत्वाचा आहे, तेव्हां मनाकडे ज्ञातृत्व भोक्तृत्व येत नाहीं. कारण काय तें ठरल्यावाचून ज्ञान होणार कोठून ? कोणी कोणी चित्त व अहंकार ह्या आणखी दोन जीवाच्या कला मानितात, चित्त हें मनाचेंच स्वरूप, मनाचा धर्म मनन करण्याचा तसा चित्ताचा धर्म चिंतन करण्याचा आहे, तें चिंतन करून अभिप्राय तयार करून मुख्य तत्वास मंत्र्याप्रमाणें सुचवितें. इंद्रियसंघ प्राण व मन, इतक्या गोष्टी कायम असतांही शुद्ध नाहींशी होते, तेव्हां वेदनांचें ज्ञान होत नाहीं. वेळेस जागृति असते, पण शुद्ध असूनही वेदनांचें यथार्थ ज्ञान न होतां विपरीत भास होतो. जिव्हेस गोड पदार्थ कडू लागू लागतात. डोळ्यास सगळें पिवळेंच दिसूं लागतें, रसनेस सगळेंच गोड किंवा कडू लागू लागतें, कानांत घणघणाट सुरू होतो, नाकास सगळ्याच पदार्थांची घाण येऊं लागते, त्वचेस मऊ गाद्या गिरद्या रुतूं लागतात, मनास भलताच भ्रम उत्पन्न होतो. अवयवाचे नैसर्गिक धर्म गलित झाले असतां त्या त्या अवयवास व्हावयाचें ज्ञान होत नाहीं, असे प्रकार ज्यापेक्षां होतात, त्यापेक्षां वर इंद्रियसंघादिक लिहिलेल्या गोष्टी स्वतंत्र नसून कोणाच्या तरी तंत्रानें चाल-

णाऱ्या आहेत हें उघड झालें. तस्मात् त्यांस मालक कसें म्हणावें ? ज्या तत्वांच्या तंत्रानें वरील गोष्टींस चालावें लागतें. तेंच तत्व श्रेष्ठतम अतएव ज्ञातृत्व व भोक्तृत्व ह्यांचे मालक हें उघड ठरलें.

## प्रकृति भोगाची मालक.

प्रकृतीला विकृति झाल्यानें वरील प्रकार होतात, हें अनुभवसिद्धच आहे. तस्मात् वेदनांची अधिकारी तीच होय. प्रकृतीच्या सूत्राप्रमाणेंच कर्मेंद्रियांचेंही कर्तृत्व कमजास्त होतें. अशी शंका येते कीं भोग शरीरास न होतां प्रकृतीस होतो असें म्हणावें, तर दुःखाच्या झपाट्याबरोबर शरीर फिकट पडून क्षीण होतें. सुखाच्या प्रवेशानें प्रफुल्लित होऊन पुष्ट होतें. असा अनुभव आहे. त्याचें समाधान असें आहे कीं, हजारों किंवा लाखो फौज मरून जाते, पण मुलूख राजाला मिळतो, किंवा मुलूख राजाचा जातो. राजापाशीं छत्रपती नसून खजिनदाराजवळ कोट्यनुकोटी रुपये असतात. पण खजिन्यांतला एक पैसा कमी आला तर काळें तोंड खजिनदारास करावें लागतें. पाहिजे तेवढा द्रव्य खर्चीं घालण्याचा अधिकार राजाचा. लाखों रुपयांचीं वस्त्रभरणें आणि अलंकार जामदाराच्या ताब्यांत असतात; पण त्यांतून एखाद्यास धक्का लागला किंवा डाग पडला, तर गाल चोळण्याचा प्रसंग जामदारास येतो. पाहिजे ती शाल पाहिजे त्या सत्पात्रीं किंवा कुपात्रीं देण्याची सत्ता राजाची. मध आणणाऱ्या नोकरास माशा चावणार, मध राजास. ह्यावरून काय सिद्ध झालें ? प्रत्यक्ष पदार्थ बाळगणारा भारवाहक, व सत्ता करणारा मालक तद्वत् प्रत्यक्ष भोग सेवन करणारे शरीर भारवाहक, आणि सत्ता प्रकृतीची. फौजेचा मृत्यु, काळें तोंड होणें, गाल चोळीत बसणें आणि माशांचा दंश यांचे मालक सेवक आणि भोगाच्या सत्तेचा मालक राजा. त्याप्रमाणें अनकूल प्रतिकूल वेदनांची मालकीण प्रकृति आणि भांडें पोंचावितांना होणाऱ्या बऱ्या वाईट परिणामाचें मालक शरीर.

## भोगाची मालक प्रकृति हेंच कायम.

अमूर्त आणि मूर्त पदार्थ मिळून सृष्टरचना आहे. दृश्य विस्तार सगळा मूर्त आहे. पण तो अमूर्त तत्वांच्या प्रबोधार्थ झाला आहे. ब्रह्म अमूर्त,

ब्रह्मांड मूर्त, भाषा अमूर्त पण लिपी मूर्त, तसेंच षड्स अमूर्त, पण त्यांचा प्रबोध करणारे अनंत पदार्थ मूर्त, साखरेनें गोडीचा बोध झाला, पण दृश्य भुकटी गोडी नव्हे, ती गोडीनें युक्त म्हणजे गोड मात्र आहे. ती सेवन केल्यानें अमूर्त गोडी प्रकृतीकडे जाते; म्हणजे अनुकूल वेदना प्रकृतीस होते, आणि जंत किंवा इष्टानिष्ट परिणाम जडाचे जडावर म्हणजे भुकटीचे शरीरावर होतात. विष घेतलें असतां कटुता प्रकृतीला आणि पतन शरीराला. सारांश अमूर्त प्रकृतीकडे अमूर्त वेदना जातात. मूर्त शरिरावर मूर्त जड पदार्थांचे परिणाम होतात. मूर्त पदार्थांचे शरीरावर परिणाम होतांना सुद्धां आणखी वेदना होतात. त्या पुन्हां प्रकृतीकडेच जातात. विष घेतल्याबरोबर कटुता प्रकृतीकडे गेली. त्याप्रमाणेंच त्या विषाचा परिणाम शरीरावर घडूं लागल्यावर ज्या यातना होऊं लागल्या त्या प्रतिकूल वेदना पुन्हां प्रकृतीकडेच गेल्या. तात्पर्य सुखदुःख भोक्तृत्व प्रकृतीकडे हा सिद्धांत कायमच राहतो.

## चिंता.

" सजीव दाहते चिंता " हा अनुभव असून चिंता मूर्त नाहीं, असें असतां शरीरावर चिंतेचा परिणाम कां होतो ? शरीराची चालक प्रकृति आहे. प्रकृतीवर इष्ट किंवा अनिष्ट परिणाम झाला कीं त्याची बाधा शरीरास व्हावयाचीच. यंत्राची गति कमी झाली, कीं शकटिका-पंक्ति मंद चालावयाचीच. आणखी प्रमाण पाहिजे असेल तर असें पहा, कीं भ्रमित प्रकृतीच्या मनुष्यास किंवा ज्ञानसंपन्न मनुष्यास काळजी शिवत नाहीं. काळजी असण्यासारखी परिस्थिति असली तरी शरिरावर परिणाम होत नाहीं. प्रकृतीवर काळजीचा परिणाम झाल्यावांचून शरिरास इजा होत नाहीं.

## बुद्धि मालकीण.

जीवाच्या कलांपैकीं कोणची कला श्रेष्ठतम आहे व वेदनाचें ज्ञातृत्व व भोक्तृत्व कोणच्या कलेकडे आहे हें आतां गुप्त राहिलेंच नाहीं. तावदानांतील अलंकाराप्रमाणें किंवा हस्तामलकाप्रमाणें ती कला आतां स्पष्ट दिसत आहे. सच्चिदानंदाच्या चिदंशाचाच अवतार किंवा प्रतिबिंब ही बुद्धीच होय. हिलाच

महत्तत्व किंवा ज्ञानकळा म्हणतात. अर्थात् जाणण्याचा धर्म हिच्यांत मात्र आहे. जाणीव जाणीव ती हीच. ज्ञानेंद्रियांच्या ठायीं हिचा वास जागृत असेपर्यंतच त्यांस त्यांच्या धर्मांप्रमाणें ज्ञान होतें. तिनें सोडिलें कीं, तींच इंद्रियें नुसतीं मोकें होतात. ब्रह्मांडाची घडामोड ही ज्ञानकला त्रिमूर्तींच्या ठायीं वास करून करते., आणि जीवाच्या ठायीं वास करून जीवसृष्टीची घडामोड करिते, सर्व खेळ हिचा आहे. जीवाच्या सर्व कलांस वागविणारी हीच आहे. मरणकालीं सर्व जीवकला संस्काररूपानें आपल्या ठिकाणीं सांठवून पुढल्या बिऱ्हाडीं जाते.

## अज्ञान व अहंकार.

परमेश्वराच्या ज्ञानकलेचा अंश अथवा अवतार ही ज्या प्रकृतीची योग्यता, तिला मिथ्या असलेल्या त्या वेदना हर्षामर्षानें भ्रमित कशामुळें करितात ह्याचा विचार आतां करूं. विश्वलीला अबाधित चालू राहण्याकरितां परमेश्वरानें अहंकार आणि अज्ञान हे दोन मळ हिच्यामध्यें ठेविले आहेत. ह्यापैकीं अहंकार ही एक जीवाची कलाच आहे, असेंही कोणी मानितात. अहंकाराच्या प्रेरणेनें मन वागतें; आणि अहंकार लोभाच्या आधीन होऊन वस्तूवर ममत्व स्थापन करितो. एखादी वस्तु रस्त्यांत पडलेली पाहिली असतां ज्याला तिचा लोभ उत्पन्न होतो तो ती उचलून आनंद मानितो, आणि सांपडला गेला म्हणजे राजदंड भोगून दुःखांत पडतो, व पापाबद्दल यमदंडासही पात्र होतो. ज्याला तिची पारख नसते त्याला ती खड्याप्रमाणें निरुपयोगी वाटून त्यास तिचा लोभ सुटत नाहीं. अर्थात् तिच्या ठिकाणीं ममत्व जडत नाहीं व अहंकारही वाढत नाहीं. जो तिला ओळखितो, ह्मणजे ती पाप ताप उत्पन्न करणारी, नाशवंत आणि अनर्थोत्पादक आहे असें जाणतो, ह्याचा लोभ किंवा अहंकार तिच्यावर बसत नाहीं; यामुळें त्या दोघांसही तिच्यापासून सुखदुःख होण्याचें कारणच उत्पन्न होत नाहीं. गांवांत शेंकडों लोक मरत असतात, लाखों रुपयांचें नुकसान होत असतें, पण त्यांच्याशीं ज्याचा कांहीं संबंध नसतो त्यांस त्या दुःखाचा झपाटा विव्हळ करीत नाहीं. सुस्वभावाच्या माणसास सहानुभूतीनें तितक्यापुरतें तरी वाईट वाटतें, पण विघ्नसंतोषास परदुःखाचीच

गंमत वाटते; पण त्याचीच एखादी क्षुल्लक वस्तु गेली तरी प्रतिकूल वेदनांचा गोंधळ होऊन जातो. यावरून वेदनांचें ज्ञातृत्व व मालकी अहंकाराकडे आल्यासारखी वाटते. पण अवयवांनीं आपले नैसर्गिक धर्म सोडले असतां त्यावरील आपलें ममत्व अहंकार सोडतो असें नाहीं, तथापि त्या अवयवास कुरवाळिलें असतां आनंद, किंवा चिमटा घेतला असतां दुःख वाटत नाहीं. यावरून वेदनांची मालकी त्याच्याकडे नाहीं. आहे असें मानिलें तरी तो बुद्धीचाच अंश आहे.

## मोठें कारण अज्ञान.

ज्ञानकलेस पीडा होण्यास अहंकाराचा मल ज्याप्रमाणें कारण आहे, त्याप्रमाणेंच अज्ञानही मोठेंच कारण आहे. प्रकृति ही भगन्माया होय. हिला विद्या आणि अविद्या अशा दोन अवस्था आहेत. सामान्य माणसांच्या ठायीं हिचा वास अविद्यावस्थेनें असतो. अविद्या म्हणजे अज्ञानान्वित प्रकृति ती अज्ञान भरांत अनुकूल प्रतिकूल वेदनांच्या अमलांत सांपडते, म्हणून त्या मिथ्या असतांनाही, रज्जु-सर्प न्यायानें तिला त्यांचे अनुकूल प्रतिकूल परिणाम, म्हणजे सुखदुःखें भासतात. ह्या गोष्टींचें प्रत्यक्ष प्रमाण हेंच पहा कीं, सुखदुःखें मिथ्या मानणारे जीवन्मुक्त ह्यांच्या ठिकाणीं मागें सांगितलेल्या सर्व गोष्टी वास करीत असतात; पण अज्ञान मात्र नष्ट झालेलें असतें, यामुळें त्यांस सुखदुःखाची वेदना होत नाहीं. प्रकृति विद्यावस्थेंत ह्यांच्यामध्यें वास करिते, म्हणून ज्ञानापुढें खोट्या गोष्टी तगत नाहींत.

## आत्मा अविकार.

ह्या बुद्धीस आधार आत्मा आहे, तेव्हां सर्व श्रेष्ठता त्याचीच आहे. म्हणून सुखदुःखाचें ज्ञातृत्व भोक्तृत्व त्याजकडे असावें असें वाटतें, पण तो अक्रीय अविकार आहे. विश्वाच्या सृष्टि-स्थिति-संहारास तो कारण आहे. तरी त्याच्या अक्रियत्वास बाध येत नाहीं. घरांतील दीपाच्या प्रकाशानें बरें वाईट सर्व व्यवहार चालतात पण त्यापासून घडणाऱ्या पुण्यपापाचा किंवा सुखदुःखाचा भोग त्या दीपास नाहीं. किंवा स्वर्ग अथवा अधःपात नाहीं. सर्व व्यवहारांस पाहणारा साक्षी मात्र तो. तद्वत सच्चिदानंद परमात्मा ह्याचा प्रकाश

आहे. त्याचा प्रकाश अविद्या मायेमध्यें असतो, त्याच्या योगानें प्राण्यांच्या सर्व लीला होतात. त्यांचा द्रष्टा मात्र तो आहे; त्यास सुखदुःखाचा किंवा पुण्यपापाचा विटाळ होत नाहीं. असे विकार त्याला होतील तर त्याला ज्ञान-रूप कोण म्हणेल ? अनंत काल सुखदुःखाचे सपाटे आणि पापापुण्यांच्य लाटा ह्यांत परिभ्रमण करून तो जशाचा तसा कसा राहता ? सारांश, बुद्धि-तत्वास अज्ञानतेमुळें वेदनांची पीडा होते.

## ज्ञानच पीडेचें कारण.

आतां मात्र कमाल झाली. एवढा वेळ केलेला ऊहापोह केवळ पिष्टपेषण-वत् झाला. विद्–जाणणें, आणि ज्ञ–जाणणें ह्या समानार्थी धातूंपासून वेदना व ज्ञान हे शब्द झाले. अर्थात् वेदना म्हणजे ज्ञानच. तें अज्ञानामुळें होतें म्हणणें केवळ असंबद्ध आहे. जी गोष्ट माहीत नाहीं म्हणजे जिचें ज्ञान नाहीं तिच्याविषयीं कल्पनाही मनाला शिवत नाहीं. मग इच्छा कोठून होणार. इच्छाच नाहीं तर प्राप्ति कोठली आणि प्राप्तीच नाहीं तर तिच्यामुळें वेदना होण्याचा संभव तरी कोठला. ती मिळाली नाहीं म्हणून तळमळ तरी कशाला उपजणार, आणि तळमळीच्या प्रतिकूल वेदना कशा होणार. तिचा योगच नाहीं मग वियोग तरी कोठून संभवणार? वियोग नाहीं तेव्हां अर्थातच वि-योगजन्य प्रतिकूल वेदनाही नाहींतच. मद्यमांसादिक अपवित्र पदार्थांची ज्यांच्या पवित्र जिव्हांस कधींच संगति घडलेली नसतें त्यांस ते पदार्थ कधीं तरी अनुकूल किंवा प्रतिकूल वेदना उत्पन्न करण्यास कारण होतात काय ? खेडेगांवांतील लोकांस उंची तंतुवाद्यें कधींच ठाऊक नसतात त्यांस तीं ऐक-ण्याची इच्छा कधीं तरी होण्याचा संभव आहे काय ? इत्यादि अनेक गोष्टींचा विचार केला म्हणजे अज्ञानामुळें बुद्धितत्वास वेदनाची पीडा होते हा सिद्धांत असंबद्ध ठरतो. इतकेंच नव्हे, पीडा ज्ञानामुळें होते असेंच दिसून येतें. पूर्वोक्त पवित्र जिव्हेच्या मनुष्यास दुःसंगतीची बाधा होऊन तो एकदां जरी मद्य-मांसादिक अपवित्र पदार्थांच्या भोंवऱ्यांत सांपडला तरी त्याला त्या पदार्थांपासून होणाऱ्या अनुकूल प्रतिकूल वेदनांच्या महापुरांत सांपडावें लागून पूर्वी वर्णन झाल्याप्रमाणें त्याची दुर्दशा होते. उपमन्यू बालक व अश्वत्थामा ह्यांस त्यांच्या

माता पाण्यास पीठ लावून दूध म्हणून पाजीत असत, त्यांतच तीं बालकें मग्न असत. पण खऱ्या दुधाची रुची त्यांच्या रसनांस कळल्यावर त्यांस तें मिथ्या दूध आवडेनासें झालें. ह्यावरून ज्ञान हेंच वेदनांच्या पीडेस कारण होतें असें प्रकट-गुह्य नव्हे काय? सुखदुःखाची बाधा पूर्ण ज्ञान्यास व अज्ञानास होत नाहीं असें पूर्वी म्हटलेंही आहेच. श्रीविदेही ह्याचें उदाहरण मागें आलें आहे. त्यावरून ते ज्ञानसंपन्न असल्याकारणानें सुखदुःखातीत होतें असें दिसून आलेंच आहे.

## अज्ञानच कारण.

वरील विवेचनावरून सगळी मसलत गळ्यांत येऊन अज्ञानामुळें वेदनांची पीडा बुद्धितत्वास होतें हा सिद्धांत परत घेण्याची पाळी आल्यासारखें वाटतें खरें, पण खरा प्रकार तसा नाहीं. तो सिद्धांत सत्यच आहे. "अनाभ्यासे विषं शास्त्रं" "कुसंतानापेक्षां निसंतान बरें" ह्या म्हणीप्रमाणें हा प्रकार आहे. असावें तर उत्तम असावें नाहीं तर अपुरें किंवा वाईट असण्यापेक्षां मुळीं नसलेलें फार चांगलें. अपुऱ्या ज्ञानानें अनर्थ होतात. गैर माहितगार वैद्यानें ऐकीव माहितीवरून एखाद्यास औषध दिलें असतां बोलाफुलास गांठ पडून एखादे वेळीं गुणही येतो, परंतु औषधाचा परिणाम विपरीत होऊं लागला असतां औषधाच्या अंमलाचा प्रतिकार करण्याचें त्यांस ज्ञान नसते यामुळें रोग्याचा घात होतो. वाफेचीं यंत्रें वगैरे चालविणारांचेंही याप्रमाणेंच आहे. तात्पर्य असावें तर पूर्ण ज्ञान असावें म्हणजे सुखदुःखात्मक वेदनांची पीडा होत नाहीं. किंवा एक मुळींच ज्ञान नसावें म्हणजे तरी पीडा होत नाहीं. मुळीं ज्ञानच नसलें तर त्या ठिकाणीं अज्ञान ह्मणण्याचें कारणच नाहीं. अ हा उपसर्ग ज्ञान ह्या शब्दाच्यामागें लागणारा आहे. ज्ञानालाच ठिकाण नसेल तर अ उपसर्ग लावावयाचा कोणास? जन्म झाला तरच मरणाचा संभव. नाहींतर मरणार कोण; तद्वत् ज्याला मुळींच माहिती ह्मणजे ज्ञान नाहीं त्याला पीडा होत नाहीं हें उघडच आहे. तस्मात् वेदनाची पीडा ज्या अज्ञानामुळें होते ह्मणून सिद्ध केलें आहे. तें मुळींच माहिती नसणारें अज्ञान नव्हे. असावें एक आणि वाटावें एक. अशा प्रकारचें जें विपरीत ज्ञान त्या अज्ञानामुळें पीडा

होते. ज्याला सर्पच माहीत नसतो त्याला सर्पांचेंही भय वाटावयाचें नाहीं, मग दोरी सर्पासारखी वाटून भय कोठून वाटणार ? पण ज्याला सर्प माहीत आहे किंवा सर्पाची कल्पना आहे त्याला सर्पाकार दोरी दिसली असतां भय वाटतें, ह्मणजे दोरीविषयीं जें विपरीत ज्ञान झालें तें मिथ्याभयास कारण झालें. ज्यानें सर्पाचे दांत पाडून किंवा मणिमंत्रौषधि यांच्या योगांनीं सर्प वश करून घेतलेला असतो. त्यालाही सर्पाचें भय वाटत नाहीं. तात्पर्य पूर्ण ज्ञानी किंवा मुळींच गैरमाहित म्हणजे निव्वळ अज्ञान ह्यास वेदनांची बाधा न होतां ते सुख दुःखातीत असतात. पण आधले मधले ह्मणजे विपरीत ज्ञानामुळें अज्ञान बनलेले मात्र वेदनाच्या भोंवऱ्यांत सांपडतात. विषय, मायाजाळ, मनाचें भ्रमण कनककामिनी ह्यांच्या जादू ह्यांचें मुळींच ज्ञान नसणारा वेडा किंवा हीं सर्व लचांडें मिथ्या ह्मणून ज्याची खातरी होऊन तदनुसार वृत्ति झालेली असते तो, हे दोघेही सुखदुःखवेदनातीत असतात पण वरील लचांडें खोटीं असतां खरीं मानून त्यांच्या भोंवऱ्यांत सांपडणारांस म्हणजे विपरित ज्ञानवानासपीडा त्या अज्ञानामुळें होते. अर्थात्च तसलें अज्ञान बुद्धिनत्वास पीडा होण्याचें कारण आहे.

## सगळें मुसळ केरांत.

हो ! हो ! वेदनाच्या ज्ञातृत्वाच्या व भोक्तृत्वाच्या मालकिणीचा आतां बरीक पक्का शोध लागला खरा. सगळा खेळ महामाया साहेबांचा आहे. सगळ्या ब्रम्हांडास ह्याच झुलवीत आहेत. अहो, पण सगळेंच मुसळ केरांत कसें गेलें ? पहा धन्य या कवटाळी मायेची। हिनें पाहतां पाहतां कीं हो आपल्या डोळ्यांत माती टाकून आपल्यास ठकविलें; आणि सर्व मालकी बळेंच बळकाविली !! एवढा सुद्धां विचार आपल्या मनांत येऊं नये काय ? कीं बुद्धि तरी अंतःकरणाचा अंश आहे. अंतःकरणच मुळीं इंद्रियाप्रमाणें करण म्हणजे साधन, तेव्हां ज्ञानेंद्रियें व मन हीं ज्या कारणानें ज्ञातृत्व भोक्तृत्वाची मालक नाहींत त्याचकारणानें बुद्धिही मालक नाहींच. प्रकृति तरी आहे कोणाची ? प्रकृति तर जीवाची आहे. जिवाची म्हटल्यावर हिला स्वतंत्रता राहिली कोठें ? हिला जिवाची राणी म्हणा किंवा त्याला भुलवून कलसुत्री। बाहुल्याप्रमाणें नाचवून

सर्व सत्ता भोगणारी किंवा कांहीं म्हणा, पण मालक तोच खरा, " बोवाजी बोवाजी " " सब कुई कहे, आवाजी ( माया ) कहेन कोय, पण बोवाजीके घरमें आवाजी कहे सो होय. " अशा प्रकारानें मायेचें श्रेष्ठत्व भासतें. बादशहाच्या पायापेक्षां बीबीसाहेबांचे पाय कोमल व सुरेख म्हणून बिरबलानें "ओ पांवसे ओ पाव अछे" असें दुटप्पी म्हटलें. वरील गुणाच्या दृष्टीनें बीबी-साहेबांचे पाय श्रेष्ठ खरे, पण योग्यतेच्या संबंधानें बादशहाचेच श्रेष्ठ; त्यांच्या-मुळें यांची प्रतिष्ठा. जीवाचा आधार आहे म्हणून माहामाया साहेबांच्या लीला. त्यानें का स्थूळ देहांतून जाण्याचा विचार केला कीं, बुद्धि राणी चतुरच ती! पतीच्या पूर्वींच निघून जाते. सारांश, बुद्धि ही जड असून बाकीच्या तत्वा-प्रमाणें किंवा कलाप्रमाणें तिच्याठायीं सुद्धां चिच्छाक्ति जीवाच्या योगानें आली आहे. ज्ञातृत्व, भोक्तृत्व याच्याच रूपेंनें तिला प्राप्त झालें आहे. पुरु-षानें हाडांची काडें करून मिळवावें किंवा त्यांच्या भाग्यानें त्यास मिळावें आणि सर्व उपभोग व सत्ता पत्नीनें करावी, हा प्रचारच आहे. त्याप्रमाणें जीवानें संपा-दून केलेल्या वेदनांचा उपभोग व मालकी प्रकृतिकडे आल्यासारखी ठीकच वाटली. आतां तर जीवाच्या सगळ्याच कलांचा निकाल लागला! तस्मात् ज्ञातृत्व भोक्तृत्वाला मालकच कोणी नाहीं कीं काय? परंतु तसें नव्हें, जीवाच्या कलांखेरीज जीव स्वतंत्र आहेच, तोच मालक होय.

## जीव आत्म्याचा चिदांश.

जीव जीव म्हणजे आत्म्याचा चिदांश. आत्मा अकर्ता अभोक्ता केवळ साक्षी मात्र असें नुकतेंच सिद्ध केलें असून पुन: त्याचा अंश (जीव) भोक्ता ठरविला हा काय लपंडाव? हा वकिली कावा दिसतो, जो पक्ष पतकरला तोच सजवून दाखवावयाचा कीं काय? वांग्याची एकदां कमालीची स्तुति करून त्याला छत्रां-कित म्हटलें, यजमानांनीं वाईट म्हणतांच पुन: त्याची कडेलोट फजिती करून त्याच छत्राची विपरीत योजना करून दाखविली! तसा हा बिरबली थाट आहे कीं काय? असें नाहीं कामाचें. खरें काय तेंच ठरविलें पाहिजे. दोन्ही प्रकार खरे आहेत, असें होणें संभवनीय तरी कसें ह्मणावें? असें मनात येतें.

## बाईलबुध्या जीव.

जीवाला विद्या व अविद्या अशा दोन ललना आहेत, वडील विद्या ही पवित्र, सुशील व सत्यदर्शक आहे, आणि धाकटी मोठी उलाढाली, अघटित घटना करून मनमोहन करणारी, अजब थाटमाटाची आणि नखरेबाज आहे. अशा दोन असल्यावर कलिरायाच्या विहारपरायण काळांत पतीचा ओढा कोणतीकडे असणार, हें निराळें सांगितलें पाहिजे काय? ती मोहिनी बिचाऱ्या मावड्या जिवावर आपल्या अज्ञान आणि अहंकार या दोन जादू टाकून त्याला आपल्या इच्छेप्रमाणें नाचवूं लागते! तिच्याशीं त्याचें अगदीं तादात्म्य होऊन जाऊन तो प्रत्यक्ष सच्चिदानंद असतां आपलें सामर्थ्य व आपली योग्यता विसरून जाऊन तिच्या बरोबर चतुर्दश भुवनांतील अनंत योनींमध्यें भ्रमण करून नसत्या सुख-दुःखाची व हर्षामर्षांचीं ओझीं बोकांडीं घेऊन बेजार होतो! “ अबला यत्र प्रबला ” “ स्त्रीबुद्धि प्रलयंगता ” या वाक्यांच्या प्रत्ययाचा प्रसंग बाईलबुध्या जीवास आलेला आहे. जादूनें भारून गेल्यामुळें त्याच्या लक्षांत तें कोठून येणार? तात्पर्य, जीव अकर्ता अभोक्ता आहे हेंच खरें; पण अमलाच्या भरांत किंवा स्वप्नांत खरीं सुखदुःखें नसतांही तीं झालीं असें वाटून ज्याप्रमाणें हर्षामर्षाचा भोग होतो, त्याप्रमाणेंच मायामोहित जीवास सुखदुःखाच्या उपाधि खऱ्या वाट-तात. असा हा जीव शिणून शिणून बेजार झाल्यावर अनंत पूर्वजन्मसुकृतोदय होऊन त्याला त्या जादू समजल्या ह्मणजे त्या अवदशेनें निष्कारण कीं हो आपली मृत्तिका केली! आपल्याला खरा निजानंद लाभ त्या पवित्र ज्येष्ट ललनेच्या संगतीनें झाला असतां तो आपण मूर्खपणानें घालविलाः—

### पद.

अभाग्याच्या घरीं बाबा कामधेनु आली।

ओढाळ म्हणुनी त्यानें बाहेर घातिली॥

निर्द्रव्याच्या हातीं बाबा परीस लागला।

खडा खडा म्हणून त्यानें झुगारुनि दिला॥

रोगियाच्या मुखीं बाबा अमृत वर्षलें ।
विष विष म्हणुनी त्यानें थुंकुनी टाकिलें ॥
( ज्ञानदेव. )

अशांतला प्रकार आपण केला, असें समजून तो पश्चात्ताप पावतो.

## सद्‌गुरु मंत्री.

कल्याणकारक ज्येष्ट पत्नीचे आपण केलेले अपराध तिनें क्षमा करून तिचें प्रेम आपल्यावर पूर्णपणें बसावें, म्हणून निरभिमान होऊन कल्पतरूचीही उपमा पुरी पडत नाहीं, अशा सद्‌गुरु ( मांत्रिकास ) जीव शरण जाऊन त्याच्या कृपा-प्रसादानें अज्ञान व अहंकार ह्या जादूंचें निर्मूलन करवितो. तें झालें कीं अविद्या पत्नीचा पार नाश होतो. नाश तरी कशाचा अज्ञान व अहंकार यांचा नायनाट झाला कीं तिची ( अ ) उपाधि नाहींशी होऊन तीच मूळरूप विद्या मोठया आनंदानें जीवास माळ घालिते; आणि त्यास सुखदुःखातीत करून पुनः मूळ सच्चिदानंद रूपास पाववितें.

## योगसाधन.

वाचकहो, सर्व घातक जादू आतां सहजासहजीं तुमच्या लक्षांत आली आहे. ह्यास्तव सद्‌गुरु पंचाक्षरी मिळवून तिच्यापासून मुक्त व्हाल तर जन्माचें सार्थक होईल. पहा बुवा, जन्मांत एक वेळच आलें तरी मोठें भाग्य, अशा कपिला षष्टीच्या पर्वाप्रमाणें या दुर्लभ नरतनूमध्यें आज हा योग प्राप्त झाला आहे. तो साधून जन्म साफल्य करून घ्या. नाहीं तर अज्ञान पशु पक्षी ह्यांस ते पर्व आलें काय आणि नाहीं काय, एकच. तसें होऊं देऊन भवचक्रांतच आनंद मानून त्यांतच फेरे घेत रहा.

---

# भाग २१ वा.

## वैराग्य खडतर.

निवृत्ति सुरभी मना भिवंवि तोषवी रासभी
वृथा विषय वासना जसि शुका अही रासभी ॥

तसी न इतरांस भी इससदंडही हांकिती ॥
तथापि बहु लाथळीं मग अदंड भोळी किती ॥ १ ॥
( केकावली )

## अनन्य गतीमुळें संसार.

संसार केवळ दुःखमय म्हणावा तर अनादि कालापासून लोक त्यांतच गर्क झाले आहेत. तस्मात् त्यांत कांहीं तरी सुख असेलच असें मनांत येतें; पण प्रवृत्ति मार्गानें संसार करावा, किंवा निवृत्ति मार्गानें जाण्याकरितां त्याच्यावर पाणी सोडावें, ह्याखेरीज गतिच नाहीं. अनादिकालापासून मनुष्याच्या हाडीं संसाराची संवय अगदीं खिळून गेली आहे. " आत्मा, पुत्र, सखा, स्त्री " हें वाक्य मनाला श्रुतितुल्य वाणून गेलें आहे. अर्थ हाच काय तो परमार्थ, त्याच्यापुढें सर्व कांहीं तुच्छ आहे, असा मनाचा पक्का सिद्धांत झाला आहे, देहच मी असा भाव दृढ बनून चुकला आहे. त्याला उन्हाचा कवडसा पावसाचा थेंब सुद्धां लागू नये, किंचित् कष्ट होऊं नयेत, अशी बळकट इच्छा धरलेली आहे, पंच विषयांपासून मनास होणाऱ्या अनुकूल वेदना हेंच कायतें सुख, त्यां व्यतिरिक्त कांहीं सुख म्हणून असल्याची कल्पना सुद्धां मनाला कधीं शिवलेली नाहीं. निवृत्ति मार्गाला लागण्यापूर्वी या सर्वांवर उदक सोडिलें पाहिजे. ह्यांच्या ठिकाणीं आसक्ति ठेवून तो मार्ग कधींच साधतां येत नाहीं. असें कळलें कीं, त्या मार्गाचें नांव सुद्धां घेण्यास मनुष्य धजत नाहीं.

न मिळो खावया, न वाढो संतान,
परि हा नारायण कृपा करो ॥

हें संतशिरोमणीचें वाक्य वाचतांच थरकांप होतो. असें झाल्यावर नारायण कृपा ती काय करणार, काय हें दुर्घट मागणें, असें म्हणून मन लागलेंच निवृत्ति मार्गाच्या वाऱ्याला सुद्धां भिऊं लागतें. अभंग-" पोरे मेलीं बरें झालें । बाईल मेली पिडा गेली ॥ असलीं संतमहंताचीं मुक्ताफळें संसारिकांस वज्रतुल्य कठोर वाटतात, असला हा सडतर निवृत्ति मार्ग पत्करण्यास अंतःकरण किती तरी कठोर पाहिजे. अभंग-मेणाहुनि मऊ आम्ही विष्णुदास । कठिण वज्रास भेदूं ऐसे ॥ हेंच खरें, असलीं माणसें अत्यंत दुर्मिळ. बाकीचीं माणसें अनन्य-गतिक होऊन संसारांतच राहतात. न राहून काय करतील ?

## कुश्चळ शरीर.

मनुष्याला सौंदर्य किती प्रिय आहे, श्रीमंत लोक नवरी किंवा दत्तक पाहतांना किती चिकित्सा करून साखरेचीं सालें काढीत असतात ! पण स्वतःच्या तोंडावर देवीचे वण असतात किंवा डोळे काणे असतात त्याबद्दल कधीं तरी खेद करीत बसतात काय ? हीं व्यंगें तरी व्यक्तीचीं झालीं, पण सर्वच ज्या देहास मी म्हणत आहेत त्यांत एक तरी द्रव्य पवित्र सुगंधिक, स्वच्छ आणि श्लाघ्य आहे काय ? कमालीच्या घाणीचा खजिना असलें हें शरीर कोणास तरी अप्रिय वाटलें आहे काय ? त्याच्या घाणेरडेपणाची नुसती कल्पना तरी कधीं येते काय ? देहच मी म्हणून त्याला नानाप्रकारें तोषित आणि भूषित करण्यांतच सर्व आयुष्य जातें आहे कीं नाहीं ? ह्या जन्मांतच स्वच्छ पवित्र आणि सुगंधिक असें दुसरें शरीर मिळवितां आलें असतें तर ह्या घाणेरड्या अस्थिपंजराचा विटाळसुद्धां कोणी पतकरला नसता. तोच प्रकार संसाराचा आहे. नाइलाजास्तव तो मनुष्यांनीं पतकरिला आहे. प्राप्त झालेली संसारस्थिति कितीही क्लेशकारक असली तरी निरुपायास्तव तिच्यांतच आयुष्य कंठावें लागतें. दुसऱ्याची भयंकर दुःखकारक किंवा मानहानिकारक स्थिति पाहिली म्हणजे अल्पविचारी माणसें तेव्हांच म्हणून जातात, कीं किती हो हा गृहस्थ कोडगा आहे ? असा प्रसंग येतां तर आम्हीं तत्काल संन्यास घेतला असता, अथवा प्राणत्याग केला असता; नाहींतर तोंडास काळे लावणाराचा तरी प्राण घेतला असता. पण ह्या गोष्टी केवळ बोलण्याच्या आहेत. प्रसंग आला नाहीं तोंपर्यंतच. तो कां येऊन पोहोंचला कीं वाघाची मेंढी झालीच. खालीं मान घालून मुकाट्यानें असलेल्या स्थितींतच दिवस कंठावे लागतात. “जातस्यच ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्यच” आज आपण जीव दिला तरी पुन्हां जन्मास आलेंच पाहिजे. मग आत्महत्येचा दोष तरी कां पदरीं घ्या ? एका जन्मांतच जें होईल तें होऊं द्या, अशी मनाची समजूत घालून स्वस्थ बसतात.

## मनुष्याचा कोडगेपणा.

तोंडास काळें लागो कीं घर बुडो, पण आपले म्हटलेल्या मनुष्याचा त्याग करवत नाहीं; कठीण प्रसंग पाठमोरा झाला, पुरे, कीं पुन्हां पूर्ववत् लाथाळें

सुरू झालेंच समजावें. जगाच्या अनुभवावरून असें ठरतें कीं, मनुष्याइतका कोडगा प्राणी दुसरा नाहीं. हाड् ह्मटलें, तर कुत्रें दूर होतें. एकदां आठवणी-जोगा ठोला बसला तर पुन्हां त्या जागीं जात नाहीं. पण सज्ञान म्हणणारा द्विपद् पशु पंचविषय बाधेनें घेरला, म्हणजे किती मानहानि, धनहानि आणि सुकृतहानि झाली, तरी आवडत्या विषयापासून दूर होत नाहीं.

## मुरलेला विषयलोभ.

"अंगं गलितं पलितं मुडं दशनाविहीनं जातं तुंडं" अशी स्थिती प्राप्त होऊन हा प्रपंच नको, नको, असें मान हालून सांगूं लागली; प्रपंचाच्या दुःखाच्या कहाणीस कंटाळून कानांनीं आपल्या कामाचा राजीनामा दिला; हा संसार दृष्टीस नको, ह्मणून नेत्रांनीं आपला धर्म सोडला. तात्पर्य, इंद्रियें विषयांस कंटाळून ते सेवण्यास असमर्थ झालीं, तरी साठ वर्षे गेल्यावर सुद्धां विषय-वासना अजरामर राहिल्याकारणानें प्रपंचांतील दुर्दशा एकदा नाहीं शंभरदां बोकांडी बसली, तरी बायको मेली म्हणून धायधाय रडून लागिराच्या (लग्नाच्या) लाथांनीं तृप्त न होतां, दुसरा समंध जोडण्यासही कांहीं शहाणे तयार होतात! हर हर! अंगीं मुरलेला विषयलोभ परम दुरत्यय खरा!

## देहावरचा लोभ अनिवार.

कांहीं दुखण्याखुपण्याच्या यातना घटकाभर झाल्या, तर मनुष्य अगदीं विव्हल होऊन देवा, मरण येईल तर बरें होईल, असें म्हणून जातें; परंतु परस्वाधीन होऊन खाणें आणि शौच रोज डाक्टरानें बळें करवावा, लोकांनीं उचलून बिछान्यावर ठेवावें, ह्या कुशीचे त्या कुशीवर सुद्धां दुसऱ्याच्या मदतीवांचून होतां येऊं नये, अशी प्रत्यक्ष मरणापेक्षां परम कठीण स्थिति झाल्यावर सुद्धां वर्षानुवर्षं जगलेली माणसें आणखी वांचण्याकरितां पाण्याप्रमाणें पैसा खर्च करून यत्न करितात! असा ह्या देहावरील लोभ अनिवार आहे. एवंच सगळे लोक संसार करितात ह्मणून त्यांत सुख असेल ही भ्रांति व्यर्थ आहे.

## संसार सोडणारांची दशा.

संसार दुःखमय आहे, निवृत्ति मार्ग फार खडतर आहे, दोहींकडे अडचण तर खरीच, परंतु चांगलें तितकें कष्ट साध्य असावयाचेच. चांगल्याकरितां

करावा लागणाऱ्या कष्टाच्या शतपट किंवा सहस्रपट सुख त्याच्या परिणामापासून होतें. निवृत्ति मार्ग कितीही खडतर असला तरी तोच साधून घेतला पाहिजे. पण तो साधल्यानें तरी सुख होईलच असा काय नियम आहे, म्हणून तो साधण्याकरितां ज्यांनीं संसार सोडला आहे त्यांच्या परिस्थितीचें परीक्षण करूं. संसार सोडला तरी पोट सुटत नाहीं. त्याच्याकरितां खटपट केलीच पाहिजे. अच्छेर अन्नाकरितां घर घर फेरी करणें भाग, मग संसारांत तरी दुसरें काय करावें लागत होतें ! फेरीच्या इतक्याच वेळांत संसारांत भिक्षेपेक्षा जास्त कमाई होत होती ! तिच्या योगानें परोपकार करण्यास सवड होती. कांहीं सुखोपभोग घडत होता. आतां तेल गेलें आणि तूपही गेलें? संसार सोडल्यानें देह रक्षण सुटत नाहीं, तें म्हटलें कीं त्याच्यामागें वस्त्र प्रावरण पर्णकुटिका आलीच. हळूं हळूं एकामागें एक सर्वच आलें. पुन्हां घोटाळ्यांत सांपडणें प्राप्त झालें ! " गेला प्रपंच हातींचा लाभ नाहीं परमार्थाचा " असें होतें.

## परीस टाकून किमया.

चुडाला राणीस न कळूं देतां पतीनें सर्वसंग परित्याग करून विपिनेंविहार संपादिला तेव्हां मुनिवेषानें तेथें जाऊन चुडालेनें त्यास विचारलें कीं, येथें येऊन काय केलेंस ? तेथें डोक्यावर मुकूट होता, येथें जटाभार आहेच, त्याची सुश्रुषा करावी लागतच आहे; तेथें सिंहासन होतें, येथें मृगासन आहेच; तेथें पक्वान्नें होतीं, येथें कंदमुळें, फळें मिळवावीं लागतच आहेत; तेथें सेवकादिकांचा गलगलाट होता, येथें पशु पक्षी श्वापदें ह्यांचा कलकलाट आहेच; तेथें चुडाला राणी होती, येथें पशुपक्ष्यांचे रम्य विहार पाहून आणि वनश्री पाहून मन सुप्रसन्न झालें, म्हणजे नाना प्रकारच्या विषय-विलासांचें स्मरण होतच आहे; चुडालेबरोबर केलेले विलास मनांत येऊन स्वप्नांत तेच दिसून परिरंभ सुख प्राप्त होऊन जागे झाल्यावर वाईट वाटतच आहे; नृपश्रेष्ठा, तेथें ऐश्वर्याच्या योगानें अतिथिपूजन, अभ्यागत-सत्कार, अनाथ, आर्त, जीव-दुःखविमोचन, तीर्थविहारी साधुसंत यात्रेकरू ह्यांचें पूजन, तहीतापडी ह्यांस दानधर्म, आणि गोब्राह्मण ह्यांचा प्रतिपाळ तरी होत होता; तुझ्या छायेखालीं

संपूर्ण प्रजेला, अधिकाऱ्याला आणि बिचाऱ्या चुडालेला आणि त्यांच्या योगानें तुला आनंदांत राहतां येत होतें, तें मात्र नाहींसें केलेंस. दैवयोगानें परीस प्राप्त झाला असून तो झुगारून देऊन किमया करीत बसल्याप्रमाणें हा तुझा व्यापार झाला.

## हेकट वैराग्य.

खऱ्या मनानें संसार सोडून] पंचाविषयांच्या मरकंड्यांत न सांपडणारांचा वर लिहिलेला प्रकार झाला. पण निवृत्ति मार्गास लागलेले जे लोक आपण पाहतों, त्यापैकीं शेंकडा नव्वद तरी स्मशानवैराग्यानें किंवा राग लोभ इत्यादिकांच्या सपाट्यांत सांपडून हेकट वैराग्यानें संसार सोडलेले असतात, खऱ्या वैराग्याचा लेशही त्यांच्या अंगीं नसतो, यामुळें संसार सुटला तरी व्यापाची संवय सुटत नाहीं. तेणेंकरून अव्यापारेषु व्यापार सुरू होतो. कोणी स्वामी मठ बांधूं लागतात, कोणी ब्रह्मचारी गोपाळ बनतात, कोणी लोकांस सांकडीं घालून पट्ट्या वर्गण्या करून देऊळ बांधूं म्हणतात, कोणी अन्नसत्रें ठेवूं ह्मणतात, जणूं काय ह्यांच्या ह्या उपद्व्यापावांचून अगदीं सोळंबाच झाला आहे ! देवळांचा तोटाच पडला आहे ! आपलें नांव मागें रहावें ही वासना संन्यास घेतल्यावर-सुद्धां नष्ट होत नाहीं. आपण सुरुत केलें हा कर्तृत्वाभिमान सुटत नाहीं. बळेंच हात मरवावा आणि धुऊन टाकला म्हणजे स्वच्छ झाला म्हणून मोठें समाधान मानावें, त्यांतला हा सटाटोप आहे. जिकडे द्रव्यांश तिकडे पुण्यांश.

## दारुण दुर्गति.

वरील प्रकार तरी सत्कृत्यांत घोटाळणारांचा झाला. पण विषयांचें मिथ्यात्व, त्यांपासून वाटणाऱ्या सुखाचा भासमानपणा, आणि विषयापासून होणारे अनर्थ पक्के न समजल्यामुळें विषयांचा तिरस्कार आणि वीट आलेला नसतां, विरागी होणारे, ज्या अरिष्टाच्या झपाट्याबरोबर गोंधळून जाऊन संसारावर पाणी सोडून बसतात, त्या अरिष्टाची लाट माघारी फिरली, पुरे, कीं मन हळूंहळूं पूर्ववत् विषयाच्या मागें लागूं लागतें. जनामध्यें तर वैराग्याचा डांगोरा पिटलेला असल्याकारणानें विषयभोगाच्या साधनाचा वियोग झालेला असतो,

तो पुन्हां उघडपणीं तरी जमवितां येतच नाहीं; चोरून मारून योग करावा. तर पापाच्या आणि दुर्लौकिकाच्या भयास्तव तीं साधनें हस्तगत होण्यास राजी होत नाहींत, तेव्हां भलत्या सलत्या मार्गानें नीच साधनें प्राप्त होतात त्यांच्या संगतीनें पुन्हां विषयसेवनास सुरवात होते. त्यामुळें होणारे अनर्थ जगजाहीरच आहेत. अशा हतभाग्य लोकांस प्रापंचिकापेक्षां हजारपट दुःख होऊन दारुण दुर्गति प्राप्त होते.

## सुखाच्या भ्रमानें दुःख.

निवृत्ति मार्गास लागलेल्याची अशी फटफजिती ! आणि प्रवृत्तिमार्ग तर दुःखमय तेव्हां इकडे आड तिकडे विहीर, अशी स्थिति होऊन मनास असें वाटूं लागतें कीं, हा देह तर निश्चयानें नाशवंत आहे, ह्याच्या संगतीनें सुखाचा लाभ होईल म्हणून धारण करावयाचा, विचारानें पाहतां जन्म जन्मांतरींही सुखाचा लेश प्राप्त होत नाहीं ! क्वचित्कालीं थोडेसें सुख झाल्यासारखें वाटतें, तो केवळ भ्रम होय. तान्हें लेंकरूं दूध दूध म्हणून बोटें चोखितें त्याप्रमाणें दुःखाला किंवा दुःखाच्या साधनालाच सुख सुख म्हणून माणसें आनंद मानतात; तसेंही नव्हे. कुत्र्याच्या तोंडात हाडूक सांपडलें ह्मणजे त्याला रक्त आहे असें समजून तें चघळूं लागतें त्यामुळें तोंडांतून रक्त निघतें; तेंच रक्त चाटून तें कुतरें संतोष मानून जास्ती जास्ती चघळून आपलेंच रक्त आपण खातें ! त्याप्रमाणें मनुष्याच्या भासमान सुखाचा प्रकार आहे. सुखाच्या भ्रमानें सगळा जन्म नानाविध कष्ट करण्यात जातो. सुख म्हणून जें वाटतें त्यापेक्षां पुष्कळ पटीनें कष्ट होतात; पण ते समजुतींत येत नाहींत. त्या कष्टांसच सुख मानून वामन पंडिताच्या उक्तीप्रमाणें स्थिति होते.

**एका घडीच्या विषयी सुखाला ॥ हेला जसा वाहतसे पखाला ॥**
**निमीष हाले तंव भोग झाला ॥ दहा बापुडा व्यर्थहि व्यर्थ गेला ॥ १॥**

## मरण काय वाईट.

अशी स्थिती आहे, तर जगून तरी काय करावयाचे आहे? आपल्यापेक्षां पशु पक्षी तरी सहस्रपट बरें; जन्ममरणाच्या येरझारा आणि सुखदुःखाचे वळसे सुकृत दुष्कृताच्या संचयानुरूप होतात, असें धर्म सांगत आहेत. आपण नरदेह

धारण करून काय करीत आहों! दुसरें कांहीं नाहीं, केवळ आत्मघात करीत आहों! आपल्यास नरदेह प्राप्त न होतां तर फार चांगलें झालें असतें; अन्य योनींतील प्राणी आपल्या पापाचा दंड भोगून त्याचा निकाल करीत आहेत, आणि देवादिकांस अप्राप्य अशा नर जन्माकडे धांव घेत आहेत. आम्ही सुजाण ( ह्मणण्यास सुद्धां लाज वाटते ) मनुष्य प्राणी लोकांचे घात–पात करून, गळे कांपून, लोकांस यमयातना भोगण्यास लावून, पापसंचय एकसारखा वाढवीत आहों. ह्मणजे पुन्हां तीर्यकयोनींत, जाण्याची वाट सुधारीत आहों! जों जों आमचें आयुष्य वाढेल तों तों पापच वाढणार कीं नाहीं? त्यापेक्षां मरून जावें.

## आयुष्य अमोलिक.

पण आपल्या यत्नानें मरण कोठें येत आहे? "आयुरक्षति मर्माणी" कित्येक लोकांनीं विष खाल्लें; एकानें पर्वतीच्या डोंगरावरून उडी घातली; पण प्रल्हादाप्रमाणें त्यांच्या आयुष्यानें त्यास सांभाळलें. आपल्या यत्नानें मरण आलेंच तर तुरुंगांतून पळालेला कैदी आणखी गुन्हेगार होऊन आपली शिक्षा वाढवितो, त्याप्रमाणें मेल्यानें पुनर्जन्म तर टळत नाहींच. तेव्हां तिर्यग्योनि तर ठेवलीच आहे. त्यांत आत्महत्येचे पातकाची भर पडून आणखी जास्त नीच योनी प्राप्त होईल. नरदेहांतील आयुष्याच्या एका पळाची योग्यता किती मोठी आहे पहा. ऋषिश्रेष्ठ वसिष्ट ह्यांनीं प्रभुपाशीं कोणाचें तरी निमिषमात्र आयुष्य मागून आणून यावें असें मागणें मागितल्यावरून लक्ष्मण सगळ्या अयोध्येंत फिरला; पण आयुष्य कोणी देईना. तेव्हां आसन्न–मरण झालेला एक गलित कुष्टी पाहून त्याजपाशीं लक्ष्मणानें गोष्ट काढिली; तो मोठा ज्ञाता होता, त्यानें श्रीरामराय येतील तर देतों, असें कबूल केलें. रामचंद्राची स्वारी सन्मुख उभी राहिल्यावर तो म्हणाला प्रभो ब्रम्हादिक तप करून थकले पण प्रत्यक्ष दर्शन त्यास मिळालें नाहीं, असें असतां आज माझेपुढें पूर्णब्रम्ह ह्या निमिषांत याचना करीत उभें आहे त्यापेक्षां या निमिषाची किंमत कोणास होईल! ह्यापुढील निमिषांत ह्याहीपेक्षां जास्त काय लाभ होईल हें कोणास सांगतां येईल? त्यापेक्षां असें अमोलिक आयुष्य मी कसें देऊं! सारांश, नरदेह फार महत्वाचा

आहे. त्यांत जो करणी करील तो नारायण होतो. म्हणून मरणाची कल्पना वेडी, पापमूलक व घात करणारी आहे.

## वैराग्य भाग्य.

॥ बहिः कृत्रिमारंभो हृदि संरंभ वर्जितः ॥
॥ कर्ता बहिरकर्तांतर्लोके विहिर राघव ॥ १ ॥
( यो. वा. )

## रामायस्वस्ति रावणायस्वस्ति.

संसार दुःखाचें सरण, वैराग्य खडतर दारूण आणि आत्महत्या पापाचें व नरकाचें साधन असें ठरलें. आई वाढीना, बाप भीक मागूं देईना आणि राजा फुकाचें मरूंही देईना असा प्रकार झाला आहे. पुढें करावें काय हा मोठा बिकट प्रश्न आहे. त्याचें समाधान असें कीं, पूर्व पक्ष आणि उत्तर पक्ष दोन्ही अति रेकासनलेले असतात. म्हणून त्यांची एकवाक्यता करणें ह्यांतच चातुर्य आहे. आणि सरें एकवाक्यतेमध्येंच सापडतें. प्रवृत्ति मार्ग किती वाईट असल तरी निखालस सोडताच येत नाहीं. तो सोडिला नाहीं तर खात्रीनें अधःपात होणार. निवृत्तीमार्ग अत्यंत दुर्घट म्हणून धरवत नाहीं, पण धरलाच पाहिजे. न धरला तर आत्मघात होणार. करितां " रामयस्वस्ति रावणयस्वस्ति " असें करून दोन्हीही साधलें पाहिजेत. " प्रपंच साधून परमार्थाचा लाभ ज्यानें केल तो मळा मला " म्हणून संग असून असंग कसें रहावे हें सांगतों.

## बाह्यात्कारें संग व त्याग.

दुःखास कारण संग, तेव्हां त्याचा त्याग हेंच सुखाचें साधन हे प्रकट गुह्यच ठरलें. संगाच्या त्यागाचें शेंपूट फारच लांब जातें, श्रीशुकानीं कौपिनाची सुद्धां उपाधि ठेविली नव्हती, तथापि भेटी समयीं राजा जनकांनीं " बरोबर आणिलेलें टाकूं नये" असें म्हटलें. आचार्यांनीं आपल्याबरोबर कांहींच नसल्याचें कळविलें. पुनः विदेहींनीं तेंच म्हटलें असेर मी शुकही भावना आपल्या ठिकाणीं आहे ती टाकली पाहिजे हें श्रीशुक महाराजास कळलें. सारांश, मी ही भावन

मी ही भावना म्हणजे अहंकार गलित झाल्यावांचून संग त्याग होत नाहीं. आतां पहा, श्रीजनक प्रत्यक्ष संगाच्या शिगलोटीचें घर ह्मणजे राज्य, तें भोगीत होते. आचार्यांस लंगोटीचाही संग नव्हता, असें असतां दिसण्यांत अगदीं विपरीत असा वरील प्रकार घडला, ह्यावरून काय सिद्ध होतें बरें ? संग आणि त्याग शरिराच्या संबंधानें बाह्याकारीं आपल्याला दिसतात, ते धरल्यानें किंवा साडल्यानें बंध किंवा मोक्ष होत नाहीं. मनानें संग सोडल्यानें बाह्यात्कारीं देह प्रारब्धानुरूप ह्मणा, किंवा नाइलाजास्तव ह्मणा, किंवा असेनात बिचारे तें आपले काय करतात ? ते सोडून कुटुंबांतील दहा माणसांस हाल सोसण्यास लावून त्यांचा तळतळाट कशाला घ्या ? जनावर पाण्यावर नेण्याचें माणसाच्या स्वाधीन आहे; पण त्याला वाटलें तर पाणी पिईल; नाहीं तर माणूस किंवा नदी बळेंच कांहीं त्याच्या तोंडांत पाणी ओतीत नाहीं. त्याप्रमाणें कुटुंबाच्या माणसांनीनिमित्त प्रारब्धानें संगाशीं ज्ञानी माणसाचें लग्न लाविलें तरी तो कोठें त्यांना विचारतो ? ते आपलीं कामें करितात, तो तीं उदासीनपणें साक्षीरूपानें पाहत असून आपलें लक्ष अलक्ष्याकडे ठेवून आयुष्य काढीत असतो. अन्यपक्षीं बाह्यात्कारीं संन्यास घेऊन सुद्धां मनाला विषयाचा वीट आला नसून त्यापासून वासना पराङ्मुख झाली नसेल तर विषयाची बाधा झाल्यावांचून कधीं राहणार नाहीं. त्यानें बाह्यात्कारीं विषय सोडिले तरी अंतर्यामीं पराकाष्टेचें दुःख झाल्यावांचून राहणार नाहीं.

## संगत्याग अशक्य.

आपण जन्मास आलों तेव्हांच संगसमुदाय बरोबर घेऊन आलों आहों, तो आपणांस सोडतां येणें शक्यच नाहीं. देहप्रारब्ध संगाचा त्याग करूं देणारच नाहीं. ज्याच्या देहास राजभोगच व्हावयाचे असतील त्यानें सर्व-संग-परित्याग करून विपिन-विहार स्वीकारिला, तरी प्रारब्ध अकस्मात् एखाद्या भाग्यशाली राजाच्या मनांत शिरून सुद्धां पुनः राजभोग घडवितें. प्रसिद्ध कवि अमृतराय ह्याची आख्यायिका सर्वश्रुतच आहे. पूर्वकर्मांच्या ऋणानुबंधानुसार प्राप्त झालेला परिवार ह्याचें आपण धनको किंवा ऋणको होतों म्हणून आपलें कर्ज वारण्यास किंवा त्याचें कर्ज वसूल करून घेण्यास ती मंडळी आलेली आहे; तेव्हां त्यांच्याशीं विरोध न वाढवितां किंवा त्यांचा छल किंवा त्याग न क-

रितां सुशील गृहस्थास शोमेल असें विनय, संतोष, गोडीगुलाबी, इत्यादि भूषणांनीं विराजित असेंच वर्तन त्यांच्याशीं ठेवून त्यांच्या आणि आपल्या मनाला संतोषरूपी नंदनवनांत विहार करूं द्यावा, हेंच शहाणपण आहे.

## नट व पांथस्थ.

नाटकांतील नट जी भूमिका पतकरितो, तीस साजण्याजोगीं भाषणें आणि अभिनय करितो. आपण राजा नाहीं, राणी नाहीं, किंवा राक्षस नाहीं, अमुक अमुक गोम्या आहों, उजाडल्याबरोबर स्कंद विहारिणी घेऊन घागरगडवे हंस बनून आपल्यास पाणी वाहावें लागेल ! हें त्यास ठाऊक असतें; म्हणून नाटकांतील वैभवांनीं तो फुगत नाहीं, किंवा शोकानें विव्हलही होत नाहीं. संसारनाटकांतील जी भूमिका परमेश्वराच्या योजनेनुरूप आपल्या वांट्यास आली असते, तिला साजण्याजोगीं भाषणें आणि कृति करून कालक्षेप केला पाहिजे. आपण वस्तुतः सच्चिदानंद आहों, ह्या संसारांतील सुखदुःखाच्या बतावण्यांनीं आपल्या स्वानंद-समुद्राला भरती किंवा ओहोटी येण्याचें कारण नाहीं. दोनप्रहरीं जेवण्यापुरता आलेला पांथस्त जेवला कीं निघाला. घरधन्याच्या नफ्यानें किंवा नुकसानानें त्याचें हित किंवा अहित होत नाहीं. त्याप्रमाणें ह्या संसाराशीं आपला संबंध आहे. अशी दृढ समजूत करून घेऊन आपण ज्या कारणाकरितां आलों आहों, तें कारण म्हणजे देहभ्रांति सोडून परमतत्वीं लीन होणें, तें साधण्याविषयीं अहर्निशीं झटलें पाहिजे, म्हणजे संग असतां निस्संग होतां येतें. असो; देह असे तोंपर्यंत बाह्य संग सर्वतोपरी सोडणें अशक्य नसलें, तरी परम कठीण तरी आहेच. इतकें दुर्घट काम करण्यास जाऊन तोंडघशीं पडण्याचें कारण नाहीं. तसें करणारापेक्षां मर्म जाणून मनानें त्याग करणारास इच्छित हेतु लवकर साध्य होतो.

## सोबती परिवार.

पांथस्थ प्रवासास निघतो तेव्हां त्याच्याशीं त्याचा कांहीं संबंध नसतो असे लोक त्याला मार्गांत सोबती भेटतात. यांच्या बरोबर त्याला आपल्या सोईकरितां दिवस काढावे लागतात; त्यावेळीं तो आपल्याप्रमाणेंच त्यांच्या चीजवस्तेस जपतो; त्यांच्या हिताहिताविषयीं दक्ष राहतो, त्यांच्या प्रकृ-

तीस जपतो, क्षेत्रांच्या तीर्थांच्या ठिकाणीं यथायोग कर्मै घडावीं ह्मणून त्यास मदत करितो, तितक्यावर न ऐकतील तर त्यांची संगत सोडून मोकळा होतो; मग आजन्म आचरणाच्या संसार यात्रेस ईश्वरी संकेतानुरूप आपल्यास भेटलेल्या सोबत्यांशीं आपल्यास त्या पांथस्थाप्रमाणें वर्तन करावयास नको काय ? त्यांतून ते तर पूर्वऋणानुबंधाचें, तेव्हां त्यांच्या ऋणापासून आपल्यास मुक्त व्हावयाचें आहे; ह्मणून आपली मुक्तता करून घेतली पाहिजे. पांथस्थानें तुसडेपणानें सोबत्याची संगत सोडली तर त्यास सुख व सोयी, यांस आंचवावें लागतें. त्याप्रमाणेंच आपण वेडेपणानें संसाराचा त्याग केला असतां आपला परिणाम होतो. हें पूर्वी हेकट वैराग्याचें वर्णन झालें आहे त्यावरून सिद्ध झालेंच आहे. सारांश संगत्याग म्हणजे संसार मोकलून आपल्यास आणि दुसऱ्यास संकट समुद्रांत ढकलणें नव्हे, पुढल्या जन्माकरितां संसाराची गाठोडी आशेच्या नादीं लागून बनू न देण्याकरितां मनानें संगत्याग करून अलिप्तपणें संसारयात्रा करणें होय.

## विषयांचा तिरस्कार.

इंद्रियें आणि मन ह्यांच्याशीं दावा धरून विषयांचा तिरस्कार केला पाहिजे. असेंही नाहीं. कांहीं कांहीं लोक माधुकरी पाण्यांत बुडवून सगळें अन्न एकत्र करून खातात, कोणी लिंबाचा पालाच खाऊन राहतात, कोणी उपास तापास करितात, कोणी अंगास राख लावून घरादाराचा त्याग करितात, असें पाहून विषयाचा त्याग केल्यावांचून वैराग्य प्राप्त होत नाहीं असें वाटतें, पण त्यांतलें मर्म निराळें आहे. विषयांनीं मनुष्याचा विध्वंस होऊन बंधास कारण विषय होतात, ह्या म्हणण्याचा अर्थ निराळा आहे. भाषेमध्यें संक्षेपाचा प्रचार फार आहे. विषय नाशास कारण आहेत, असें म्हणणें आहे. ह्याचा अर्थ विषयवासना नाशास कारण, असा आहे. पंचपक्वान्नें भक्षण करून नर अधःपातास पात्र झाला असें म्हणतां येईल काय ? येईल तर ब्राह्मणसंतर्पणें करणारांची योजना कोठें करावी लागेल ? सुस्वर हरिकीर्तन, बुक्याचा परिमळ, देवालयांत दीपोत्साह, संतभेटी, इत्यादि कार्यें भक्तिपुरःस्सर करणारांस कोणत्या लोकीं जावें लागेल ? तात्पर्य, विषयसन्मार्गानें सेवन झाल्यानें

नाश होतो, असें नाहीं. विषयवासनेचें कुत्रें बनून विषयाच्या प्राप्तीकरितां विहिताविहिताचा विचार सोडून पशुतुल्य बनून अनाचार व अत्याचार केल्यानें मात्र नाश होतो; भगवंताकडे सदोदित लक्ष ठेवून त्याचा ध्यास करावा, सहजासहजीं विषय प्राप्त झाले तर सेवन होतील नाहीं तर होणार नाहींत, तस्मात् झाले तर प्राप्त झाले, नाहीं तर नाहीं; ह्यांचें भान सुद्धां नसावें; मग आशा कोठली? अशी सहजावृत्ति ठेवावी. तें सोडून सदा सर्वकाल विषयांचा ध्यास, विषयांची आशा, विषय सेवन झाल्यानें परमानंद आणि ते प्राप्त न झाल्यानें दुःख आणि तळमळ करीत बसल्यानें विनाश होतो. परमेश्वरानें दिलें असून त्याचा त्याग करून बळेंच हाल भोगण्याचें मुळींच कारण नाहीं. 'सगळ्या अनर्थांस कारण वासना आहे, म्हणून श्रीसमर्थांनीं ( रामदास स्वामींनीं ) तिची खोड मोडण्याकरितां क्षिप्रेची शिसारी बसवून घेतली. एकत्र करून भिजवून 'माधुकरी खाणें, लिंबाचा पाला खाणें हें आत्मसंयमनाची संवय लावून विषयवासना नष्ट करण्याचें साधन आहे. ज्यास तशा साधनांवांचून विवेकबलानें वासना त्याग करितां येईल त्यांस विषयांशीं भांडत बसावयास नको.

## सावधगिरी.

इतकें मात्र लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, संसारयात्रेंतील सोबती म्हणजे परिवार ह्यांचें व आपलें नातें खरें काय आहे हें विसरतां कामा नये. त्याच्याकरितां मळते भलते दोष करून आपल्या गळ्यास तात लावून घेऊं नये. त्याच्या संबंधानें पुढें लिहिल्याप्रमाणें सावध असावें. समजा, आपण प्रवासास निघालों असतां कांहीं सोबती मिळाले, त्यांच्या संगतीचा परिणाम काय होईल ह्याचा विचार त्याच वेळेस केला नाहीं, त्यांची सोबत आपल्यास फार सुखकर होईल अशी चुकून समजूत झाली; पुढें अनुभवानें असें दिसून आलें कीं, आपली सगळीच समजूत सपशेल खोटी ठरली; पण आतां त्यांच्याच संगतीनें मुक्काम गांठला पाहिजे, त्यांस सोडण्यास जावें तर नानाविध त्रास होतील. त्यांच्या संगतीनें जावें तर ते वंचक, चोर आहेत, आपल्या डोळ्यादेखतां असल्या सोबत्यांनीं लोकांस नानासंकटांत घालून त्यांचा सफाई फडशा उडविला आहे व

उडवीत आहेत, आपलाही परिणाम तोच होणार, आतां धरतां नये, सोडतां नये, तसें असल्याची ओळख देऊन उपयोग नाहीं, इच्छित मुक्काम हातीं लागे-पर्यंत त्यांच्याच संगतीनें काळ काढिला पाहिजे. असा प्रसंग आला तर आपण त्या सोबत्यांशीं ज्या सावधगिरीनें वागूं त्याच सावधगिरीनें प्राप्त झालेल्या संगाशीं वागून पुनः त्यांच्यापासून अलिप्त राहिलें पाहिजे, म्हणजे खरा संगपरित्याग होण्यास आणि संगापासून होणारीं कार्यें दुःखप्रद न वाटण्यास हरकत पडणार नाहीं.

---

# भाग २२ वा.

## संसार.

### श्लोक.

॥ धैर्यं यस्य पिता क्षमाच जननी शांतिश्चिरं गेहिनी ॥
॥ सत्यं सूनुरयं दयाच भगिनी भ्राता मनःसंयमः ॥
॥ शय्या भूमितलं दिशोऽप वसनं ज्ञानामृतं भोजनम् ॥
॥ ते यस्य कुटुंबिनो वद सखे कस्माद्भयं योगिनः ॥ १ ॥

( सुभाषित. )

## अज्ञान.

पूर्वी झालेल्या सर्व विवेचनावरून सुखदुःख मिथ्या ठरलें, पण त्याच्या वेदना आणि सुखप्राप्तिकरितां झालेले दोष पीडा केल्यावाचून राहत नाहींत त्यास काय करावें ! वेदना अज्ञानास होतात असें आपल्यास कळून चुकलें आहे. अज्ञान हेंच त्रिविध तापाचें मूळ आहे. अर्थात मूळावर कुऱ्हाड पडली म्हणजे विस्तार नाहींसा होईल. हें अज्ञान किती नीच आणि हानिकारक आहे श्रीवसिष्टांनीं कसें वर्णिलें आहे पहा.

### श्लोक.

वरं शराव हस्तस्य चांडाला गार वीथिषु ॥
भिक्षार्थ मटनं राम न मौर्ख्य हत जीवितं ॥ (यो. वा. )

## भाषांतर-श्लोक.

चांडालालय हिंडुनीच भरणें भिक्षेवरी पोट तें ॥
झालें प्राप्त तरी बरें परि नसो मूर्खत्वसें वाटतें ॥ १ ॥

## श्लोक.

नव्याधिर्न विषं वापि तथान्य द्वापि भूतले ॥
दुःखाय स्वशरीर स्थं मौर्ख्य मेत द्यथा नृणां ॥ १ ॥

( यो. वा. )

## भाषांतर-श्लोक.

आधि व्याधि दरिद्र शोक विषहि नानापरीच्या व्यथा ॥
देति दुःख खरें परंतु न तुळे मूर्खत्व त्यां सर्वथा ॥ १ ॥

असें हें अज्ञान आहे. अज्ञान म्हणजे विपरीत भास. सृष्टि, विषय, प्राणि आणि प्रपंच हा सर्व खटाटोप मिथ्या, नाशवंत आणि क्षणभंगुर असतां तो यथार्थ, अविनाशी, चिरस्थाई, आनंदमय आणि कल्याणकारक समजणें हेंच मुळीं अज्ञान.

## एक धर्म मात्र सत्य.

एक धर्मतत्व असून सर्व पसारा त्याचाच आहे. अनंत नामरूपात्मक सृष्टि दिसण्यांत मात्र नानाविध दिसत आहे, पण वस्तुतः एक गुणधर्म मात्र आहे. हें वर्म कळलें ह्मणजे लाभालाभ, जयापजय, हर्षामर्ष, सुखदुःख, जन्ममरण इत्यादि द्वंद्वें व त्यांपासून भासणाऱ्या अनुकुल किंवा प्रतिकुल वेदना ह्यांना अस्तित्वच नाहींसें होतें. मूळच नाहीं तर वेल कोठला, आणि फुलें फळें कोठलीं असणार? असें असतां येवढा अवाढव्य पसारा दिसतो आणि त्याच्याकरितां जन्मजन्मांतरी माणसें खटपट करीत आहेत. हा सर्व खेळ केवळ त्या अज्ञानाचा आहे.

## अहंकार.

असलें हें अज्ञान नाहींसें करणें सहज आहे, ज्ञानामागील अ उपसर्ग काढून टाकला ह्मणजे झालें असें सहज ह्मणतां येईल. पण हें एक अक्षर निघण्याला जन्मोजन्मींची खटपट लागते. इतकें तें दुर्घट आहे. ह्या अज्ञानानें अहं ( मी )

हा अति दारुण कोंब प्रथम उत्पन्न केला त्याला अहंकार ह्मणतात. ह्या मीनें आपलें स्वामित्व सर्व सृष्टीवर करून माझें हा शब्द त्याच्यावर बसविला. ह्या माझें ह्मणजे मे शब्दाचा ध्यास घेऊन—

## आर्या.

अशन मे वसनं मे जाया मे बंधुवर्गो मे ॥
इति मे मे कुर्वाणं काल वृकोहन्ति पुरुषाजम् ॥ १ ॥

यांप्रमाणें में में करणारीं मेंढरेंच सर्व पृथ्वीभर पसरलीं आहेत. हीं त्यांचीं में में शेवटपर्यंत चालत असतां अकस्मात मृत्यु–वृक येऊन त्यांस उचलून नेतो तरी में में करण्याकरितां तीं पुनः पुनः जन्म घेतात, आणि में में करून पुनः लांडग्याच्या मुखीं पडतात. पवित्र शास्त्रांत मनुष्याला मेंढरें ह्मटलें तें खरेंच.

## आपपरभाव.

माझें माझें म्हणणारा एखादाच मनुष्य असता, तर फारशी मानगड न होती, परंतु प्रत्येक मनुष्य माझें ह्मणतें, ह्यामुळें माझेपणा कोणाचा तें ठरण्याकरितां रणें पडत आहेत, मारामाऱ्या होत आहेत. हाडवैरें पिढ्यानपिढ्या चाललीं आहेत. राजे आणि राजनीति उत्पन्न झाल्या आहेत. फार काय सांगावें ! सर्व सृष्टीक्रम माझें शब्दाकरितां चालला आहे. मी शब्दामुळेंच तूं शब्द उत्पन्न झाला. अर्थात् आपपरभाव निर्माण झाला.

## षड्रिपूजनन.

कलहाचें मूळ रुजलें, प्रतिस्पर्धा जन्म पावली; सर्व कांहीं मला असावें, तुला कांहीं नको, असें प्रत्येकास वाटूं लागलें, एथेंच आशा जन्मास आली. " आशायां परम दुःखं " तीच मूर्तिमंत दुःख होय. तीच कामाची (इच्छेची) जननी होय. लोभ हा कामाचाच भेद आहे. काम व लोभ ह्यांस प्रतिबंध होतांच क्रोध संचरला. क्रोध उत्पन्न झाला यामुळें मतिभ्रष्ट होऊन मोहाचा प्रादुर्भाव झाला. त्यापासून अक्कल जाग्यावर न राहिल्याकारणानें मद वाढला. सर्व मला असावें अशी इच्छा उत्पन्न झाली. काय तो मी श्रेष्ठ. दुनियेंत पराक्रमी मी. माझ्यासारखें शरीर, माझ्यासारखी विद्वत्ता, दुसऱ्यांत कोठेंही नाहीं. दुनियेंतील सर्व स्त्रिया माझ्या रंभेपुढें विद्रूप. माझे मुलगे रूपवान, गुण-

वान, हिंमतवान, माझें घरदार सर्वांपेक्षां उत्तम, माझ्या विहिरी, माझे मळे, सारांश माझें म्हणून जें जें कांहीं तें तें अत्युत्तम. इतकेंच नव्हे, दुसऱ्याचें तितकें खराब, नादान असें त्या मदानें भ्रष्ट झालेल्या बुद्धीस वाटूं लागलें. दुसऱ्यास कांहीं नसावें अशी इच्छा, पण दुनियेंत शतं मीण्न ह्याला जकातीवारी नेण्याजोगे पाहिलें कीं त्यांचा उत्कर्ष मनाला जाचूं लागला तोच मत्सराचा उगम होय. याप्रमाणें अज्ञानानें उत्पन्न केलेल्या अहंकाराचा सदा प्रचंड शाखान्वित मोठा वृक्ष बनला. त्याला विषय, मायाजाळ, धनदौलत, ऐश्वर्य इत्यादि दुर्विपाक विषफळांचा मोठा बार सदासर्वकाळ लकटलेला आहे. प्रपंच हा त्या फळाच्या राशींनीं गजबजलेला बाजार आहे.

## मीपणाचा नाश.

षड्रिपूंचें आणि सर्व प्रपंच मारुताचें मूळ आतां आपल्यास कळलें हा फार मोठा लाभ झाला. एक अहंकार सोडला ह्मणजे दुःख शोकादिक प्रतिकुल वेदनांचा बाजार आपोआपच ओस पडतो. माझें माझें म्हणून शिरीं वाहिलेलें भ्रांतीचें असह्य ओझें वरच्यावरच नाहींसें होतें. बाप मरो कीं लेक मरो, त्याचें कांहींच वाटत नाहीं. जनन आणि मरण हीं स्वाभाविक सृष्टिकार्यें वाटतात. लाभालाभाचा विधिनिषेध वाटत नाहीं. नवविधींतील द्रव्य आपल्या सत्तेंत आलें काय आणि दुसऱ्याच्या सत्तेंत गेलें काय, जागचेजागींच आहे असें वाटतें. षड्रसापैकीं जो रसरसनेला प्राप्त होईल तो होवो, क्षुधा शांति होण्याचा जो अन्नाचा धर्म तो होतोच, मग पक्वान्न काय आणि कदान्न काय असें वाटतें. झोंप आली म्हणजे शरीर पडून विसावा घ्यावयाचेंच मग तें पराच्या गादीवर पडो कीं दगडावर पडो, त्यांचा काय मोठा हिशेब आहे ? असें मनांत येतें. स्वरूप नेत्रांस संतोष देतें मग तें पुरुषाचें असो, स्त्रीचें असो, कीं एखाद्या पाखराचें किंवा जनावराचें असो. सदुपदेश झाला म्हणजे झालें मग तो गायनानें होवो वा नुसत्या शब्दांनीं होवो. सुगंध सहज आला तर नाकाला बरें वाटतें, मग तो आपल्या हातांतील फुलाचाच कशाला पाहिजे ! बागावरून किंवा फुलाऱ्याच्या दुकानावरून किंवा गंध्याच्या दुकानावरून येईना; आणि नच मिळाला तरी त्यावांचून कांहींच अडत नाहीं.

## ममत्वाचा निरास.

लाभाची व सत्तेची पर्वा करावयाची कशाला! ममत्व होतें म्हणून, तीं पोकळ लचांडें गळा पडलीं होतीं. आतां अहंकार सुटला तर मीच मुळीं नाहींसा झाला. प्रथमेचाच ठाव पुसल्यावर षष्ठी ( माझें ) हिला जागाच नाहीं. मग वैर कोणाशीं करावयाचें. वाईट कोणाचें चिंतावयाचें. इच्छाच मावळल्यावर काळजी कोणाची आणि कशाची करावयाची. सदा स्वानंदांत मन निमग्न. मग दारिद्र म्हणजे काय पदार्थ आहे हें कळतें आहे कशाला. वसुधेवरील सर्वच प्राणी प्रीय, मग आनंद देण्याला दुनियेंतील संपत्ति, वैभव, ऐश्वर्य काय कमी आहे. दुनियेंत चाललेल्या आनंदोत्सवांनीं आणि परमेश्वराच्या अजबकृतीनें चित्त सदां संतोषाच्या नंदनवनांत विहार करीत असतें.

## देहाहंकार लय.

अहंकार बिराला तस्मात् मी ही वार्ताच उरली नाहीं. मग ममत्व तरी कसें राहील. देहसुद्धां अनाथ झाला, त्याची पर्वाच राहिली नाहीं. त्याच्या प्रारब्धानुसार तो राजभोग भोगो वा विपत्ति भोगो. आयुर्मर्यादा असेपर्यंत तो वागेल. मर्यादा संपली म्हणजे नेमल्या जागीं पतन पावेल. सगळा पसारा ज्याच्याकरितां तो देहही सर्पानें टाकलेल्या कातीप्रमाणें उपेक्षेस पात्र झाल्यावर जगांतील कोणच्या पदार्थास मान उरणार. सगळें जगच मावळलें. " मन रामीं रंगलें अवघें मनची राम झालें " अशी स्थिति प्राप्त झाली.

## सुखदुःखाचीं आभाळें.

अहंकार वृक्षाचीं पूर्वोक्त फळें सेवून सवरून त्यांचा दुष्परिणाम आपल्यावर होऊं न देणें ह्यांतच काय तें कौशल्य आहे. अहंकाररहित स्थिति झाली म्हणजे संसारांत असला तरी कोणचीच बाधा जीवाला होत नाहीं. वर्षाकाळांत रविमंडळाखालीं मेघमंडळांत आभाळें येतात, आणि जातात. त्यांपासून रवीला कोणचाही विकार होत नाहीं. त्याप्रमाणें स्थितप्रज्ञ झालेल्या मनुष्याचा अंतःकरण रवी सदासार्वकाळ ज्ञान-तेज परिपूर्ण असतो. प्रपंचरूप मेघमंडळ त्याच्यापासून दूर असतें. त्यांत सुखदुःखाच्या आभाळांची गर्दी प्रारब्धरूप वर्षाकालीं होते आणि पुन्हां आपोआप नाहींशी होते. तिचा कोणचाही संस्कार त्याच्या

अंतःकरण रवीवर होत नाहीं. ब्रह्मांड कोसळून पडलें काय ? आणि पृथ्वीवर सोन्याचा पाऊस पडला काय ? त्याला त्यापासून दुःख किंवा आनंद होत नाहीं. तो सदा आनंदांतच असतो. त्या ब्रह्मानंदापुढें ऐहिक सुखापासून होणारा आनंद जातोच कशाला !

## दोन खातीं.

वर लिहिल्याप्रमाणें स्थितप्रज्ञ होणें ही गोष्ट अत्यंत दुर्घट आहे. ती एकाएकीं साध्य होणें नाहीं म्हणून निराश होऊन बसणें श्रेयस्कर नाहीं. उद्योग केला पाहिजे. उद्योग कल्पतरूस असाध्य कांहीं नाहीं. हळू हळू साधन करीत गेलें पाहिजे. ज्याला संसार एकदम सोडितां येत नाहीं त्यानें दोन निरनिराळीं खातीं ठेवावीं, एक संसार खातें आणि दुसरें परमार्थ खातें. यांपैकीं संसार खातें आपलें स्वतःचें नसून आपण ज्याची चाकरी पतकरिली आहे त्या मालकाचें, आणि परमार्थ आपलें खासगत समजावें. आपण या लोकीं ज्या साधनाकरितां आलों आहोंत तें साधन हस्तगत करून घेण्याचें हें खातें होय. नोकर आपल्या यजमानाकरितां इमानें इतबारें रात्रंदिवस काम करीत असतो. मोठ्या कळकळीनें झटत असतो. परंतु आपल्या खासगी कामाची किंवा हिताची तिळमात्र हेळसांड करीत नाहीं, किंवा नुकसान होऊं देत नाहीं. त्याप्रमाणेंच प्रपंच धन्याच्या हिताकरितां हा देह त्याच्या पायावर ठेवणें ज्यांच प्रारब्धीं आलें आहे त्यांनीं तसें करून प्रपंचाचा भार खुशाल वाहवा. त्यांत तिळमात्र कसूर करूं नये. परंतु आपल्या खासगत खात्यांत जमा काय झाली याचा शोध काळजीपूर्वक ठेवावा.

## सांपडेल तो वेळ व साधनें.

नोकर यजमानाचें काम करून रात्रीं विश्रांति घेण्यास आपल्या घरीं गेला म्हणजे तितक्यांतल्या तितक्यांत आपल्या प्रपंचाची सर्व व्यवस्था लावून विश्रांति घेतो. त्याप्रमाणें संसारिक सर्व दिवस प्रपंच धन्याचें काम इमानें इतबारें करतो आणि रात्रीं अंथरुणावर पडतो तेव्हां ती वेळ आपण आपल्या धन्यापासून सुट्टीची मिळविली असें त्यानें समजावें. प्रातःकाळीं उठेपर्यंत प्रपंचाचा ध्यास सोडून आज आपण आपल्या खासगत

त्यांत किती सुकृत किंवा दुष्कृत मरलें ह्याचा त्यानें प्रथम विचार करून शिलक मिळवून घ्यावी. उजाडेपर्यंत जेवढा वेळ जागृतींत सापडेल तेवढ्या वेळांत प्रभूला शरण जाऊन त्याची मानसपूजा करावी. त्याचें नामस्मरण करावें आणि ह्या धन्याचें कल्याण करून माझी गरज त्याला न राहील अशी सुस्थिति ह्याला दे, आणि मला ह्याच्याकडुन सोडचिठी देववून आपल्या सेवेस लाव, असें मागणें सदोदित त्याजपाशीं मागावें. म्हणजे त्या दयाघनाला दया येईल, आणि प्रपंच्याच्या पाशापासून मुक्त करून आपल्या तैनातीस नेईल. नोकर यजमानाची नोकरी करीत असतां मधून मधून जितकी सवड मिळेल तितकी यजमानाचें नुकसान न होऊं देतां साधून आपल्या खासगत कामाचा बंदोबस्त ठेवतो. यजमानाच्या परवानगीनें यजमानाच्या साधनांचा उपयोग आपल्या फायद्याकडे करून घेऊन आपलें हित साधितो. त्याप्रमाणेंच प्रपंच धन्याचें नुकसान न होऊं देतां जितकी सवड सांपडेल ( साधेल ) तितकी साधून व प्रपंचांतील जीं साधनें प्रपंचाची स्थिति न बिघडतां परमार्थाकडे लावितां येतील तीं लावून परमार्थ साधावा. म्हणजे फावल्या वेळांत ज्ञानार्जन, हरिकथांचें श्रवण, मनन, पठण, निदिध्यास साधतां येईल. थोड्या थोडक्यांत दानधर्म व परोपकार करितां येईल.

## वेळ थोडाही पुरे.

अशा प्रकारें प्रपंचभार वहाणाराचा पुष्कळ वेळ प्रपंचांत जाऊन परमार्थास फार थोडा वेळ सांपडेल हें खरें. परंतु—

## सब सोनारकी और एक लवहारकी.

म्हणजे सगळें शंभर वर्षांचें आयुष्य प्रपंचांत गेलें तरी एक लवमात्र वेळ जरी हरीच्या किंवा हराच्या नामस्मरणांत किंवा प्रार्थनेंत गेला तर शंभर वर्षांचें पातक दग्ध होतें. खंडोगणती कापसाच्या राशीला किंवा लाख वेरणीच्या गंजी-ला जाळून टाकण्यास गाड्यांवारी विस्तव लागत नाहीं. एका फुणगीनेंच निकाल होतो. तद्वतच हरिनामांत गेलेल्या लव वेळाच्या पुण्याईनें बाकीच्या वेळांत कलेलें पातक भस्म होईल. पापपुण्याच्या वेळामध्यें परिमाण लागत नाहीं. त्याचा प्रकार अग्नि आणि कापूस ह्याप्रमाणें आहे. या म्हणण्यावरून असें मात्र

समजूं नये कीं, सवड असतांही शंभर वर्षांचें आयुष्य संसारांत घालवावें. शेवटीं एक लवभर हरिनाम घ्यावें. हा मार्ग अनिर्वाह पक्षाचा आहे. ज्याला ईश्वरकृपेनें हरिभजन पूजनादिक करण्याला सवड असेल त्यानें एक लवही वायां घालवूं नये कारण, लवमात्र हरीभजनाची ही किंमत फार आहे म्हणून लवही वायां दवडूं नये.

## वृत्ति.

॥ संतति संपत्ति असतां ज्याची वृत्ती सदा हरी चरणीं ।
॥ तो नर मुक्तचि झाला त्याला न लगे धरावया स्मरणी ॥१॥

आमरण प्रपंचपंकांतच पचण्याचें दुर्दैवानें प्राप्त झालें असतां थोडा तरी वेळ अनिर्वाह पक्ष समजून परमार्थाकडे लावावा असें नुकतेंच सांगितलें. तसा वेळ खेरीज करून बाकीच्या प्रपंचांत जाणाऱ्या वेळाचें सार्थक कसें करावें, हेंही ज्ञात्या पुरुषांनीं जगदोद्धारार्थ सांगितलें आहे. मनुष्य बाह्यात्कारीं कोणच्याही धंद्यांत गुंतलें असलें तरी त्याच्या मनाला ज्याचा नाद लागलेला असतो त्याच्यापासून तें मन कधीं दूर होत नाहीं. मुलगी नाइलाजास्तव सासऱ्यास जाते, पण मन माहेरीं गुंतलेलें असतें, म्हणून वारंवार मागें परतून माहेराकडे पाहत असते. पक्षी आकाशांत भ्रमण करीत असतां मन पिलापाशीं घोंटाळत असतें. पतिव्रता स्त्रीचा पति रणांगणांत असतां आसनीं, शयनीं, भोजनीं, पानीं तिला दिसत असतो. कुटुंबाचें तारूं म्हणून मानलेला पुत्र ऐनतारुण्यपणीं सोडून गेला असतां अष्टौप्रहर जागृतींत आणि स्वप्नांत मायबापापुढें तो मूर्तिमंत उभा असतो. सारांश वरील सर्व व्यक्तींचें शरीर मात्र पोटाचा धंदा करीत असतें, परंतु त्यांची वृत्ति सदा प्रीयवस्तूकडे असते. आपलें खाजगत खरें परमार्थ आहे म्हणजे आपल्यास परमप्रीय काय तो भगवान सच्चिदानंद आहे. त्याच्या योजनेस अनुसरून आपण त्याचा म्हणूनच प्रपंच करीत आहों तस्मात आपली वृत्ति सदा हरीचरणीं ठेवावी म्हणजे सगळ्याच आयुष्याचें सार्थक होईल.—

**नाम घेता करी धंदा ॥ चित्ति समाधिस्त सदां ॥**

सर्वकाळ हरी चरणीं वृत्ति ठेवून सुखानें—

फुकाचें सुखाचें ॥ राम नाम घ्याहो वाचें ॥

मग पुण्याला काय कमी आहे.–

नाम घेता वाट चाली ॥ यज्ञ पाउला पाउलीं

## कर्तृत्वाभिमान.

याप्रमाणें वृत्ति ठेवून नामसंकीर्तन करतां करतां परमेश्वराची योजना म्हणून प्रपंचांतील सर्व कर्में निष्कामबुद्धीनें कर्तृत्वाभिमान विवर्जित करावीं, आणि तीं परमेश्वराची परमेश्वरास अर्पण करावीं, त्यांजपासून सुकृत किंवा फल मिळण्याची सुद्धां आशा करूं नये. देह प्रारब्धानुरूप जे जे भोग प्राप्त होतील ते सन्मार्गानें व आनंदानें वर्तून परमेश्वरास अर्पण करावे, आणि त्याचा प्रसाद म्हणून नंतर आपण अलिप्तपणें भोगून शरीराच्या आणि मनाच्या ऋणांतून मुक्त व्हावें.

## नोकर.

नोकर यजमानाचें हित करण्याविषयीं सदा तत्पर असतो. पण यजमानाकरितां चोरी किंवा दुसरें कांहीं पापकर्म किंवा गुन्हा करण्यास कधीं प्रवृत्त होत नाहीं. वाईट काम केलें असतां आपल्या आणि धन्याच्या गळ्याला फास लागण्याची वेळ येईल, आणि त्या वेळेस मी असें करण्यास नोकरास सांगितलें नव्हतें त्यानें केलें असेल तर तो भोगील असें म्हणून यजमान मोकला होईल हें तो जाणून असतो. त्याप्रमाणेंच प्रपंच्याच्या नोकरानें सावध रहावें. परमेश्वरी योजनेनुरूप त्या प्रपंच्याकरितां जेवढें मिळेल तेवढ्याची व्यवस्था मात्र करण्याचें आपलें काम आहे. या प्रपंच्याकरितां खोटेंनाटें करून, लाचलुचपत खाऊन किंवा चोऱ्या माऱ्या करून द्रव्य गोळा करण्यास आपण जबाबदार नाहीं. तशीं नीच कामें आपण केलीं तर आपण आपल्या बरोबर प्रपंचांतील माणसें घेऊन विपत्तींत पडूं. परमेश्वरापाशीं पापाचा जाब आपल्याला एकट्यालाच द्यावा लागेल, तेथें प्रपंचांतील कोणीही येणार नाहीं. वाल्ह्या कोळ्याला त्याच्या परिवारानें जबाब दिला तोच रोकडा जबाब आपल्या परिवाराकडून मिळेल हें पक्कें ध्यानांत ठेवून प्रपंचाचें काम यथा

न्यायानें आपल्या कष्टानें जें मिळेल त्यावर केलें असतां पापाची सामग्री होण्याचें कारण नाहीं. अशा प्रकारें प्रपंचाची नोकरी नाइलाज असेल तरच तितका वेळ करावी. आपल्या डोकीवरील भार उतरून टाकण्याची संधि झाली कीं, ती साधून आपण आपल्या खासगी खात्याची भरती करण्यास मोकळें व्हावें. तशी संधि आल्यावर क्षणभर ती श्व-वृत्ति ( नीच सेवा ) सहन करूं नये.

## शांति.

लाभालाभ, जयापजय, हर्षामर्ष, सुखदुःख प्रभृति द्वंद्वें जिवमानपर्यंत प्रपंचांत असणाऱ्या माणसास सोडावयाचींच नाहींत. पण तीं सर्व अज्ञानामुळें खरीं भासतात. वस्तुतः तीं मिथ्या आहेत हें आपल्यास कळून चुकलेंच आहे. तस्मात त्यांचा आनंद किंवा दुःख मानण्याचें मुळींच कारण नाहीं. प्रारब्धाच्या ओघाबरोबर जी परिस्थिति प्राप्त होईल तिजमध्यें समाधान मानून आपल्या अंतःकरणाच्या शांतीस लवमात्र धक्का न बसूं देतां आनंदानें राहून हरिभजन करावें हेंच काय तें कर्तव्याचें सार आहे.

दोहींकडे लक्ष पाहिजे, नुसती नोकरी वाईट, दोन्हीं खात्याकडे पूर्ण लक्ष पाहिजे. आपल्या खासगत खात्याला विसरून, प्रपंच धन्याची ओळख विसरून प्रपंचाचे मालकच आपण म्हणून, प्रपंचाशीं तादात्म्य पावून जो वेडा होतो त्याला भवसागरांतील स्त्रीपुत्रादिक नानाप्रकारच्या मोहिन्या घालून रमवीत रमवीत लुटून घेतात. शेवटीं कामक्रोधादिक जलचरें त्याला फाडफाडून खातात आणि नरकाच्या कुंडांत फेंकून देतात हें पूर्वीं वर्णन झालेंच आहे.

## आपलाच मतलब वाईट.

आपलाच मतलब साधावयाचा, प्रपंचांतील नोकरी मुळीं करावयाची नाहीं असें म्हणून प्रपंच मोकलून देणारांचाही परिणाम वाईटच होतो. नोकरीच नाहीं तर खाणेंपिणें कोठलें. ऐषआराम कोठला. परस्पर साह्य, ममता आणि प्रेम कोठलें ! पण ह्या युगांत अन्नमय प्राण असल्या कारणानें वरील सर्व गोष्टी थोड्या थोडक्यांत तरी असल्यावांचून चालतच नाहीं. नोकरी

करावयाची नाहीं तेव्हां अर्थातच प्रपंचापाशीं याचना करून त्या पैदा करणें भाग येतें. शरीर भोगानें कांहीं दुखणेंबाणें आलें तर प्रपंचाच्या पायधरण्या करणें भाग पडतें. अशाप्रकारें प्रपंचाकडून मदत मिळणार ती कोणच्या प्रकारची असणार हें उघडच उघडच आहे. सारांश, त्याची दुर्दशा वैराग्याच्या मार्गांत लिहिल्याप्रमाणें होते. बहुतेक वैरागी फसतात. ज्याला खऱ्याच वैराग्याचा लाभ झालेला असतो तो मात्र टिकतो. पण तसा दैवशाली वैराग्यभाग्य भोगणारा अत्यंत दुर्मिळ.

## चतुरपणाचा मार्ग.

जो चतुर पुरुष दोन्ही खात्यांकडे काळजीपूर्वक लक्ष पुरवितो त्यास मात्र प्रपंचापासून नोकरीच्या हक्कानें यथास्थित अन्न अच्छादन, ऐषआराम, थाटमाट, माया ममता व प्रेम मोगता येतें. तितकें सर्व लिप्त न होता भोगून पुन्हा आपलें खाजगत खातेंही यथास्थित भरण्यास सांपडून अंतीं सुकृताचें मोठें पाथय बरोबर घऊन परलोकीं जाण्यास सांपडतें. ह्मणूनच अमृतराय एकनाथ प्रभृति साधूंनीं हा चतुरपणाचा मार्ग स्वीकारिला.

## निजानंद.

अनुकूल वेदना हें खरें सुख नव्हे. जें सुख कधीं नष्ट होत नाहीं आणि एकदा झालें म्हणजे नष्ट होईल ही भीति मनाला कधीं शिवत सुद्धां नाहीं तेंच खरें सुख असें आपल्यास कळलेंच आहे. करितां तें सुख कोणाचें ह्याचा विचार करूं. सर्व दुःखाचें मूळ आशा आहे. ती जोंपर्यंत अज्ञानाचा वास अंतःकरणांत असेल तोंपर्यंत नाहींशी व्हावयाचीच नाहीं. अज्ञान नाहींसें होण्यास ज्ञानाचा प्रदीप उज्वलित झाला पाहिजे. तो करण्यास आपण सदोदित प्रयत्न तर केलाच पाहिजे, परंतु सद्गुरु कृपा झाल्यावांचून तो प्रज्वलित व्हावयाचाच नाहीं. तळमळ हेंच दुःख आणि तळमळरहित संतोष, पूर्ण शांतवृत्ति हाच निजानंद. हा प्राप्त करून घेण्याची पात्रता अंगीं येण्यास साधनचतुष्टयसंपन्न व्हावें लागतें. साधनचतुष्टयसंपन्नता आली म्हणजे संग असले किंवा नसले तरी

त्यापासून कांहीं बाधा होत नाहीं. मन आपोआप नाशवंतापासून प
होऊन परमेश्वराच्या पायीं लीन होतें.

## गुरुकृपा.

दुंमाच्या नादानें त्रस्त झालेल्या स्त्रीचें वर्णन पूर्वी झालें आहे. अलंकार भूषणें टाकून पंख्यानें वारा घेत आनंदानें बसली; त्याप्रमाणें कृपा झाली म्हणजे मनास ऐहिकाचें मर्मज्ञान होतें, आणि तें सर्व संग जोजार फेंकून देऊन गुरुकृपेच्या हातानें विवेक विंझण्याचा भक्ति, ज्ञा वैराग्यरूप, मंद, सुगंध, शीतल वारा आनंदानें घेत बसते. असा लाभ ज्याच मनाला होतो तो देवाचा पुतळा परमतत्वीं लीन होऊन अक्षय निजानंदांत मिळु जातो. असा भाग्यशाली नरपुंगव ऐहिक परिवारापासून मुक्त होऊन अवतरणांतील श्लोकांत वर्णन केल्याप्रमाणें पवित्रतम परिवार त्यास प्राप्त होतो. धैर्य पिता आपलें कृपाछत्र त्याच्यावर धरितो. क्षमा जननी निस्सीम प्रेम करिते. शांति त्याची प्रियतमा गृहस्वामीण होते. तिला त्यावांचून क्षणभर करमत नाहीं. पुत्राप्रमाणें ऊर्ध्व वचनांत सत्य वागतें. दया सहोदरीप्रमाणें ममता करते. मनःसंयम बंधुप्रेम करून पाठिराखा होतो. कधीं वीट न येणाऱ्या व कमी न होतां सदा वाढणाऱ्या ज्ञानामृताचें सार्वकाल भोजन करून भूमातेच्या अंकावर दशदिशांच्या पांघरूणांत तो तुर्येमध्यें स्वानंदरूपी लीन होतो. त्यास भय कशाचें. मुळचाच सच्चिदानंद असून भ्रांतिपटलानें मोहित झालेला असतो. तें भ्रांतिपटल ज्ञानरवीच्या प्रखर किरणांनीं विरून जातांच आधिरहित सच्चिदानंदच उरतो. या स्वरूपास पावलेल्या सर्व विभूतींस वंदन करून हें मंथन पूर्ण करतों.

समाप्त.

